# सुख आणि शांति

हा ग्रंथ,

लॉर्ड एव्हबरी, पी. सी.
एफ्. आर. एस्., डी. सी. एल्., एलएल. डी.

ह्यांच्या

"On Peace & Happiness" ग्रंथाधारें

महादेव हरि मोडक, बी. ए.

ह्यानीं लिहिला.

---

प्रकाशक
बळवंत गणेश दाभोळकर
नारायण पेठ, घर नंबर ४६८, पुणें सिटी.

पुणें पेठ शनिवार, मेहुणपुरा एथें केशव रावजी गोंधळेकर
ह्यानीं आपले जगद्धितेच्छु छापखान्यांत छापिला.

शकवर्ष १८३२–इ० सन १९११

# सुख

एको वशी सर्वभूतांतरात्मा ।
एकं रूपं बहुधा यः करोति ।
तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरा- ।
स्तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम् ॥

—कठोपनिषद्

# शान्ति

नित्यो नित्यानां चेतनश्चेतनाना- ।
मेको बहूनां यो विदधाति कामान् ।
तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरा- ।
स्तेषां शांतिः शाश्वती नेतरेषाम् ॥

—कठोपनिषद्

परलोकवासी

# नारायण वासुदेव दाभोळकर

जे स्वपराक्रमानें अत्यंत गरीबीच्या स्थितींतून
" मुंबईचे सुप्रसिद्ध नागरिक " म्हणून
नांवलौकिकास चढले होते;

**जास्टिस आफ् दी पीस, म्युनासिपल कार्पोरेटर,**
**मुंबई सरकारचे लेजिस्लेटिव्ह कौन्सिलर**

इत्यादि प्रकारें उच्च प्रतीच्या मानास पावले होते;

**व ज्यानीं अनेक लोकोपयोगी कृत्यें केलीं**

त्यांचे स्मरणार्थ

हा ग्रंथ महाराष्ट्र वाचकांस सादर केला आहे.

# अभिप्राय.

मुंबईच्या " टाइम्स ऑफ् इंडिया " नामक वजनदार इंग्रजी पत्राच्या दैनिकांत पुढील अर्थाचा अभिप्राय प्रसिद्ध झालेला आहेः—" पुण्याचे मिस्तर **बळवंत गणेश दाभोळकर** ह्यांच्या नांवाकडे आह्मी कळकळीनें वळतों. हे प्रकाशक दक्षिणा वगैरे फंडांची मदत नसतां, **खरें लोकशिक्षणाचें काम करीत आहेत.** ह्यांच्या ह्या उद्योगास व ग्रंथमालेस अत्यंत यश यावें असें आह्मी सहजच मनापासून इच्छितों. "

# अर्पणपत्र.

आमच्या ग्रंथमालेचे कायम आश्रयदाते

श्रीमंत राजमान्य राजश्री

**मोतीलाल माणकचंद उर्फ प्रतापशेट**

अंमळनेर एथील स्पीनिंग वीव्हिंग मिलचे चालक

ह्यांस, त्यांची

**विद्याभिरुचि, परोपकारी व उदार स्वभाव**

ह्या गुणांस्तव

हा ग्रंथ प्रेमपुरःसर अर्पण केला आहे.

# सुधारून वाढविलेला

## आत्मविद्या ग्रंथ

सदर्हू ग्रंथाचे कर्ते रा॰ रा॰ हरि गणेश गोडबोले, बी. ए., सातारा हायस्कूलचे हेडमास्तर हे पेनशन घेऊन आले असून, त्यानीं त्यांतील चुक्या दुरुस्त केल्या आहेत व उपासना, तप, अमरत्व इत्यादि कांहीं नवीन विषय घातले आहेत. ग्रंथ छापत आहे.

बळवंत गणेश दाभोळकर.

# आजपर्यंतचे माझे ग्रंथ

☞ किंमत न दिलेल्यांच्या प्रती शिल्लक नाहींत.

१. **नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें.**
२. **न्यायतत्त्वें**-किं० २ रु०; ट० हं ० ८३
३. **ज्योतिर्विलास**-किं० १॥ रु०; ट० हं० ८३
४. **संसारसुख**-किं० १॥। रु०; ट० हं० ८२
५. **शास्त्ररहस्य.**
६. **आत्मनीतीचीं तत्त्वें** आणि **परोपकार.**
७. **नीतिसिद्धान्त**-किं० १॥। रु०; ट० हं० ८३
८. **धर्ममीमांसा-नैसर्गिक धर्म** आणि **भौतिक धर्म**-किं० २॥ रु०; ट० हं० ८३
९. **राजनीतीचीं मूलतत्त्वें**-किं० २॥ रु०; ट० ८३
१०. **अज्ञेयमीमांसा.**
११. **धर्ममीमांसा-पितृमूलक धर्म** आणि **आध्यात्मिक धर्म**-किं० २॥ रु०; ट० हं० ८३
१२. **जीवनशास्त्र**-किं० १॥। रु०; ट० हं० ८३
१३. **ज्ञेयमीमांसा** ( पूर्वार्ध )-किं० २॥ रु०; ट० ८३
१४. **भारतवर्षीय भूवर्णन.**
१५. **ज्ञेयमीमांसा** ( उत्तरार्ध )-किं० २॥ रु०; ट० ८३
१६. **जीवितकर्तव्य.**
१७. **राणीचे राज्याचा इतिहास**-किं० २ रु०; ट० हं० ८३
१८. **आत्मविद्या** ( नवी आवृत्ति छापत आहे. )
१९. **समाजशास्त्राचे मूलसिद्धान्त.**
२०. **समाजशास्त्राचे अनुभवजन्य सिद्धांत** व **गृहसंस्था**-किं० २॥ रु०; ट० हं० ८३

२१. **जननमरणमीमांसा**–किं० १॥ रु०; ट० ६३
२२. **राजकीय संस्था**–किं० २॥ रु०; ट० ह० ६३
२३. **निबंधरत्नमाला**–किं० २॥ रु०; ट० हं० ६३
२४. **विधिसंस्था** व **धर्मविषयक संस्था**–किं० २॥ रु०; ट० हं० ६३
२५. **उद्योगसंस्था** व **धंदेसंस्था**–किं० २॥ रु०; ट० हं० ६३
२६. **सुख आणि शांति**–किंमत २॥ रु०; ट० हं० ६३

---

## कायम वर्गणीदार व त्यांस मिळणारा फायदा

प्रतिवर्षीं बहुधा दोन नवीन ग्रंथ मी प्रसिद्ध करीत असतों. हे ग्रंथ कोणत्या प्रकारचे असतात त्याची दिशा वरील यादीवरून कळेल. प्रत्येक ग्रंथाच्या अमुक एक प्रती स्वीकारण्याचें लेखी वचन देऊन ठेविलेले ते कायम वर्गणीदार होत. ग्रंथ लहान-मोठा असेल त्या मानानें अगाऊ वर्गणीदारांस १॥ किंवा २ रुपये किंमत ठेविली जाते, व त्या किमतींतहि खालीं लिहिल्याप्रमाणें कायमच्या वर्गणीदारांस फायदा मिळतो.

(१) पुण्यातल्यांस ४ आणे कमी पडतात.
(२) बाहेरगांवच्यांस पोस्टेज व व्ही. पी.चा खर्च पडत नाहीं.
(३) पांच प्रती घेणारांस सहा प्रती मिळतात.

४६८ नारायण पेठ, पुणें सिटी. | **ब० ग० दाभोळकर** ग्रंथप्रकाशक.

# ग्रंथकर्त्याची प्रस्तावना

सांप्रत ' लॉर्ड एव्हबरी ' ही महनीय पदवी पावलेले सुप्रसिद्ध लेखक व राजकारणी गृहस्थ सर जॉन लबक यानीं कृपाळूपणें लेखी परवानगी दिल्यामुळें, त्यांच्या "ऑन पीस अॅन्ड हॅपिनेस" नामक ताज्या ग्रंथाच्या आधारानें प्रस्तुतचा ग्रंथ लिहिला आहे. सदर साहेबांचे लेख सुविचारपरिप्लुत व सुभाषितमय असतात, हें वाचकांस विज्ञातच आहे. ह्यांच्या ग्रंथांत परक्यांचे उतारे इतके असतात कीं, या उसनवारीबद्दल पुष्कळांनीं त्यांचे तोंडावर उघड नांवें ठेविलीं आहेत. तथापि, त्यांना ' मीपणा ' स्थापित करण्यापेक्षां कुठून तरी जगतांत सुविचार वाढविणें हीच गोष्ट अधिक प्रिय असल्यामुळें, त्यानीं आक्षेपकांची परवा न करितां, आपला परकीय सूक्ति-संग्रहाचा क्रम याहि ग्रंथांत कायम ठेविला आहे. आणि प्रस्तुतचा हा मराठी ग्रंथ वरील ग्रंथाचे धोरणानेंच लिहिला असल्यामुळें यांतहि ' परसूक्ति-संग्रह ' मोकळे मनानें केला आहे. या कामीं जीं गद्यपद्यात्मक अनेक अवतरणें घेतलीं आहेत, त्यांतील कित्येक, मूळच्या इंग्रजी अवतरणांचीं भांषांतरें करून घातलीं आहेत; व इतर बरीचशीं, संस्कृत व मराठी वाङ्मयांतून

आयतीं घेतलेलीं आहेत. अवतरणांचे आधार दे- तांना, पुष्कळदां, मूळ ग्रंथ किंवा कर्ता देत न बसतां हितोपदेशासारख्या तत्संग्राहक ग्रंथाचाच निर्देश केला आहे. गद्यपद्यांचीं भाषांतरें अक्षरशः नसून भावार्थ घेऊन केलेलीं आहेत. अवतरणां- खेरीज बाकीचे स्थळीं पदरचा असा मजकूर पु- ष्कळच घातला आहे; आणि " धर्म " व " ब्रह्मविद्या " ही दोन प्रकरणें तर केवळ स्वतंत्र लिहिलीं आहेत. तथापि, मूळ ग्रंथाच्या हेतूकडे दुर्लक्ष न होईल अशी शक्य तितकी तजवीज ठे- विली आहे. मात्र या ग्रंथांत दोष असतील ते माझे आहेत; व गुण असतील ते इतरांचे आहेत.

मूळ ग्रंथांत एकंदर आठरा प्रकरणें आहेत. तितकींचे तितकींच मराठींतहि घेतलीं आहेत. पण त्यांतील आठरावें प्रकरण "राष्ट्रांची शांति" हें आमचे लिहिण्यांत पंधरावें घातलें आहे. याचा हेतु हा कीं, मूळ ग्रंथ प्रथमपासून लक्षपूर्वक वा- चून पहातां " राष्ट्रांची शांति " नामक जें आ- ठरावें प्रकरण तें बाकीच्या प्रकरणांशीं तितकें सु- श्लिष्ट आहेसें दिसत नाहीं. कारण, बाकीचीं सतरा प्रकारणें वैय्यक्तिक सुख-शांतीचे मीमांसेंत गुंतलीं असतां, एवढेंच कायतें प्रकरण राष्ट्रीय शांतीचा विचार करीत आहे. असा प्रकार आहे. तथापि तें अजी वगळावें इतकें परकें नाहीं.

१० दिवसांचें नसलें तरी ३ दिवसांचें तरी त्याचें मुख्य विषयाशीं नातें आहे. ही एक गोष्ट. दुसरी गोष्ट अशी कीं, स्वतंत्र दृष्टीनें पाहतां त्यांतील विषयहि फारच महत्त्वाचा आहे. "युरोपांतील आजकालचीं प्रमुख राष्ट्रं सांप्रत स्वार्थलोलुप होऊन परोत्सादनार्थ अवाढव्य सैन्यें वाढवून जनतेला सैन्यांचे खर्चाखालीं चिरडून टाकीत आहेत व परस्परांचीं मनें साशंक ठेवून सर्वत्र अस्वस्थता उत्पन्न करीत आहेत, ही गोष्ट सर्वथा सुखांशांतीला घातक आहे" असा राजकरणपटु व विवेकी अशा लबक साहेबांचा स्पष्ट अभिप्राय आहे; व तो त्यानीं त्यांच्या नेहमींच्या पद्धतीस अनुसरून जगापुढें बिनभाडपणें मांडिला आहे. आतां, हिंदुस्थानाला आजचे स्थितींत युरोपचे प्रबल राष्ट्रांनीं कसें वागावें आणि कसें नाहीं याचा विचार म्हणजे 'कुंकवाचे उठाठेवी' पैकींच खरा. आणि यामुळें, या कामीं उपदेशाची अपेक्षा एतद्देशीय वाचकांस नाहीं, असें कित्येकांस वाटेल. पण, दूरस्थ आकाशांतील शनि, मंगळ, धूमकेतु इत्यादिकांचे प्रवर्तन किंवा नियमन करणें जरी आपणा मानवांचे हातीं नसलें तरी, त्यांच्या चलनवलनांचा परिणाम आपणांस भोगावा लागतो असा अनुभव असल्यामुळें, " मंगळ वक्री आहे कीं मार्गी

आहे? शनि उदरीं आहे कीं लत्तेला आहे?"
इत्यादि गोष्टी आपणांस समजून घेणें अवश्य पडतें. त्याचप्रमाणें इंग्लंड, फ्रान्स, रशिया, जर्मनी अमेरिका इत्यादि प्रबल राष्ट्रांनीं किती सैन्य ठेवावें, किती ड्रेडनाट्स बांधावीं, वगैरे कामीं आह्मां भारतवासियांना जरी दमडीचेहि उधारीनें कोणी पुसत नसलें तरी, सदर युद्धदुर्मद राष्ट्रांच्या सुविचाराचा किंवा कुविचाराचा बरा किंवा वाईट परिणाम आमचेपर्यंत येऊन पोंचणारच पोंचणार, असें निश्चित असल्यानें त्याची वार्ता आपलें कानीं असणें जरूर आहे. याशिवाय तिसरी गोष्ट अशी कीं, इंग्लंड व हिंदुस्थान हीं राजकीय दृष्ट्या तरी परकीय समजणें घातक आहे. नव्हे, असें समजून चालावयाचेंच नाहीं. त्यांचें नातें 'पोट आणि अवयव' इतकें सन्निकट आहे. तेव्हां पोटाचे हालचालीची (किंवा दीपनपाचनाच्या शक्तीची) दाद अवयवांना असणें अत्यंत न्याय्य आहे. कारण, त्यांचेंहि स्वास्थ्य—अस्वास्थ त्यावर अवलंबून आहे. म्हणून सर्व गोष्टी मनांत आणून, मराठी पुस्तकांतहि भारतीय वाचकांसाठीं या महत्त्वाचे प्रकरणाचा संग्रह केला आहे. शिवाय युरोपीय राष्ट्रांचें वैभव पाहून आह्मांपैकीं कित्येक दिपून गेले आहेत व आपणांस अधन्य मानीत आहेत. पण, त्यांचे असें लक्षांत

येईल कीं, त्या वैभवांत घोळलेला व राजकारणी असा लेखक लार्ड एव्हबरी हा या घटोत्कची वैभवानें मुळींच संतुष्ट नसून, ' ही केवळ आसुरी संपत्ति असून परिणामीं सत्यनाश करील ' असें घंटारवानें दुनियेला सांगत आहे. एतावता, हें प्रकरण मूळ विषयाशीं पूर्ण संबद्ध नसलें तरी महत्त्वाचें व विचारणीय आहे असें पाहून मराठी वाचकांकरितां कायम राखिलें आहे. मात्र तें ' चित्तस्वास्थ्या ' पूर्वीं घातलें आहे. कारण, व्यक्ति हा राष्ट्राचा घटक असल्यानें, राष्ट्रांतच शांति नसेल तर व्यक्तीला शांति मिळणें कठीण आहे. अर्थात वैय्यक्तिक शांतीला राष्ट्रीय शांति ही पूर्वगामिनी पाहिजे हें उघड आहे. याखेरीज ' चित्तस्वास्थ ' हें प्रकरण मूळ ग्रंथांत सतरावें आहे, तें एथें सोळावें घातलें आहे. याचाहि न्याय ग्रंथ वाचल्यावर समजेल. यापलीकडे विषययोजनेंत असा महत्त्वाचा फरक केला नाहीं.

मनुष्य पूर्व वयांत कसाहि रगदार असो किंवा कितीहि साहसी असो, तो या जगांत कांहीं दिवस लोटून बरेचसे टक्के-टोणपे व धक्के-बुक्के खाऊन नरम आला म्हणजे त्याची ती रगदारी नाहींशी होते, व "शांति" सारखें सुख कशांतहि नाहीं असें त्याला आपेंआपच वाटूं लागतें. केंट नामक ग्रंथकारानें आपल्या " Inter na-

tional law " किंवा " व्यतिराष्ट्रीय करार " नामक ग्रंथांत म्हटलें आहे कीं, " युद्धाचेंहि पर्यवसान शांति हेंच आहे ". आमचे वेदांत तर सर्वत्र आरंभीं अंतीं, " शांतिः शांतिः शांतिः " असा त्रिवार शांतिघोषच असतो. कारण, शांतींतच खरें सुख आहे. व हीच गोष्ट लबकसारख्यालाहि सिद्धान्तरूप वाटून, त्यानें ती मोठ्या जोरानें सर्वांपुढें ठेविली आहे. व चारी खंडांत " शांतीचें साम्राज्य " स्थापण्याचा अ-ग्रमान इंग्लंडनेंच घ्यावा, अशी लबकसाहेबांची शिफारस आहे. ही गोष्ट आह्मास तरी सर्वथा श्लाघ्य वाटते. हिचा विचार पाश्चात्यांनींच करावा असें नव्हे, तर, युरोपचा अर्धमुर्धा इतिहास वाचून किंवा ऐकून ज्यांच्या डोक्यांत अशांततेचे वेडे विचार वावरूं लागले असतील अशांनींहि अवश्य करावा. म्हणूनच हा ग्रंथ मुद्दाम प्रसिद्ध केला जात आहे.

लबक साहेबांचे ग्रंथांत फ्रेंच-ग्रंथकारांचीं पुष्कळशीं अवतरणें आहेत. त्यांचा बोध माझे विद्वान् मित्र राजमान्य राजश्री हरि नारायण आपटे व डॉक्टर वुइल्यमसन यांनीं करून दिला याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. त्याचप्रमाणें ज्या अनेक कविवर्यांचे सूक्तींचा फायदा या ग्रंथांत मीं घेतला आहे त्यांचा, व ज्यांनीं आप-

त्या शिक्षेनें हा ग्रंथ लिहिण्याचें सामर्थ्य माझे ठायीं उत्पन्न केलें तीं माझीं परमपूज्य माता-पितरें व अनेक विद्यालयीन शिक्षक, व ज्यानीं हा ग्रंथ लिहिण्यास मला प्रवृत्त केलें ते आमचे उद्योगी गृहस्थ **बळवंत गणेश दाभोळकर**, या सर्वांचा मी फार फार ऋणी आहें.

अखेर, ज्यानें माझे बुद्धिस्थानीं वसती करून हा ग्रंथ मजकडून बोलविला त्या विश्वंभराला अनन्यभावानें शरण जाऊन, ही प्रस्तावना पुरी करितों.

काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें।
परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥

---

## प्रकाशकाची प्रस्तावना

मूळ ग्रंथकार सर **जॉन लबक** ( लॉर्ड एव्हबरी ) ह्यांच्या विचारसरणीशीं आमच्या ग्रंथांच्या वाचकांचा पूर्वीं परिचय झालेला आहेच. आमच्या मालेंतील अनुक्रमांक ४ संसारसुख व अनुक्रमांक १६ जीवितकर्तव्य ह्या ग्रंथांत, कर्तव्य केल्यानें सुख होतें व सुखप्राप्तीकरितां काय करावें हें **लबक** साहेबानीं सांगितलेलें आहे. तथापि, सुख म्हणजे काय ? हा प्रश्न राहिलाच. म्हणून प्रस्तुतचा ग्रंथ त्यानीं लिहिला आहे. आणि

ह्या प्रश्नाचें इतकें महत्त्व असण्याचें कारण—

यावत् प्राणिमात्रांची धडपड सुखाकरितां आहे. किंबहुना सृष्टीचा हा स्वभावच आहे. परंतु, शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् । शरीरच नसलें तर धरपड तरी कशाची, आणि सुख तरी कोणाला? म्हणून **सुखा**चा उपोद्घात प्रथम प्रकरणांत करून, **शरीर** हें दुसरें प्रकरण लिहिलें आहे.

तथापि, दुर्लभं मानुषं जन्म । मनुष्येतर प्राण्याचें शरीर व मनुष्यशरीर ह्यांत महदंतर आहे. मनुष्याचें शरीर केवळ पराधीन आणि **मना**चे स्वाधीन आहे. एकादा पक्षी शरीरासह आकाशांत स्वैर संचार करील; तोच मनुष्य मनांत आणील तर परमेश्वराचे मांडीशीं मांडीं लावून बसेल.

पण, वस्तुतः मन हें ओढाळ गुरूं आहे. त्याचे ठायीं **आरुरुक्षा** म्हणजे हावरटपणा मोठा आहे. म्हणून सुंदरदासानें ( पृष्ठ १५६ ) सांगितल्याप्रमाणें, विवेकी बुद्धि व **संतोष** असेल तरच मनुष्याला सुखप्राप्ति होईल. आतां, ह्या संतोषाची **आपत्ति** ही कसोटीच आहे. इतकेंच नव्हे तर, प्राणिमात्रांच्या आपत्तींतहि **सदयता** ठेवणें हाच थोर पुरुषार्थ आहे.

हें खरें, पण, मनाच्या इतक्या प्रगल्भतेला **शिक्षण** हें जनक आहे. शिक्षणानेंच दयेची पा-

त्तापात्रता कळते. अपात्र ते शत्रु व पात्र ते **मित्र.** आणि पात्रापात्र दयेला **श्रीमंती** हें व्यावहारिक साधन असलें तरी, शिक्षणाचा खरा उपयोग **सृष्टीची भीषणता** न मानणें व **सृष्टिप्रेम** ठेवणें हाच आहे. इतकेंच नाहीं तर, 'सृष्टिप्रेम' म्हणजेच परमेश्वरप्रीति किंवा परमेश्वरसान्निध्य होय.

मानवजीविताच्या सुखाचा आत्यंतिक विचार वास्तविक एथें संपला. परंतु, हा प्रेमळ विचार करीत असतां लबक साहेबांची **सद्यःकाला**कडे नजर गेली. आणि सद्यःकालचें वैदग्ध्य त्यांच्या पुढें उभें राहून, तन्निरसनार्थ **राष्ट्रांच्या शांती**ची त्यांस अपेक्षा करावी लागली. कारण, **चित्त-स्वास्थ** हें राष्ट्रांच्या शांतीवर अवलंबून आहे असें त्यांचें मत आहे. आणि चित्ताला स्वस्थता नसेल तर **धर्मा**चरण होणार कसें व अध्यात्म किंवा **ब्रह्म-विद्ये**ला वाव तरी कोठून सांपडणार ? म्हणून शे-वटीं, लबक साहेबानीं राष्ट्रांच्या शांतीची मना-पासून इच्छा केली आहे.

असो. लबकसारख्या फार थोर, कुलशीलवान्, विद्याव्यासंगी चतुरस्र बहुश्रुताचा ग्रंथ, आणि त्यास रा. **माधवराव मोडकांची** मिळालेली जोड, ह्यामुळें दुधांत साखर पडल्याप्रमाणें हा ग्रंथ किती मिष्ट व सुंदर झाला आहे हें भोक्त्या वाचकांचे अनुभवास येईल.

# अनुक्रमणिका

( श्लोक )

नास्ति बुद्धिरयुक्तस्य । न चायुक्तस्य भावना ॥
न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखं ॥ १

—श्रीमद्भगवद्गीता

**भावार्थः**—ज्याचें मन स्थिर नाहीं त्याला ज्ञान नाहीं किंवा भक्तिहि नाहीं; भक्ति नाहीं त्याला शांति नाहीं; आणि ज्याला शांति नाहीं त्याला सुख कोठून असणार ?

( अभंग )

तुका म्हणे सुख पराचिया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे॥

—तुकाराम

---

( श्लोक-चरण )

यः कश्चित्सौख्यहेतोस्त्रिजगति यतते नैव दुःखस्य हेतोः।

--शंकराचार्य-शतश्लोकी

**भावार्थः**—जगत्रयांत कोणीहि झाला तरी सुखप्राप्त्यर्थ यत्न करीत असतो, दुःखप्राप्त्यर्थ करीत नाहीं.

( श्लोक-चरण )

सुखाय कर्माणि करोति लोकः ।

--श्रीमद्भागवत

**भावार्थः**—लोक सुखार्थच क्रिया करितात.

# प्रकरण १

## सुख

सुखार्थाभुवि जन्तूनां । प्रायः सर्वाःप्रवृत्तयः ॥

भावार्थः—या भूतलावर प्राण्यांच्या सर्व खटपटी प्रायः सुखप्राप्तीस्तवच असतात.

सुख आणि शांति हीं प्राप्त व्हावीं म्हणून सर्व मनुष्यांची अहर्निश तळमळ चालू असते; आणि असें असणें स्वाभाविकच आहे. कारण, या दोहोंवांचून जीवित हें मनुष्यास असह्य—नव्हे, अशक्यच होईल. बरें, एवढीं दोन सुदैवानें हातीं लागल्यास मनुष्याची हांवच खुंटली. तिच्या पलीकडे जाण्यास जागाच नाहीं. अर्थात् हीं दोन्ही जीविताचे क्षेमचर्येला आवश्यक असून, जीवितांतील अन्तिम-साध्येंच होत. आतां, ' या दोहोंवांचून ' असें जें आह्मीं वरील वाक्यांत म्हटलें आहे, याचें कारण असें कीं, शांतिविरहित सुख किंवा सुखाविरहित शांति अशी पृथक् कल्पना बहुतेक असंभाव्यच आहे. हीं परस्परसहचारीच आहेत; किंवा या संसाररूप वृक्षाचीं जुळीं किंवा जोडफळें आहेत, असें म्हटलें तरी शोभेल. आतां, हीं प्राप्त व्हावीं कशीं ?

वरील प्रश्नाचें उत्तर मिळण्यास, हीं कशावर अवलंबून राहतात, याचा शोध आपण केला पाहिजे. बहुतांचा समज असा आहे कीं, द्रव्य असलें म्हणजे सुख-शांतीला तोटाच नाहीं. परंतु, हें खरें नाहीं. एक कवि म्हणतोः—

(श्लोक)

पइ पइ करुनीयां जोडिल्या द्रव्यराशी ।
धन बहु सुख देतें वाटुनी अंतराशीं ॥
परि धन असुनीही दुःख डंखी उराला ।
म्हणुनि शरण आलों सद्गुरो त्वत्पदाला ॥ १

विजयप्राप्तीनेंहि हीं प्राप्त होतातच असें नाहीं. मैत्रीनें हीं मिळतात असेंहि नव्हे. शरीरबल किंवा आरोग्य असल्यानें तरी यांची जोड निश्चित होईलसें म्हणवत नाहीं. एवढी गोष्ट खरी कीं, ह्या वरील सर्व गोष्टी सुखाला व शांतीला साधक आहेत; परंतु ह्यांपैकीं एक किंवा अनेक जेथें जेथें आहेत तेथें तेथें सुख व शांति हीं अबाधित सिद्ध आहेतच असें म्हणवत नाहीं.

आपल्याला जन्मतःच नांवलौकिक, आरोग्य, द्रव्य, दीर्घायुता हीं प्राप्त असतील; तथापि, त्यायोगानें आपण सुखी असूंच असा नियम नाहीं. कारण, सुख हें परावलंबी किंवा वस्तुतंत्र नाहीं. तें स्वतंत्र म्हणजे ज्याचें त्याचेच स्वाधीन आहे. तें स्वतःच निर्माण केलें पाहिजे; तरच मिळतें.

पुष्कळशी वणवण करून किंवा यातायात करून मिळत नाहीं व मिळणें शक्यहि नाहीं. कारण, तें आत्मनिष्ठ आहे. म्हणजे स्वतःचे ठिकाणीं रहात असतें. श्री नृसिंहसरस्वतींनीं आपले ' स्वात्मसौख्य ' ग्रंथांत म्हटलें आहेः—

( ओंवी )

आत्मनिष्ठावेगळा पाहीं । सौख्यभोग कोणास नाहीं ॥

एक कवि म्हणतोः—

( श्लोक )

मा धाव सुखहेतोस्त्वं । धावतां नु कुतः सुखं ॥
सुखरूपे निजे रूपे । सुखं तिष्ठ सुखी भव ॥ १

**भावार्थः**—बाबा रे, तुला सुख पाहिजे असेल तर तत्प्राप्त्यर्थ इतस्ततः धांव धांव करीत सुटूं नको. कारण, तूंच पहा कीं, कुत्र्याप्रमाणें लस लस करीत धांवत सुटल्यानें सुख कोठून होईल ? तोंडाला फेंस मात्र येईल. खऱ्या सुखप्राप्तीची जागा वेगळी आहे. ती तुझेच ठिकाणीं [ निजरूपीं ] आहे; याकरितां तेथें स्थिर हो, म्हणजे सुखी होशील.

कवीचें हें म्हणणें सर्वथा निरपवाद आहे. आपलें सुख आपलेच हातीं आहे. आणि तें ईश्वरानें तसें ठेविलें आहे, यांतच त्याचें बिनतोड शहाणपण व जीवांवर असणारें निरुपम प्रेम दिसून येतें. कारण, सोन्यारुप्याचे तुकडे, ज्यांना आपण द्रव्य म्हणून म्हणतों, त्यांची किल्ली स्वतःशिवाय इतराचे ( प्रत्यक्ष पुत्राचेहि ) हातीं

गेल्यानें जर आपण दुःखी होतों, तर द्रव्यादि साधनें खर्चीं घालूनहि जी मिळेलच अशी खातरी नाहीं, इतकी बहुमोल व दुर्लभ जी जिन्नस—सुख—तिची किल्ली जर परमेश्वरानें इतरांचे हातीं ठेविली असती, तर आपलें जीवित गुलामापेक्षांहि अधिक कष्टमय झालें असतें. परंतु, त्या परमकारुणिक प्रभूनें या सर्वोत्तम व अखंड स्पृहणीय वस्तूची पेटी प्रत्येकाचे जवळ ठेवून, तिची किल्लीहि ज्याची त्याचेच हातीं दिली आहे.

संसारांत प्रत्येकाची परिस्थिति, वय, व्यवसाय, अधिकार, साधनें, हीं इतकीं भिन्न भिन्न असतात कीं, सुखसंपादनाचे कामीं सर्वांना सारखेच लागू पडतील, असे सामान्य नियम घालतां येणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे, तर या कामीं धोपट वाट सांगूं जाणें देखील वेडेपणाचेंच होईल. व्हॅरो म्हणून एक गृहस्थ होऊन गेला. त्यानें सुख कशाला म्हणतात याविषयीं निरनिराळ्या विद्वानांचे अभिप्राय गोळा केले होते. त्या वेळीं एकमेकांशीं भिन्न असे २८८ अभिप्राय त्याला मिळाले; आणि ते सर्वहि शहाण्यांचेच. सारांश, सुखाचे स्वरूपाविषयीं इतकें आनैकान्त्य आहे. बाकी असें जरी आहे, तरी कोणाहि पोक्त वयाचे मनुष्यास विचारूं गेलें असतां, तो मोकळे मनानें बोलल्यास, आपणास असें

सांगेल कीं, "काय सांगूं ? हरहर! माझ्या हातून अमुक वेळीं मोठी चूक झाली; ती न होती तर माझ्यासारखा आज राजा नसता. खरेंच, त्यावेळीं मला विनाकारण कीं हो भूल पडली; तेवढी न पडती, तर आज काय पंढरी झाली असती. वास्तविक कांहीं मोठी गोष्ट नव्हती; पण मला आज जो जगाचा अनुभव आहे, तो जर असता तर आजला माझें जीवित किती तरी पटीनें उपयुक्त, सोत्साह व सुखपूर्ण झालें असतें". थिओडोर पार्कर हा मोठा गाढा विद्वान् होता; तथापि, त्याला अल्पवयांतच मृत्यु प्राप्त झालासें पाहून तो मृत्युशय्येवर पडल्या पडल्या उद्गारला कीं, " अरेरे, मला जर जीविताचें रहस्य वेळींच अनुभवानें समजलें असतें; किंवा एकाद्या ग्रंथावरून किंवा कोणा अनुभवी मनुष्याचे तोंडून जगांत जगावें कसें, शिकावें कसें, व्यायाम करावा कसा, इत्यादि गोष्टी मला कळत्या, तर आजला केवढी बहार झाली असती; व मी सुखी झालों असतों ?"

प्लूतार्क नामक ग्रंथकार आपले ग्रंथांत एके स्थळीं निर्मळ मनानें असें लिहितो कीं, "मी आरंभीं दुसऱ्याचे फायद्यासाठीं म्हणून सत्पुरुषांचीं चरित्रें लिहिण्याचें सुरू केलें. परंतु, लवकरच असें झालें कीं, मला स्वतःला त्यांचे चरित्रांचीं

गोडी लागून, मी स्वकल्याणासाठीं त्या चरित्रां-
चें मनन व अभ्यास करूं लागलों. व पुढें पुढें
त्या थोर पुरुषांचा कित्ता मजपुढें ठेवून त्याप्र-
माणें माझा स्वतःचा आयुष्यक्रम बनविण्याचे
खटपटीस लागलों". एवंच, इतिहासाचें सतत अ-
ध्ययन व लेखन करण्याचा नाद असला म्हणजे
सहजच उदार व सच्छील अशा थोर पुरुषांचें
चरित्र आपणास परिचित होऊन त्याचा ठसा
आपले मनावर आपोआप उमटतो, व तेणेंकरू-
न जर कुसंगतीमुळें आपले ठिकाणीं दुर्गुण किंवा
नीचवृत्ति रूढ झाल्या असतील तर या उदार-
चरितांचा कित्ता शांत व स्वस्थपणें मनापुढें उ-
भा राहून आपणामधील दोष दूर करितो. अर्था-
त् आयुष्यांत सुख-शांति पाहिजे असेल तर स-
त्संग अवश्य आहे.

आपण नुसता शास्त्रार्थ बोलूं लागलों म्हणजे
सुख-शांतीपरतें उच्चतम साध्य कांहींहि नाहीं
असें उघड बोलून दाखवितों; परंतु, व्यवहारांत
पहातां कितीकजण सत्ता, संपत्ति, किंवा कीर्ति
यांना सुख-शांतीपेक्षां अधिक महत्त्व देतात; व
याचमुळें सुख-शांतीचा मार्ग सुलभ असला तरी
तो सोडून, सत्ता, संपत्ति किंवा कीर्ति मिळवि-
ण्यासाठीं दीर्घायासहि पत्करतात ! अशांची
स्थिति पाहिली म्हणजे, जरूसिलेमचे लोकांना

उद्देशून येशूख्रिस्त म्हणाला होता कीं "हे संसारी जीव हो, शांतिसुखाचें मोल किती आहे, हें जर अजून तरी तुमच्या ध्यानीं वागेल, तर तुमचें किती तरी बरें होईल!" त्या वाक्याची आठवण होते. आपलेकडेहि एका कवीनें म्हटलें आहे:—

(श्लोक)

आशापाशविमुक्तानां । यत्सुखं शांतचेतसां ॥
कुतस्तद्धनलुब्धानामितश्चेतश्चधावताम् ॥१

भावार्थः—आशाबंधापासून सुटलेल्या शांतवृत्तीच्या पुरुषास सुख मिळतें, तें द्रव्यलोभामुळें सैरावैरा धांवणाऱ्या जीवाच्या वांट्यास कुठून येणार !

शांतीच्या गोष्टी बोलावयाच्या सोप्या आहेत; करून दाखविणें मुष्किलीचें आहे. मनुष्याची इहलोकची संसारयात्रा म्हणजे एक मोठाच बिकट प्रश्न आहे. कारण त्यांत दुरंत वैचित्र्य भरलेलें आहे. प्रत्येकाची कृति, आकृति, प्रकृति हीं सर्वच भिन्न. अशा परिस्थितींत संगतीचीं माणसें आपणास अनुकूल करून घेणें हें सुखाला अंशतः तरी साधनीभूत असतें. परंतु, तसें करणें तर प्रथम त्या माणसांच्या स्वभावाचें यथार्थ ज्ञान झालें पाहिजे; व मग त्यांचीं मनें वळविलीं पाहिजेत. आणि ही गोष्ट जबरदस्तीनें साधत नाहीं. कारण, जबरीनें माणसें अधिकच प्रतिकार करितात. उपदेश किंवा आज्ञा हींहि फारसें काम देत

नाहींत. तेव्हां, संवयीनें परस्परांचे वर्तनाचा सांधा जुळवून घेतला पाहिजे; दुसरा मार्ग नाहीं. ऐहिक जीवित हें एकादें उघडें चित्र किंवा ग्रंथाचें पत्र नसून, अनेक पृष्ठांचा किंवा अध्यायांचा तो एक सबंध ग्रंथच आहे; व त्याचा अर्थ उकलणें हें फार अवघड काम आहे. आपण हें अखिल विश्व मिळून एकच ब्रह्मांड समजतों. परंतु, एकपरी, अशीं अनेक ब्रह्मांडें आहेत. किंबहुना जितके पिंड तितकीं ब्रह्मांडें आहेत. व प्रत्येक व्यक्ति आपापलें वेगळें ब्रह्मांड आपणाभोंवतीं उभें करीत असते.

सुखप्राप्तीची इच्छा नाहीं असा एकहि मनुष्य आढळणें नाहीं. परंतु सुखप्राप्तीचें खरें साधन कोणतें हें थोड्यांसच माहीत असतें. पुष्कळ लोक क्षणिक मौजेकरितां कायम सुखाला आंचवतात. आयुष्यांतील पूर्वकालाचें खरें महत्त्व ध्यानीं न घेतां, जे त्याचा क्षणिक मौज करण्यांत व्यय करितात, त्यांना वृद्धापकालीं अश्रू ढाळण्याची पाळी येते. परंतु जे प्रथम कष्टाला न जुमानितां ऊन्ह, वारा, पाऊस सोसून पेरणी करितात, ते मग आनंदानें पीक घेतात. म्हणच आहे:"चणे खावे लोखंडाचे, मग ब्रह्मपदीं नाचे".

**सालोमन** म्हणतो कीं, " ज्यांनीं इंद्रियांचें लालन चालविलें त्यांचे कपाळीं आपत्ति बांधलेली

आहे. ज्यांचें चमचमीत फोडणीवांचून व घळ-घळीत दारूवांचून भागत नाहीं त्यांचे हातीं अखेर करवंटी यावयास चुकणार नाहीं". थामस ए. केम्पिस याचें म्हणणें तर याहीपलीकडचें आहे. तो म्हणतो, "तुम्हाला मी एक सत्य सांगतों तें ध्यानांत वागवा. तें सत्य हेंच कीं, या लोकीं चैनचानहि करावयाची आणि परलोकीं ईश्वराशीं सरूपताहि संपादावयाची, या दोन्ही गोष्टी एकत्र तुम्हांस कधींहि साधणार नाहींत. इंद्रियांचें लालन कराल तर परलोकाला मुकाल. इंद्रियांचें दमन कराल तर परलोकीं सुखी व्हाल". श्रीमद्भागवतांत म्हटलें आहे:—

( श्लोक )

कृच्छ्राय तपसे चेह । प्रेत्यानंत सुखायच ॥

**भावार्थ:**—इहलोकीं कठीण तप करावें, व परत्र अनंत सुख भोगावें.

**मोक्षमुल्लर** म्हणतो, "ज्याला सुखी कसें व्हावें हें साधत नाहीं, त्याच्यासारखा पापी कोणी नाहीं. सुखी होण्याची पहिली खुबी म्हटली म्हणजे अल्पानें संतुष्ट असणें ही होय". **पास्कल** नामक ज्ञाता म्हणतो, " प्रत्येक कामांत मर्यादा पाहिजे. आपल्या तृष्णेला किंवा आकांक्षेलाहि सीमा ही हवीच; नाहीं तर सुख होणार नाहीं. तेवढी असली म्हणजे सुखाची महागाई नाहीं. कारण, थो-

डीबहुत अनुकूलता आपणा सर्वांस असतेच. आणि सर्वसंपन्नता कोणासच मिळणार नाहीं, हें उघड आहे".

सुखी होण्याला दुसरी अवश्य गोष्ट म्हणजे अगोदर हें जग कशा प्रकारचें आहे याची पुरा-पुर ओळख पटवून घेणें ही होय. संसार म्हटला कीं त्यांत अनेक धक्केबुक्के, अनेक उलथापालथी, दशाविपर्यय हे येणारच; हें लक्षांत वागवून प्रत्येक संसारी जीवानें आयुष्यांत प्राप्त होणारे जयापजय, उत्कर्षापकर्ष, आशा-निराशा, साफ-ल्य-वैफल्य, आरोग्य-अनारोग्य, सुख-दुःखं, हर्ष-शोक इत्यादि द्वंद्वांशीं लढण्यास व त्यांपुढें हार न खाण्यास घट्ट होऊन बसलें पाहिजे. भगवं-तांनीं तरी प्रिय शिष्य अर्जुनाला गीतेंत युद्धारं-भीं हाच उपदेश केला. भगवान् म्हणतातः--

( श्लोक )

सुखदुःखे समे कृत्वा । लाभालाभौ जयाजयौ ॥
ततो युद्धाय युज्यस्व । नैवं पापमवाप्स्यसि ॥ १

भावार्थः--बाबारे, प्रथमच सुखदुःख, लाभहानि, ज-यापजय हे तुल्य लेखण्यास शिकून मग युद्धांत पड म्ह-णजे तुला पाप ( तदनुबंधि दुःख ) बाधणार नाहीं.

भगवंताचें म्हणणें हिशोबीच आहे. अगोदरच विषारी दांत पाडून टाकिल्यावर, सापाचे जा-भाड्यांत हात घालावा लागला म्हणून भय कशाला?

सेल्डन म्हणतो, "तुम्ही जंववर भूलोकीं आहां तंववर तेथें ज्या मिळून चांगल्या गोष्टी लाभतील त्यांचा उपयोग करून घ्या ( कारण, सृष्टिकर्त्यानें त्यासाठींच त्या निर्माण केल्या आहेत); कधींहि उद्विग्न किंवा खिन्नवृत्तीनें राहूं नका, व अखेर आपणास ईश्वरसान्निध्य प्राप्त करून घ्यावयाचें आहे या गोष्टीकडे ओढा असूं द्या". लबक म्हणतो, ज्यांना नरदेह ही अमोल देणगी आहे असें वाटत नसेल, ते त्या देणगीस सर्वथा पात्रच नाहींत, असें समजावें. येशू ख्रिस्त म्हणतो, " सुख हें कर्तव्यापासून प्राप्त होणारें फल आहे असें समजूं नका; तर सुख ( मानणें ) हेंच कर्तव्य आहे असें समजा ".

सुखाचें सर्वोत्तम साधन म्हणजे इंद्रियजय किंवा आत्मसंयम हें होय. टेनिसन म्हणतो:—

"आत्मरति, आत्मज्ञान व आत्मसंयम हीं तीन ज्यापाशीं आहेत त्यानें जगज्जय केला असें समजावें". 'आत्मजयी तो विश्वजयी' ही गोष्ट खोटी नव्हे.

या समर्याद जगांत कोणाची तरी दुसऱ्या कोणावर सत्ता किंवा ताबा असणारच. मग अन्य कोणाचा ताबा पत्करण्याऐवजीं, आपला आपल्यावर ताबा ठेवितां आला तर काय वाईट ? आपल्यावर आपणच देखरेख ठेवण्याचें मनांत आ-

णिलें तर सुधारणा हां हां म्हणतां होईल. कारण, दुसऱ्यानें कितीहि सख्त नजर राखिली, तरी पुष्कळ गैर गोष्टी आपण त्याजपासून लपवूं शकतों. परंतु, आपल्या गैर गोष्टी आपल्या नजरेंतून चुकणें शक्यच नाहीं. अर्थातच आपले अपराध आपण पावलो पावलीं ध्यानीं घेऊन खोडूं शकूं. व अशा रीतीनें स्वस्वामित्व संपादून दुसऱ्याच्या ताब्याची जरूरी उरूं न देणें हें दुसऱ्यावर स्वामित्व चालविण्यापेक्षांहि अधिक चांगलें आहे. साधेल तितक्या उत्तम प्रकारें आत्मसार्थक्य करणें हें प्रत्येक मनुष्याचें आद्य कर्तव्य आहे; मग त्यापायीं कोणीं आपणास आपस्वार्थी म्हटलें तरी हरकत नाहीं. शेक्स्पिअर म्हणतो:–

"आत्मोपेक्षेहून आत्मरति शतपट आदरणीय".

विद्वानांचें असें म्हणणें आहे कीं, मनुष्यांत कोणी विचारवश असतात व कोणी विकारवश असतात. याहून तिसरा वर्ग नाहीं. परंतु, विकारवश असणें मोठें दुर्दैव आहे. कारण, विकार हा मोठा लहरी मालक असल्यानें तो आपल्या बसांत वागणाऱ्या सेवकांना क्षणक्षणीं दुरंत विपत्तींत ढकलतो. आणि जो आत्मसंयमाचे असामर्थ्यामुळें विकारांचा गुलाम बनतो, त्याचे हातून पराक्रम तो कसला होणार? परंतु, ज्यानें विचारबलानें आत्मजय केला, तो, मनांत आणिल्यास

विश्वजयहि करूं शकेल. बरें, ज्याला स्वतःवर दाब ठेवितां येत नाहीं, अशावर दुसरा सहजच आपला दाब बसवितो. विकारांत क्रोध हा अग्रणी आहे. क्रोधिष्ट मनुष्याचें शांत मनुष्याशीं कधींहि पटावयाचें नाहीं. क्रोधासारखा आत्मघाती कोणी नाहीं. सेनेका म्हणतो, " पर्जन्यबिंदु जसे दगडावर वेगानें आदळू जातात, पण त्यायोगानें त्यांच्या स्वतःच्याच चिंध्या होतात; त्याप्रमाणें, क्रोधिष्ट मनुष्य दुसऱ्यावर उसळून जातो, पण उलट आपलाच घात करून घेतो. यासाठीं शहाण्यानें आपली वृत्ति केव्हांहि बेताल होऊं देऊं नये; व आपला क्रोध आपले ताब्यांत ठेवावा". बरें, खरें पाहील त्याला ही गोष्ट मोठी अवघडहि नाहीं. कारण, एकादे वादांत आपलें म्हणणें खरेंच आहे अशी जर आपली खातरी असेल तर आपणास रागावण्याचें प्रयोजनच नाहीं. बरें, आपलें म्हणणें जर चुकीचेंच असेल तर आपणास रागावण्याचा अधिकारच नाहीं. सेनेका म्हणतो, " मनुष्यजातीचें मूर्खपण पाहून डेमाक्रिटस हंसला; व हेराक्लिटस नामक दुसरा ज्ञाता रडला. परंतु, जे खरे ज्ञाते झाले, ते मनुष्यजातीवर तिचे मूर्खत्वाबद्दल कधीं रागावलेले म्हणून ऐकिवांत नाहीं ". भगवंतानीं गीतेंत या क्रोधाला फार शिव्या दिल्या आहेत. ते म्हणतातः—

( श्लोक )

( काम एष ) क्रोध एष । रजोगुणसमुद्भवः ॥
महाशनो महापाप्मा । विध्द्येनमिह वैरिणम् ॥ १

भावार्थः—हा क्रोध रजोगुणापासून उत्पन्न झाला असून मोठा खादाड व पापिष्ट आहे; बाबारे, हा तुझा कट्टा दुस्मान आहे असें समजून चाल.

जीवन्मुक्तिविवेकांत विद्यारण्य लिहितातः—

( श्लोक )

अपकारिणि कोपश्चेत् । कोपे कोपं न किं कुथाः ॥
धर्मार्थकाममोक्षाणामेकत्र परिपंथिनि ॥ १

भावार्थः—दुसरा कोणी तुझ्या सुखाआड आला म्हणून तूं त्याजवर संतापतोस, हें खरें ना ? मग मी तुला असें विचारितों कीं, ज्यानें तुझे अंगाची होळी करून सोडिली अशा या पाजी क्रोधावरच कां संतापत नाहीस ? कारण या क्रोधासारखा दुसरा अपकर्ता कोणीहि नाहीं. अरे, हा एकटाच तुझे धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चारी पुरुषार्थांना खाड्यांत घालण्यास बस्स आहे. याकरितां, याला टाळ.

लौकिकी म्हणहि आहे, कीं " रागा रागा भीक मागा ". याकरितां प्रत्येकानें आपला राग स्वाधीन ठेविला पाहिजे, व हें केवळ अशक्य नाहीं. ज्यानें मूळाक्षरें आपलींशीं केलीं, तो सारस्वत आपलेंसें करूं शकेल; व ज्यानें आत्मजय केला, तो विश्वजय करील. आतां आत्मजय करणें हें काम मूळाक्षरें आपलींशीं करण्याहून कितीतरी

अवघड आहे. मूळाक्षरें एकदां स्वाधीन झालीं कीं जन्माचीं झालींच, पण, आत्म्यावर अहर्निश पाहारा ठेवावा लागतो. कारण, इंद्रियें त्याला पदोपदीं फसवून अमार्गाला नेत असतात. म्हणून अखंड दक्षता लागते. साधु शीलनाथ म्हणत असतात:—" ए चव्वीस घंटेकी लढाई है ". बाकी, ही असाध्य नाहीं. यत्न पाहिजे, म्हणजे हींत प्रत्येकास यश येईल. आपणां सर्वांसच मोठे राजकार्यधुरीण, किंवा ललितकलाविशारद, किंवा तत्त्वकोविद होतां येणें शक्य नाहीं; परंतु आपणां सर्वांस भले मनुष्य होतां येणें सर्वथा शक्य आहे. आणि भलें होणें ही कांहीं अल्प महत्त्वाची गोष्ट नव्हे. एक फ्रेंच विद्वान् म्हणतो, " सद्‌गुणी किंवा दुर्गुणी होणें, हें प्रत्येकाचे स्वाधीन आहे; इतर गोष्टी ईश्वराधीन आहेत ". जगांत पहावें तों पुष्कळ लोक इतरांच्या नांवानें खडे फोडीत असतात. ते म्हणतात, ' काय करावें ? दुष्टाशीं गांठ पडली; त्यानें नाश झाला '. पण अशांनीं असें समजावें कीं, बाहेरील लोकांचे दुष्टपणानें मनुष्याचा इतका नाश होत नाहीं; परंतु अंतर्वृत्तीच्या दुष्टत्वामुळें किंवा पापीपणामुळें मात्र अनेकांचा समूळ नाश झाला आहे. श्रीकृष्ण गीतेंत सांगतात:—

( श्लोक )

... ... ... ... ... ..

आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ १

बंधुरात्मात्मनस्तस्य । येनात्मैवात्मना जितः ॥

अनात्मनस्तु शत्रुत्वे । वर्ततात्मैव शत्रुवत् ॥ २

भावार्थः—बाबारे, तुझा तूंच मित्र व तुझा तूंच शत्रु. ज्यानें स्वबलानें मन स्वाधीन ठेविलें, त्याचा आत्मा त्याला बंधुवत् साह्य करितो; परंतु ज्यानें मनोजय किंवा आत्मजय केला नाहीं त्याजवर त्याचा आत्माच शत्रुवत् उलटून पडतो.

आपण देवापुढें प्रार्थनेला बसलों, म्हणजे म्हणतों, ' देवा, मला मोहांत किंवा अमार्गांत पाडूं नको'. परंतु व्यवहारकालीं, खरें बोलूं जातां शेंकडा नव्याणव ठिकाणीं, हृदयस्थ देव आपणास सावध करीत असतांहि त्याचे सूचनेकडे दुर्लक्ष करून आपण आपखुषीनेंच स्वतःस मोहांत पाडून घेतों. कॅल्डेरान नामक गृहस्थानें एक कादंबरी लिहिली आहे, तींतील नायक प्रथम एका विचित्र पिशाचाला पाहून क्षणक्षणीं भितो व बावरतो असें दाखविलें आहे; परंतु, पुढें जेव्हां तें गूढ दूर झालें, तेव्हां त्या नायकाला आढळून आलें कीं आपण ज्या पिशाचाला भीत होतों तें पिशाच म्हणजे आपले देहाची छायाच आहे, दुसरें कांहीं नाहीं. समर्थ रामदासानीं म्हटलें आहे:—

( अभंग )

वाजे पाऊल आपुलें । म्हणे मागें कोण आलें ॥

सारांश, आपलें तारण किंवा मारण, सुख किंवा दुःख, आपलेच हातीं आहे.

मिसेस ब्रौनिंग ही बाई म्हणते कीं, "आपण उगवला दिवस कसाबसा लोटीत असतों; परंतु, लोखंड जसें ऐरणीवर घणांनीं ठोक ठोकून इष्ट आकाराला आणावें लागतें, त्याप्रमाणें आपले मनालाहि ठोक ठोकून प्रथम योग्य आकार दिला पाहिजे व मग इतर गोष्टी केल्या पाहिजेत, हें आह्मी जाणत नाहीं". एका कवीनें म्हटलें आहेः—

( पद )

आधीं मन मुंडा बा, मन मुंडा ॥ मग तुम्ही स्वहिताचि धुंडा॥

तें सर्वथा खरें आहे. आतां हें खरें कीं, मन हें अति द्वाड किंवा अति कठिण आहे व सुखानें तें आकारास येत नाहीं. परंतु, मिसेस ब्रौनिंग म्हणते, " लोखंड किंवा दगड हे कठिणच आहेत, तरी तेहि दृढ आघातानें आकारास आणितां येतात; त्या अर्थीं मनापेक्षां दृढतर अशी जी निश्चयात्मिका बुद्धि हिच्या सतत व्यापारानें मनालाहि वळणावर आणितां येणें अशक्य नाहीं".श्रीभगवान् म्हणतात:——

( श्लोक )

असंशयं महाबाहो । मनो दुर्निग्रहं चलं ॥
अभ्यासेन तु कौंतेय । वैराग्येण च गृह्यते ॥ १

शनैःशनैरुपरमेत् । बुध्दया धृतिगृहीतया ॥

... ... ... ... ... ...

—श्रीमद्भगवद्गीता

भावार्थः–हे महाबाहो पार्था, मन हें तूं म्हणतोस तसेंच मोठें चंचल व द्वाड आहे. तथापि, वैराग्य व दृढाभ्यास यांचे योगानें आस्ते आस्ते तें आपले कह्यांत आणितां येतें. बुद्धिपुरःसर धैर्यानें या मनोवारूचा लगाम हळूहळू खेंचित गेलें म्हणजे इष्टसिद्धि होते.

साधु तुकारामहि म्हणतातः–

( अभंग )

असाध्य तें साध्य करितां सायास ॥
कारण अभ्यास तुका म्हणे ॥

मोठमोठ्या ज्ञात्यांपैकींहि कोणी कोणी म्हणतात कीं, बरें-वाइटाचें माणसाचे हातीं काय आहे ? कर्ता करविता सर्व परमेश्वर आहे. चोरहि त्यानेंच केला, सावहि त्यानेंच केला. परंतु, हें म्हणणें एकदृष्टि आहे. अनुभव पहातां, ज्याचा तोच आपणास बरे-वाईट मार्गानें वागवितो. चोर चोरी करूं निघाला असतां ‘ आपण पापकृत्य करीत आहों ’ असें त्याचें मन त्याला सांगण्यास कधीं चुकत नाहीं; तथापि, तो मनाला गुरफाटून ठेवून, उन्मार्गगामी होतो; मग देवाकडे काय दोष उरला ? श्रीकृष्णानीं गीतेंत या कामीं खुला खुला अभिप्राय दिला आहे. ते म्हणतातः—

( श्लोक )

नादत्ते कस्यचित् पापं । न चैव सुकृतं विभुः ॥
अज्ञानेनावृतं ज्ञानं । तेन मुह्यंति जंतवः ॥ १

भावार्थः–परमेश्वराचा कोणाचे दुष्कृताशीं संबंध नाहीं आणि सुकृताशींहि नाहीं. हा सगळा जीवांचे अज्ञानाचा खेळ आहे.

लबक म्हणतो, इंग्रजलोकांना आपल्या अप्रतिहत स्वातंत्र्याचा मोठा अभिमान वाटतो. पण, स्वातंत्र्य दोन प्रकारचें आहेः–खोटें व खरें. मनसोक्त वागण्यास मोकळीक असणें, हें स्वातंत्र्य खरें नव्हे. तर शास्त्रविहित जें कर्तव्य म्हणून आहे तें अनियंत्रितपणें पूर्णतेस नेण्याची मोकळीक असणें हेंच खरें स्वातंत्र्य. कोणी म्हणेल, मी उघड्या दिवसा शेजाऱ्याचे घरांत घुसतों तरी मला कोणी आड येऊं पावत नाहीं; आहें कीं नाहीं मी स्वतंत्र ?—तर त्याला उत्तर हेंच कीं, बाबारे, ह्याला सुज्ञलोक स्वातंत्र्य म्हणत नाहींत. स्वातंत्र्य ही जर उंची वस्तु मानिली आहे, तर ती दुसऱ्याला अपकारक असणें हें संभवत नाहीं; करितां हें स्वातंत्र्य नव्हे. आगगाडी चालली असतां तिला कोणी आड येऊं पावत नाहीं; परंतु तीहि रूळ सोडून जात नाहीं. व यामुळें तिची गति उपकारक होते. त्याचप्रमाणें, यथानीति चालण्याला अटकाव नसणें, हेंच खरें स्वातंत्र्य; व हेंच हितकारक होय.

कांहींकांचा समज आहे कीं,कसेंहि करून विपुल संपत्ति मिळवावी. कारण, संपत्तीपोटीं स्वास्थ्य मिळतें, व स्वास्थ्याअंगीं सौख्य प्राप्त होतें. पण हें सौख्य कसल्या प्रकारचें हें ते पहात नाहींत. जगांत जी घोड्याएवढी चूक होत आहे ती ह्या सौख्याच्या सत्यमिथ्या स्वरूपांविषयीं आहे. दोघांनाहि ' सौख्य ' हा एकच शब्द लावितात; परंतु, सत्यसुख किंवा सात्त्विकसुख आणि मिथ्या किंवा असात्त्विक सुख यांत अंतर केवढें आहे, हें कोणी तपाशीत नाहींत. नुसत्या शब्दसाधारण्याला काय करावें? 'खद्योत' शब्द काजव्यालाहि लावितात व सूर्यालाहि लावितात; तथापि काजवा व सूर्य यांचे योग्यतेंत जमीन-अस्मानाचें अंतर. तसाच प्रकार सत्य व मिथ्या सौख्यांत आहे. मिथ्या-सौख्यें आपातरमणीय परंतु परिणामविरस असतात; सत्य किंवा सात्त्विक सौख्यें आरंभीं नीरस, परंतु परिणामरमणीय असतात. भगवंत गीतेच्या अठराव्या अध्यायांत म्हणतातः—

( श्लोक )

... ... ... ... ... ...

अभ्यासाद्रमते यत्र । दुःखांतं च निगच्छति ॥ १
यत्तदग्रे विषमिव । परिणामेऽमृतोपमम् ॥
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ २
विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमं ॥

परिणामे विषमिव। तत्सुखं राजसं स्मृतं ॥ ३
यदग्रे चानुबंधे च। सुखं मोहनमात्मनः ॥
निद्रालस्यप्रमादोत्थं। तत्तामससमुदाहृतम् ॥ ४

भावार्थः—जें सुख तोंडीं विषाप्रमाणें कडू लागतें, पण शेवटीं अमृततुल्य मधुर लागतें; ज्याची गोडी आस्ते आस्ते लागते, परंतु एकदां गोडी लागून जें पचनीं पडलें म्हणजे दुःखाचा शेवटच करितें, त्या सुखाला **सात्त्विक सुख** म्हणतात. हें अंतःप्रसन्नतेपासून प्राप्त होत असतें. जें सुख तोंडीं अमृततुल्य, परंतु अखेर विषतुल्य घातक होतें, व जें इंद्रियांचा विषयांशीं संयोग झाल्यापासून उत्पन्न होतें, त्याला **राजस सुख** म्हणतात. या दोहोंहूनहि तिसरें **तामस** म्हणून एक सुख आहे. हें आदिअंतीं सारखेंच असतें; व आत्म्याला भुरळ घालतें. आणि हें निद्रा, आलस्य, किंवा प्रमाद यांपासून उद्भवतें.

भगवंतांचें म्हणणें ठीकच आहे. त्रिफळ्याचें चूर्ण प्रथम तुरट, कडवट असें लागतें; पण अभ्यासानें तोंडीं पडलें म्हणजे देह अजर करून सोडितें. हाच स्वभाव सात्त्विक-सुखाचा आहे. माजूम, याकुती, श्रीखंड हे पदार्थ पहिले तोंडींच गोड लागतात. पण अखेर अकालमृत्यु आणितात. कंडू येऊन मनुष्य बोटांत बोटें घालून मर्दू लागला म्हणजे प्रथम गोड गोड वाटून सुख होतें, परंतु अखेर भगभग सुटून खरूज उठते. हाच प्रकार असात्त्विक सुखाचा जाणावा. म्हणून शहाण्यानें या सत्य-मिथ्या कसोटीनें सुखांची पारख करून मग त्यांचा संग्रह करावा.

अल्फ्रेड आस्टिन यांचें मत असें आहे कीं, शांतता व एकांत यांचें सौख्य केवळ अनिर्वचनीय आहे. शेक्सपिअर म्हणतो, " निःशब्द-शांति ही सुखाची जननी आहे ". एपिक्यूरसच्या मतें " सभ्यतेनें, न्यायानें व शहाणपणानें वागणें हेंच सौख्य आहे; व अशा प्रकारें जो वागेल तो सुखी झालाच पाहिजे ". असे सौख्याचे स्वरूपाविषयीं विद्वानांचे भिन्न अभिप्राय आहेत.

याचविषयीं ख्रिस्ती देशांत एक मौजेची पौराणिक दंतकथा आहे. ती अशी कीं:—एकदां देवांनीं मनुष्यांना एक दिवस नेमून दिला, व सांगितलें कीं या दिवशीं आह्मी सर्व पार्थिव किंवा भूलोकींच्या सुखांची तुम्हांस वांटणी करून देणार आहों. याकरितां सर्वांनीं या दिवशीं हजर राहून ज्याला जो मानेल तो भाग उचलावा. याप्रमाणें जाहीर केल्यावर लवकरच नेमलेला दिवस आला. येतांच मनुष्यांच्या उड्या पडल्या. कित्येकांनीं विपुल धान्य देणारी शेती घेतली. ज्यांना व्यापारउदीमाची आवड होती, त्यांनीं खुष्कीचे मार्ग व समुद्र यांचें स्वामित्व मागून घेतलें. जे कंदमूलप्रिय असे साधुवृत्तीचे होते त्यांनीं द्राक्षादि वल्ली लावण्याच्या सोईच्या उतरणीच्या जमिनी मागितल्या. सरदार वगैरे जे

मृगयाप्रिय होते, त्यांनीं श्वापदें मिळावीं म्हणून निबिड अरण्यें व वनराजी पत्करिल्या. राजेलोकांनीं कर घेण्याकरितां नाकीं बसविण्याच्या सोईचे पूल, घाट वगैरे घेतले. याप्रमाणें सगळी वांटणी उरकली. तों नंतर कविराज तेथें आले. हे इतकावेळपर्यंत एकांत मननांत गुंतले असल्यामुळें त्यांना देवतांच्या जाहिरातीची आठवणच नव्हती. ती झाली तेव्हां ते आले. परंतु, आतां येऊन काय फळ? वांटणी खलास झाली. तें पाहून त्यानीं कपाळावर हात मारून शोक मांडिला. पण, द्यायाला शिल्लकच कांहीं उरलें नव्हतें, तिथे देवांनीं तरी काय करावें? तेव्हां देव कविराजांना म्हणाले, आमचेजवळ आतां आपणास देण्याला तर कांहीं उरलें नाहीं, हें तुम्ही पाहतांच. पण, आम्हीं तुमचेसाठीं एवढें करतों:—“ आम्हीं या नीलवर्ण आकाशांत रहात असतों. येथें तुमची केव्हांहि लहर लागेल तेव्हां तुम्ही खुशाल येऊन आम्हांसमेत वाटेल तितका वेळ रहात जा. तुम्हाला मुभा आहे. आमचे दरवाजावर तुम्हाला केव्हांहि मज्जाव होणार नाहीं”. कविराजानीं मान डोलवून, देवांचे देणगीचा स्वीकार केला. परंतु, तिचा उपयोग करून घेण्याचें त्यांना केव्हांहि प्रयोजनच पडलें नाहीं. कारण, ते जेव्हां जेव्हां सांसारिक चिंता सोडून

एकांतांत व आत्मानंदांत बसत, त्या वेळीं तें सं-
कल्पाबरोबर स्वर्गसुख आपल्या भोंवतीं खडें
करीत. मग ते इतक्या दूर अंतरावर कशाला
जातील ? म्हणच आहे, "जें न देखे रवि, तें
देखे कवि". प्रतिसृष्टिकर्तेच ते, त्यांना उसन्या
स्वर्गाची काय चाड ? जगन्नाथराय म्हणतातः—

( श्लोक )

किं सेव्यते सुमनसां मनसाऽपि गंधः ।
कस्तूरिकाजननशक्तिभृता मृगेण ॥

—रसगंगाधर

भावार्थः---ज्याला स्वतःच कस्तूरी निर्माण करण्याचें सामर्थ्य आहे, असा कस्तूरीमृग पुष्पादिकांचे सुवासाची स्वप्नांत तरी कशाला इच्छा करील ?

आतां ही गोष्ट खरी कीं, आपणा सर्वांसच कवि-
राज होतां येणार नाहीं. तथापि, आजकाल ज्ञानाचा
उत्कर्ष इतका झाला आहे कीं देवतांनीं कवीला
ज्या नील अंतरिक्षांत अप्रतिबंध संचार करण्या-
ची परवानगी दिली, तें प्रशांत रमणीय अंतरिक्ष,
आह्मांसहि विहारास अगम्य नाहीं; मात्र, यत्न
पाहिजे. आपण सर्वच मोठे, अधिकारी, सत्ताधीश,
समृद्ध किंवा बृहस्पति होऊं शकणार नाहीं, हें
खरें; तथापि आपण सर्वहि सुखी व भले होऊं
शकूं यांत संशय नाहीं. आपले मनांत पाहिजे
म्हणजे जीवित दिव्य व रमणीय असें आपणांस

करितां येईल. मात्र त्या कामीं बिनकसूर यत्न झाला पाहिजे. कारण, आपण कांहीं जन्मतःच सर्वगुणपूर्ण उपजत नाहीं. आपणांत पुष्कळ उणीवा असतात. लहान मुलें नुसतीं अश्राप असतात; पण सद्गुण कशाला म्हणतात तें त्यांना ठाऊकहि नसतें. सद्गुणांचा संग्रह बुद्धिपुरःसरच करावा लागतो. बाकी, कोणाला दुर्गुणाचें आनुवंशिक वळण असलें तरी, तो जर इमानानें दृढयत्न करील, तर तोहि तें वळण खोडून टाकून सद्गुणी व सुखी होऊं शकेल. कारण, याला कांहीं अलौकिक बुद्धिमत्ता लागते असें नाहीं; सच्छीलाची प्रीति असली म्हणजे झालें. आणि शील नसेल तर नुसती बुद्धिमत्ता फुकट आहे. रूसो हा अलौकिक बुद्धिमान् होता; परंतु तो आयुष्यांत सुखी म्हणून झाला नाहीं. बरें, याचें कारण शोधूं जातां असें आढळतें कीं, त्याचा अहंकार व आत्मश्लाघा हीं त्याच्या सुखाआड आलीं.

आपण कितीहि केलें तरी आयुष्यांत आधि व व्याधि, शोक व दुःख यांचे प्रसंग हे येणारच, हें खरें. तथापि, लोक त्यांचे नांवानें जितकी ओरड करितात, तितकी केवळ खरी नाहीं. शिवाय पुष्कळ लोक क्षुल्लक गोष्टींवरून नसतें दुःख करून घेतात. गोल्डस्मिथनें म्हटलें आहे कीं,

एकाद्या श्रीमंत स्त्रीचा हातरुमाल किंवा उत्संग-श्वान नाहींसा झाला कीं वेडा कवि घरीं जाऊन त्या श्रीमतीवर ओढवलेल्या दुर्धर प्रसंगावर काव्य-रचना करितो ! लग्नांत विहिणीचें इवलेतिवल्यानें कमी पडलें कीं रडून रोवून ती सगळ्यांना बेजार करिते. खरोखर पाहतां, मनुष्यें जर सुखदुःखांचें तुलनापूर्वक मनन करतील तर त्यांना दुःखाबद्दल एवढी हाकाटी करवणार नाहीं. परंतु दुनियेची चाल उलटी आहे. एकाद्याला वर्षांतून एक दिवस ताप, कपाळदुखी किंवा पोटदुखी किंवा इतर कांहीं व्याधि येऊं द्या, कीं तो लागलाच देवाचे नांवानें दगड घालायला ! पण, तो असा विचार करीत नाहीं कीं तीनशें चौसष्ट दिवस दे-वानें सुखाचे दिले होते त्याबद्दल उपकार स्मरा-वयाचे तें आपण कधीं केलें नाहीं; पण एक दि-वस ताप येतांच त्यावर बेअब्रूची फिर्याद घेऊन उठलों, हा अन्याय नव्हे काय? परंतु माणसांचा समजच असा दिसतो कीं सुख असणें यांत वि-शेष तें काय? तो आपला हक्कच आहे. दुःख येणें हा मात्र अन्याय किंवा दैवी जुलूम आहे ! वास्तविक हा समजच अन्यायाचा आहे. शिवाय, आपण ज्याचे नांवानें दुःख दुःख म्हणून रडतों, तें सर्वदाच अनर्थावह असतें असें नाहीं. पुष्क-ळदां दुःख आपल्याला चिमटा घेऊन सावध

करितें. जगांत जर दुःख मुळींच नसतें, तर आह्मीं गाफील राहून अल्पवयांतच प्राणास मुकलों असतों. पण आपण बेहोषपणानें भलतीच गोष्ट केल्यास तत्काळ दुःखाचा फटकारा बसतो म्हणून आपण शुद्धीवर येतों, आणि मग जपून चालूं लागतों. हे दुःखाचे उपकार नव्हत काय? लहानपणीं ज्यांच्या डोळयांत दारिद्र्यांजन पडलेलें असतें अशांपैकीं पुढें बरेच लोक उदयास येतात व गर्भश्रीमंतांतले बहुतेक तथातथाच निवटतात, असा अनुभव येतो; यांतील रहस्य तरी हेंच आहे. शारीरिक व्याधींप्रमाणेंच मानसिक आधीहि पुष्कळदां मानसिक उपकारकच होतात.

कांहीं लोक आगामी दुःखाबद्दलच्या कल्पनेनेंच अगाऊ हैराण होतात. पण हें वेडेपण आहे. सावध रहावें पण हैराण पडूं नये. आतां, दुःख येऊन आदळलें तरीहि मन गडबडूं न देतां येणें हें अवघड आहे खरें; पण गडबडूं देणें हें तरी वेडेपणच आहे. तशानें परिहार न होतां उलटें दुःखास अधिक साह्य मात्र होतें. त्यापेक्षां मन शांत ठेवून आलेलें संकट परिहारक्षम आहे कीं नाहीं, याचा पूर्ण विचार करावा. परिहार्य असेल तर गडबडण्याचें कारणच नाहीं; म्हणून न गडबडतां त्याचे परिहारासच लागावें. परिहार्य नसेलच, तर गडबडूनहि फायदा नाहीं

हें जाणून ईश्वरावर हवाला टाकून स्वस्थ तरी रहावें. आयुष्यांतील पुष्कळ प्रसंग हे, खरें पाहतां आपल्या परिक्षेसाठीं असतात. यासाठीं न डगमगतां त्यांत टिकाव धरणें हाच पुरुषार्थ आहे.

दुःखशोकाचें प्रधान कारण पाप हें होय. कित्येकांचा समज आहे कीं पश्चात्तापानें पापाची शुद्धि होते. परंतु ही चूक आहे. अनुतापानें निवृत्ति होईल, पण हातून घडून गेलेल्या पातकाचा परिणाम नुसत्या पश्चात्तापानें कधींहि दूर होणार नाहीं. कर्माचा कायदा मोठा बेमुरवत आहे. तो कांहीं रदबदली ऐकत नाहीं. बऱ्या कर्माचें बरें, व वाईट कर्माचें वाईट फल हें कर्ता भोगील तेव्हांच सुटेल. "प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः" हा शास्त्राचा स्थिर सिद्धांत आहे. भारतांत म्हटलें आहे:—

( श्लोक )

यथा धेनु सहस्रेषु । वत्सो विंदति मातरम् ॥
तथा पूर्वकृतं कर्म । कर्तारमभिगच्छति ॥ १

**भावार्थः**—ज्याप्रमाणें हजारों हजार गाईंच्या कळपांतून वासरूं आपले आईला नेमकें जाऊन भिडतें, त्याप्रमाणें पूर्वकर्म ( बरें वा वाईट ) आपल्या कर्त्याला नेमकें हुडकून काढतें.

शंकराचार्य म्हणतात कीं, धनुष्याचा सुटलेला बाण लक्ष्यवेध करील तेव्हांच थांबतो, तोच

प्रकार कर्माचा आहे. आता, पुण्यपापाबद्दल फिच म्हणतो कीं, "जें सुखावह होईल तेंच पुण्य, असें लोक समजतात; परंतु माझे मतें जें पुण्य तें सुखावह होणारच हा सिद्धांत खरा आहे. म्हणून आचरणसमयीं क्रियेच्या स्वरूपाकडे लक्ष द्यावें, केवळ फलाकडे पाहूं नये". पण जग बहुधा फलावर दृष्टि देतें. इतकेंच नव्हे, तर क्रिया वाईट करून फल मात्र बरें व्हावें अशी लोक इच्छा करितात. विद्यारण्य म्हणतातः—

(श्लोक)

पुण्यस्य फलमिच्छंति । पुण्यं नेच्छंति मानवाः॥
न पापफलमिच्छंति । पापं कुर्वंति यत्नतः ॥ १

—जीवन्मुक्तिविवेक

**भावार्थः**—लोक पुण्य न करितां पुण्याचें फल मात्र इच्छितात. बरें, पापाचें फल तेवढें मिळूं नये असें इच्छितात आणि पापाचरण मात्र हटकून करीत असतात! पण, कुचल्याचें झाड लावून बदामफळें मिळावीं कशीं, हें पहात नाहींत.

कांहीं लोक म्हणतात, सुख आणि शांति हीं दैवांत असलीं तरच मिळतील. यत्नानें मिळणार नाहींत. परंतु, सर फ्रेडरीक म्हणतो, "जे कच्च्या दिलाचे लोक असतात, ते दैवाची सबब सांगत असतात. मी दैवाचे तोंडाकडे कधींहि पहात नाहीं. कारण, दैव हात देईल म्हणून जो प्रतीक्षा करीत बसला, त्याला हाताऐवजीं घात मात्र

प्राप्त होईल ". टिमोथिस नांवाचा एक ॲथी-निअन होता त्याला यश हें कशांत नसे;कारण अंगीं कर्तबगारीच तेवढी. परंतु तो जेव्हां आपले कारकी-र्दीचा लोकांना हिशोब देऊं लागला, तेव्हां पदोपदीं म्हणे कीं, ' हें काम फसलें, कारण दैवच प्रति-कूल होतें '. हितोपदेशांत म्हटलें आहे:—

" दैवमिति कार्याक्षमाणां केषांचिदालस्य वचनं "

किंवा—

( श्लोकचरण )

दैवेनदेयमिति का पुरुषा वदंति ।

**भावार्थः**—दैवानें द्यावें असें रडे पुरुष म्हणत असतात.

परंतु वाग्भट म्हणतोः—

( श्लोक )

" बली पुरुषकारोहि। देवमत्रातितिरिच्यते ॥

**भावार्थः**—पुरुषयत्न दांडगा असला म्हणजे तो दैवाचेहि छातीवर पाय देतो.

लबक म्हणतो, दैवावर विश्वास असला म्हणूनहि कांहीं चुकलें नाहीं; उलट, ती एक मोठी मदत आहे. नेपोलिअन बोनापार्ट म्हणे:- "सुदैवावरील विश्वास ही मोठीच शक्ति आहे. ती उत्साहवर्धन करिते". दैव आपणास साह्य आहे, असा मनाला भरवंसा असला म्हणजे विलक्षण धैर्य येतें. परंतु केवळ दैवाचे तोंडाकडे पहात ब-सून कोणत्याहि कामांत छाती न करणें अशानें

कांहीं होणार नाहीं. दैव हें आपणास अलबत साथी होणारच असें मानून दांडगा यत्न करावा, म्हणजे कदाचित् दैव जरी कांहीं वेळ अंग चोरीत असलें तरी लौकरच निमूट सेवेस सादर होतें.

आमच्या या भरतखंडांत तर दैववादाचे पक्षपाती फारच आहेत. व या वादानें यत्नपरतेला बरेंच शैथिल्यहि आणिलें आहे. परंतु, या सर्वांला हेतु दैववाद नसून, दैव शब्दाच्या परमार्थज्ञानाचा अभाव हाच होय. दैव म्हणजे काय हें जर लोक खरें खरें समजून घेतील तर केवळ यत्नवादी अशीं जीं पाश्चात्य राष्ट्रें आहेत त्यांपेक्षांहि उद्योगपरतेला जोर चढेल. परंतु डोळे उघडून पहातो कोण, आणि शोध करितो कोण? शास्त्रानें दैवाची लख्ख व्याख्या दिली आहे कीं—

( श्लोक )

पूर्वजन्मकृतं **कर्म** । तद्दैवमिति कथ्यते ॥

**भावार्थः**--बाबारे, तूंच जें पूर्वी केलेलें **कर्म** त्यालाच दैव म्हणतात.

किती खरी व निर्मळ व्याख्या ही! आणि ही व्याख्या पत्करील त्याला श्लथप्रयत्न कसें होतां येईल, हेंच आह्मांस कळत नाहीं. ' भरलें कोठार आयतें उपसून खातो ' असें जरी म्हटलें तरी, मूळ यत्न केला तेव्हांच तें भरलें गेलें, हें उघड नाहीं काय? कोणी म्हणतात,

' नानासाहेबांचें ठीकच आहे. महिन्याचे महिन्यास पेनशन येतें आहे, मजा मारिताहेत '. परंतु हे बोलणारे असा विचार करीत नाहींत कीं, हें पेनशन आलें कुठून ? नानासाहेबानीं पूर्वीं तीस वर्षें हाडें झिजविलीं, तेव्हांच ना पेनशन दिसलें ? मग दैववादानें आयतोजी-पणाला सवड ती कुठे आहे ? कोणी म्हणेल, ' दैववानाला आयतेंच मिळतें, निदान दुसऱ्यानें यत्न करून त्यास मिळतें '; तर हें म्हणणें साफ चुकीचें आहे. कारण दैवाचा कायदा फारच दुरुस्त व कडक आहे. तेथें लडथड नाहीं, वशिला नाहीं. म्हणच आहे, ' ज्याचें कुडें, त्याचेंच पुढें '! बरें, दैव-वादी देखील ' काय करावें, माझें दैव ! ' असेंच म्हणतो, पण आपले शब्दांचा अर्थ मात्र करून पहात नाहीं. तुझें दैव ना ? मग तुझें या षष्ठीचा अर्थ काय ? व्याकरणांत पहा बरें. षष्ठीचा मुख्य अर्थ स्वस्वामिभाव किंवा जन्यजनकभाव असा आहे खरा ना ? मग तुझें दैव म्हणजे तूं ज्याचा स्वामी किंवा जनक आहेस तें ( तुझें ) पूर्वकर्म असा स्पष्टार्थ झाला नाहीं काय ? मग स्वामी होऊन सेवकाला डरणें, या पौरुषाला काय म्हणावें? अर्थात् खरा दैववाद यत्नाला शैथिल्य आणीत नाहीं; तर उलट, तूं करशील त्याचें फळ अचूक तुला प्राप्त होईलच होईल असें आश्वा-

सन देतो. आणि हें रहस्य जे ज्ञाते जाणतील ते दैववादानें आळशी न बनतां उलट दृढोद्योगी बनलेच पाहिजेत. आपण मोठ्या समृद्ध व मनोरम सृष्टींत रहात आहों खरे; परंतु दृढ प्रयत्नावांचून या जगांतील एकहि चांगली वस्तु हातीं येणें शक्य नाहीं. कोणी एक कवि म्हणतो:—

( श्लोक )

अनुद्योगेन तैलानि । तिलेभ्यो नाप्तुमर्हति ॥

**भावार्थः**–उद्योगावांचून तिळांतलें तैलहि निघत नाहीं.

हें जग रत्नपूर्ण आहे, परंतु तीं रत्नें तरी खाणींतून खणून काढावीं तेव्हां. आयतें जांबूळ तोंडांत पडावें अशी योजना येथें नाहीं. उद्योग, दृढोद्योग,–अखंड, अप्रतिहत, अजिंक्य प्रयत्न हाच या जगांत यशदायी आहे. विघ्नें हीं यावयाचींच; पण, त्यांचे नरडीवर पाय देऊन उद्योग चालविला पाहिजे, तेव्हांच सुखसमृद्धि माळ घालतील. आमचे योगशास्त्रांत राजयोग, हठयोग, लययोग इत्यादि अनेक प्रकारचे योग सांगितले आहेत; परंतु प्रस्तुत लेखकाचे मतें 'उद्योग' हा या सर्व योगांहून श्रेष्ठ आहे. हा केवळ चिंतामणीच आहे. कारण उत्+योग, अर्थात् उत् म्हणजे वर किंवा उत्कर्षास नेणारा जो योग तो, असें जर स्पष्ट आहे, तर याहून आणखी काय

हवें ? बरें, हा चिंतामणी अमक्यास प्राप्त आहे आणि अमक्यास नाहीं,असा पंक्तिप्रपंच येथें नाहीं. राजापासून रंकापर्यंत, लहानापासून मोठ्यापर्यंत प्रत्येकास हा साध्य आहेः–नव्हे, प्रत्येकाचे हातांत आहे. असें असतांहि जे दीन रहातील त्यांस करंटे म्हटलें पाहिजे; दुसरें काय म्हणावें?

ज्या परमचतुरानें ही विचित्र सृष्टि निर्माण केली, त्यानें उद्योगावांचून कांहीं मिळूं नये अशी बुद्धिपुरःसर योजनाच केलेली आहे. साधी गोष्ट, शेती घ्या ना. शेती सोनें पिकवील; पण अंगमेहनत केल्यास. म्हणच आहे, 'जात शेती नाहीं तर माती'. हाच न्याय यावत् स्थळीं. परंतु कोणतेहि वस्तूच्या प्राप्त्यर्थ कष्ट करावे लागणें हें जरी अवश्य ठेविलें आहे, तरी ईश्वरी योजना ती;–ती कधींहि दोषावह असायचीच नाहीं. अर्थातच त्या सदय व चतुर जगत्पित्यान अशी कांहीं खुबी केली आहे कीं, कष्टांतच सुख ठेविलें आहे. तेंहि गुळवेलीचे वरकांती कडूपणांत जसें अंतर्यामीं अमृत ठेविलें आहे, तशांतलें नव्हे; तर गोदुग्ध जसें पितानांहि गोड व परिणामींहि गोड, तसेंच कष्ट, श्रम, व्यायाम किंवा अंगमेहनत–कांहीं नांव द्या–हीं स्वतःहि गोड व फलरूपानेंहि गोडच गोड. वाग्भट व्यायामासंबंधानें म्हणतोः—

( श्लोक )

लाघवं कर्मसामर्थ्यं । दीप्तोऽग्निर्मेदसः क्षयः ॥
विभक्त घनगात्रत्वं । व्यायामादपजायते ॥ १

—अष्टांगहृदय

**भावार्थः**—व्यायामाचे योगानें अंग फुलासारखें हलकें होऊन कोणतेंहि काम करण्यास शक्ति व चलाखी येते. अग्नि प्रदीप्त होऊन, मेद झडून जातो व सर्व गात्रें सप्रमाण विभागलीं जाऊन ठेंचून भरल्यासारखीं दणगट होतात.

केवढा फायदा हा ! बरें, व्यायामानें किंवा उद्योगानें शरीरच साफ रहातें असें नव्हे, तर मनहि साफ रहातें. इंग्रजींत एक म्हण आहे कीं " निरुद्योग्याचें मन हें सैतानाचें ( नासक्या कुजक्या विचारांचें ) क्रीडास्थान आहे ". हें म्हणणें सर्वथा खरें आहे. सारांश, प्रत्येक वस्तु श्रमसाध्य ठेवण्यांत त्या करुणामूर्तीनें जीवमात्रास दुहेरी सुखी करण्याची योजना ठेविली आहे. अशा परमेश्वराचे आभार तरी किती मानावे ! एक ब्राह्मण आम्रवृक्षाचे आळ्यांत पितृतर्पण करीत बसला असतां दुसऱ्यानें विचारिलें, ही जागा काय पाहिलीत ? ब्राह्मणानें उत्तर केलें:—

( श्लोक )

आम्राश्च सिक्ता पितरश्च तृप्ताः ।
एका क्रिया व्द्यर्थ करी प्रवृत्ताः ॥

**भावार्थः**—आंब्यालाहि पाणी मिळालें; पितरहि तृप्त झाले. एकाच क्रियेनें दोन फायदे साधले.

वरील प्रकार ईशकृतींत सर्वत्र आहे. नाक हा मुद्रेचा प्रधान अलंकार असून शरीरांतील मलसफाईचेंहि एक द्वार आहे. निद्रा, जिला आपण ' सुखाची सोयरी ' असें म्हणतों, ती देखील श्रमसाध्य आहे. श्रमांनीं तिला गोडी चढते. दिवसभर कष्ट करणारे लोकांना सदैव गाढ व मधुर निद्रा येते. परंतु दिवसभर लोडाशीं रुळणाऱ्या दोंदिलाचा ती बहुतेक कंटाळाच करिते. बरें, निद्रा ही अमृततुल्य खरी; पण या समर्याद जगांतील प्रत्येक वस्तूप्रमाणें तिलाहि मर्यादा असलीच पाहिजे. झोंपच झोंप घेत राहिलें, तर तिचें अमृतमयत्व नासून तीच विषमय होते. इंग्रजींत पुढील अर्थाचें एक म्हणणें आहे:–"अजून थोडीशी–उगाच एक चुटका–सरती सरती गुलाबी–फार नाहीं अखेरचा गोड घांस–थोडीशी साखरझोंप, असें म्हणत जे सुस्तावत पडतात, अशा गोडाजींना आकाबाई लौकरच माळ घालतात". वेदांतहि म्हटलें आहे:—

( श्लोक )

आस्ते भग आसीनस्य । ऊर्ध्वं तिष्ठति तिष्ठतः ॥
शेते निपद्यमानस्य । चराति चरतो भगः ॥ १

भावार्थः–जो बसून राहतो त्याचें भाग्यहि बसतें. जो खडा राहतो, त्याचें नशीब उभें राहतें. जो चालत राहतो, त्याचें भाग्यहि चालू राहतें. व जो आडवा पडतो, त्याचें भाग्यहि झोंपीं जातें.

अर्थात् निद्रा गोड व अवश्य झाली तरी तिलाहि मर्यादा पाहिजेच. शिवाय निद्रा वेगळी आणि सुस्ती व आळसडेपणा हीं वेगळीं. सुस्तीनें व आळसानें मनुष्य फुकट जातो. माफक निद्रेनें उलट ताजातवाना होऊन नवीन उद्योगास तयार व निरोगी असा होतो.

अपघातानें किंवा अन्य योगानें एकाद्याचें शरीर विकल होऊन तो शारीरिक श्रमास असमर्थ होईल; तथापि, असला मनुष्य निरुपयोगी झाला किंवा सर्व सुखाला आंचवला असें नाहीं. अशा स्थितींत मानसिक धैर्य व ईशनिष्ठा ह्या गोष्टी त्याला संभाळतां येतील. व्यावहारिक विघ्नांना तोडून काढणें हें जितपत पुरुषार्थाचें आहे त्याहूनहि विपत्कालीं अढळ धैर्य व नीतिमत्ता राखणें हें अधिक पुरुषार्थाचें आहे. आयुष्यांतली कोणतीहि स्थिति विजयी व आनंदमय करितां येईल. सिसिरो म्हणे: "आपला अपराध नसतांहि कदाचित् आपलें शरीर विकल होईल; पण आपलें मन विकल होऊं देणें न देणें हें केवळ आपले स्वाधीन आहे". अर्थात्, आपण तें होऊं देतां कामा नये. विपत्कालीं दोन गोष्टी जरूर पाहिजेत:— गत सुखाबद्दल कृतज्ञता व भावी सुखाबद्दल आशा. परंतु, त्या गोष्टी ईशश्रद्धा व संतोषवृत्ति यांवांचून साधत नाहींत. आशा करणें ती आपल्या

हिमतीवर करणें वेडेपणा आहे; ही आशा ईश-कृपेवर व ईशनिष्ठेवर उभी असली पाहिजे, म्हणजे ती विश्रामदायक होते. मिल्टन कवि नेत्रहीन झाला तरीहि त्यानें हतधैर्य न होतां दिव्य काव्यें निर्मून जगतावर उपकार केले व ईशेच्छेवर हवाला ठेवून मनाचें समाधान राखिलें. आपले इकडे कै० वे० शा० सं० रघुनाथशास्त्री पर्वते या गृहस्थानीं कारागृहांत असतांहि "शंकर-पादभूषण" म्हणून एक अद्वैत ग्रंथ लिहून लोकसेवा केली.

उद्योगाची व कष्टाची महती केवढी आहे हें मागें दाखविलेंच आहे. तथापि कांहीं मूढ लोक असें समजतात कीं निरुद्योगी बसावयास सांपडणें ही ईशकृपा, व उद्योग करावयास लागणें ही देवाचे घरची शिक्षा आहे. परंतु, हिसिआड म्हणून एक ग्रीक म्हणे कीं, "निरुद्योगिता हीच शिक्षा व लज्जा आहे, व उद्योग करावा लागणें हेंच भूषण व कृपा आहे". लबक म्हणतो, हिसिआडचे हे बोल त्याच्या देशबंधूनीं हृदयांत वागविले नाहींत म्हणूनच असले विलक्षण चतुर लोक असूनहि अखेर अवनति पावले. एरव्हीं ग्रीसचे लोकांनीं कलाकौशल्याची परिसीमा केली होती, व तालमीचा नाद व अखंड युद्धप्रसंग यांमुळें ते वज्र-देही झाले होते. सर्व कांहीं होतें; परंतु उद्योग,

अविश्रांत उद्योग, करण्याचें वळण त्यांना नव्हतें. दृढनिश्चय, आत्मसंयमन व चिरसहिष्णुता हे गुण त्यांचे अंगीं नव्हते, त्यामुळें ते बुडाले. कारण, सततोद्योग ही तरी एक मानसिकशक्तिच आहे. ती तेथें नव्हती. शिवाय, गर्वानें चढून ते ऐदी झाले, व इतर जातींना रानटी म्हणून तुच्छ मानूं लागले.

लबक म्हणतो, सांप्रतकाळीं आमचे गोरेलोकहि अन्य जातींना तुच्छ लेखितात; पण हें त्यांचें अज्ञान आहे. यापेक्षां इतर जातींपासून आपणास अजून शिकण्याजोगें पुष्कळ आहे, असें जर त्यांना वाटेल, तर मी त्यांना अक्कलवाले समजेन. ब्रह्मी लोकांना युद्धाचा ( कलहाचा ) फार तिरस्कार आहे. ही गोष्ट आह्मीं घेण्याजोगी आहे. त्याचप्रमाणें जपानी लोकांत " *बुशिडो " ला फार मान आहे. हीहि गोष्ट शिकण्याजोगी आहे. पाश्चात्य समाजांत दिसून येणाऱ्या द्रव्यतृष्णा, दिमाखखोरी, परापहरण, स्वार्थसाधुत्व, व्यक्तिहित-परायणता या गोष्टींचे जागीं जपानी लोकांत अनुक्रमें अल्प सं-

---

* " बुशिडो " हा जपानीच शब्द आहे. याचा अर्थ थोडक्यांत देतां येणें शक्य नाहीं. तथापि साधी रहाणी, संतुष्ट वृत्ति, निर्दोष नीतिमत्ता, स्वामिहितार्थ प्राणव्ययाची परवा न करणें व अपमानापेक्षां मरण बरें मानणें या गोष्टींचा त्यांत अंतर्भाव होतो.

तोष, विनयशीलता, स्वसंरक्षण, स्वार्थत्याग व लोकहितपरता हे स्पृहणीय गुण दिसून येतात. जपानी लोकांचें धैर्य केवळ अभंग असून, ते मरतील पण शत्रूला पाठ दाखविणार नाहींत, इतके ते अपकीर्तीला भितात. मरणाचें तर त्यांना कांहींच वाटत नाहीं. ते राजाज्ञा शिरसा वंद्य मानितात व जनहितासाठीं स्वहिताची किंवा स्वकुटुंबाचीहि हानि आनंदानें स्वीकारितात. त्यांचें शरीरिक व मानसिक शिक्षणहि मोठें कडक व सक्तीचें असतें. व त्यायोगें रणशूरता, एकनिष्ठा, धैर्य, उत्साह, विश्वासूपणा, साहस व आत्मसंयमन इत्यादि उदात्त सद्गुण, शांततेच्या किंवा युद्धाच्या प्रसंगीं जपानी पुरुषांत तसेच स्त्रियांतहि सारखेच वसतात. त्यांची तितिक्षा व अविषादिता हीं तर बिनतोडच आहेत. जपानांतून शिकून आलेले डायमण्ड सोप कंपनीचे चालक रा० परांजपे यानीं जपानींच्या या गुणांची स्वानुभूत गोष्ट सांगितली. ते म्हणाले, एकदां अग्निप्रळयानें एक लक्ष जपानी लोक उघडे पडले. परंतु एकाची कंबर खचतांना किंवा डोळ्यांस पाणी येतांना मला दिसलें नाहीं. अशा लोकांपुढें विपत्ति काय करणार ? लचक म्हणतो, जपानी लोकांना जें आज एवढें महत्त्व आलें आहे, तें केवळ या सद्गुणांचें फळ आहे;

व ह्या सर्व गुणांत गोऱ्या लोकांनींहि त्यांचें गुरूत्व घेणें जरूर आहे.

एमिल असें विधान करितो कीं, कोणत्याहि राष्ट्राचा उत्कर्ष शास्त्रीय ज्ञानावर फारसा अवलंबून नसतो; सदसद्विवेकावर असतो. लब्बकचे मतें तो या दोन्ही गोष्टींवर अवलंबून असतो. कारण, शास्त्रीय विज्ञानावांचून व्यवहार अवघड होईल; त्याचप्रमाणें विवेकावांचून इहलोकींचें मानवी जीवितच व्यर्थ होईल. पहिली गोष्ट शरीररक्षणाला जरूर आहे; व दुसरी आत्मोद्धारणार्थ आवश्यक आहे. जादूगारापेक्षांहि अद्भुत गोष्टी शास्त्रीय विज्ञानानें निर्माण करून व्यवहार सुखावह केला आहे. चॅटोब्रिअंड हा शास्त्रीय विज्ञानाला विशेष मान देत नाहीं; पण हा त्याचा अन्याय आहे. तो वनस्पतिशास्त्राची थट्टा करितो; परंतु, यावरून असल्या मोहक व आनंददायक शास्त्राबद्दल त्याचें अज्ञान मात्र व्यक्त होतें सृष्टपदार्थविज्ञान हें मानवी प्रगतीला मोठेंच साह्यकारी आहे. व आत्मोन्नतीला सदसद्विवेक व पापाचें भय हीं मोठींच कारकें आहेत.

सत्याची पायरी विवेकाच्याहि वरची आहे. विवेकानें आपण सत्याची निवड करितों. अर्थात्, विवेक हें साधन व सत्य हें साध्य किंवा फल, अतएव वरिष्ठ होय. म्हणून आपण सत्यार्थ झटलें

पाहिजे,व प्रसंग पडल्यास, सत्याकरितां मरण्यासहि तयार झालें पाहिजे. हक्सले म्हणाला कीं, सदाचार हेंच मनुष्याचें शास्त्रविहित कर्तव्यांतील रहस्य आहे; व सदाचारास सत्य अवश्य आहे, म्हणून मनुष्यानें प्रथम सत्याची ओळख पटवून घ्यावी. पण, सत्याची निवड विवेकबुद्धीचे स्वाधीन आहे. कोणी म्हणेल, कधीं कधीं विवेकबुद्धिहि चुकते. कबूल. पण, तिची चूक तरी कोण उमगून काढितो ? तिची तीच. फलतः, विवेकबुद्धि अवश्य आहे. मात्र, तिचेंहि फाजील स्तोत्र करण्याचें कारण नाहीं. कारण, पास्कल म्हणतो, "ईशप्राप्तीचे कामीं केवळ विवेकानें काम होत नाहीं. तेथें सद्भावच पाहिजे. एकाद्याला पुष्कळ विवेकबल असून जर हृदयांत सद्भाव नसेल, तर असल्या खोट्या मनाच्या मनुष्याला ईश्वर भेटणार नाहीं". आपलेकडे "भावेन देवं", "देव भावाचा भुकेला", "भावेहि विद्यते देवस्तस्माद्भावोहि कारणं ।।" हीं वचनें सर्वश्रुतच आहेत.

शांतस्थिति सर्वथा स्पृहणीय आहे; तरीहि कर्तव्याला रजा देऊन ती मिळवूं पहाणें योग्य नाहीं व शक्यहि नाहीं. लवक म्हणतो, पुरातन काळीं कांहीं ख्रिस्तधर्मी लोक शांतिप्राप्त्यर्थ वानप्रस्थ होत. परंतु, अशानें त्यांस कितपत शांति-

लाभ होत असेल तें त्यांनाच माहीत! नुसतें माणसां-तून उठल्यानें किंवा संसारांतून दूर बसल्यानें शांति प्राप्त होते असें नाहीं. भगवंतानीं म्हटलें आहे:—

( श्लोक )

कर्मेंद्रियाणि संयम्य । य आस्ते मनसा स्मरन् ॥
इंद्रियार्थान् विमूढात्मा । मिथ्याचारः स उच्यते ॥ १

—श्रीमद्भगवद्गीता

**भावार्थः**--बाहेरून इंद्रियें आंवरून घेतलीं, पण मनानें तर विषयचिंतन चालू आहे, अशाला मिथ्याचारी किंवा ढोंगी म्हणतात.

एक संन्यासी आमच्या एका स्नेह्याकडे येऊन तक्रार करूं लागला, "अलीकडे आमचे घरा-कडलीं माणसें आह्माला पत्र देखील पाठवीत नाहींत; हीं का आह्मी संपलों असें समजतात का हो?" आतां अशा संन्यासाला काय म्हणावें? ही विटंबनाच नव्हे काय? युरोपांतीलहि महंत किंवा जोगी व जोगिणी यांचे मठांचे इतिहास वाचून पहातां, त्या स्थितींतहि सांसारिकांचीं सर्व कुलंगडीं असून शिवाय परस्परांत कलह, मत्सर, अदेखाई चालू असल्याचें स्पष्ट दिसून येतें. हें कसलें वैराग्य आणि ही कसली शांति! त्यापेक्षां घसघशीत व्यवहारांत राहून विहित धर्मा-चरणानें आयुष्य घालविणें,—दयेचीं, परोपकाराचीं कृत्यें करणें, व परमात्म्यावर अगाध विश्वास ठेवून अढळ नीतीनें चालणें, हा पंथ शतपट बरा.

आतां, या महंतांचे आश्रमांपासून एक फायदा झाला, तो कबूल केला पाहिजे. हे आश्रम म्हणजे मध्ययुगांतील विद्यापीठें होतीं. तेथें राहून गरीब विद्यार्थी शास्त्र, कला, विज्ञान, धर्म, सारस्वत, इत्यादिकांचें ज्ञान संपादन करीत व ज्ञानाची जागृति कायम ठेवूं शकत. हे या अश्रमांचे समाजावर उपकार झाले खरे. पण, वनवास पत्करणारांचा जो मुख्य हेतु—शांतिसुखप्राप्ति—तो साध्य झाला नाहीं.

भगवंतानीं, मानवी जीवांचें दौर्बल्य ध्यानांत घेऊन हा कर्तव्याचा व शांतीचा प्रश्न आपल्या गीतेंत अलौकिक चतुराईनें सोडविला आहे. * स्वतःचें उदाहरण देऊन त्यानीं अर्जुनाला सांगितलें कीं, कर्तव्यविमुख होऊन स्वस्थ बसल्यानें शांति प्राप्त होत नाहीं. व कर्तव्य सोडून कोणाचेंहि चालावयाचें नाहीं. स्वतः

---

* ( श्लोक )

न मे पार्थास्ति कर्तव्यं । त्रिषु लोकेषु किंचन ॥
नानवाप्तमवाप्तव्यं । वर्ते एव च कर्मणि ॥ १
उत्सीदेयुरिमे लोका । न कुर्यां कर्म चेदहं ॥
... ... ... ... ... ... ॥ २
तस्मादसक्तः सततं । कार्यं कर्म समाचर ॥
असक्तो ह्याचरन्कर्म । परमाप्नोति पूरुषः ॥ ३

—श्रीमद्भगवद्गीता

मलाच म्हणशील तर त्रिभुवनांत कर्तव्य म्हणून कांहींच नाहीं, किंवा प्राप्त करून घेण्यालायक वस्तुहि नाहीं, असें असतां मी केव्हांहि रिकामा बसत नाहीं. कारण, मीं तसें केलें, तर सारेंच संपेल. यासाठीं तूंहि सतत कर्तव्यपर रहा.

काम करीत राहिल्यानें कांहीं हानि होत नाहीं व व्यवहारांत राहून भोग भोगूनहि शांति राखतां येते. पण त्यांतली गुरुकिल्ली वेगळी आहे. ती अशी:—

( श्लोक )

ज्ञेयः स नित्यसंन्यासी । यो न द्वेष्टि न कांक्षति ॥
... ... ... ... ... .. ॥ १
युक्तः कर्मफलं त्यक्त्वा । शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ॥
... ... ... ... ... ... ॥ २

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं ।
समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ॥
तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे ।
स शांतिमाप्नोति न कामकामी ॥ ३

—श्रीमद्भगवद्गीता

भावार्थः—जो कोणाचा द्वेष करीत नाहीं व कशाहि विषयीं लसलस करीत नाहीं, तो सदाचा संन्यासीच समजावा. कर्मफलाचा त्याग करून जो कर्तव्यपर राहतो त्याला नैष्ठिक शांति प्राप्त होते. बाबारे, समुद्राकडे पहा, कसला खादाड आहे. सहस्रावधि नद्या सतत पाणी ओतीत आहेत तरीहि बापडा आ वासूनच आहे. पण

असें असून त्याची महतांत गणना आहे. याचें कारण, कितीहि नद्या आल्या तरी तो अमर्याद होत नाहीं. जागचा ढळत नाहीं. बरें, बाहेरून पाणी नाहीं आलें म्हणून रोडत नाहीं.

ज्ञानदेव म्हणतातः—

(ओंवी)

वर्षावावीण सागर । जैसा जळें निर्भर ॥

अर्थात् प्राप्तीचा हर्ष नाहीं व हानीबद्दल शोक नाहीं. याच हिशोबानें जो भोग्यविषयांचें सेवन करील त्याला भोग भोगूनहि अढळशांति लाभेल. शांतीची हानि भोग भोगण्यानें होत नाहीं, तर भोगांविषयीं किंवा कामाविषयीं जी कामिता म्हणजे आसक्ति किंवा लसलस ती शांतीची घात करिते. थालीपीठ मिळालें तरी आनंद, जिलबी मिळाली तरी आनंद, एक दिवस फांका पडला तरी आनंद; अशी ज्याची वृत्ति झाली त्याचे शांतीला ढळ नाहीं.

विषयभागाला शास्त्राची तादृश हरकत नाहीं; परंतु, अनध्याय झाला तर आठवणहि होतां कामा नये, म्हणजे बाध नाहीं. सारांश, कर्मफलाचा त्याग करून अनासक्तीनें कर्में ईश्वरार्पण करून कर्तव्य करीत संसारात राहणें हेंच, प्रवृत्ति व निवृत्ति या दोहोंना साधून शाश्वतसुख मिळविण्याचें साधन आहे.

डॅटे कवीनें सेलेस्टीन नामक धर्मगुरूला मठांतील एकांतवास पत्करण्याबद्दल फार दोष दिला आहे. तो म्हणतो, " असले लोक मी ईश्वराचे अपराधी व द्वेष्य समजतों. कारण, ईश्वराचे प्राण्यांस साह्य करण्याचें सोडून हे आपलपोट्यासारखे एकटे एकटे राहतात, हें ईश्वराला प्रिय कसें व्हावें ? यापेक्षां शेती, दुकानदारी, किंवा अन्य कांहीं व्यवसाय करून परोपकार व आत्मशांति साधतां येईल; व असें करितील तेच धन्य ".

जगांत रहावें कसें हें रहस्य ज्यांना कळलें त्यांना, आलें तें वर्ष, या जगाचें अधिकच कौतुक वाटून, ते तत्कार्यार्थ अधिकच श्रम करीत जातील.

एतावता, माणसांतून उठून जाण्यापेक्षां त्यांत राहून त्यांचे कल्याणार्थ मेहनत करणें, हेंच आपलें कर्तव्य व हेंच आपलें सार्थक्य आहे. आतां मेहनत करणें तीहि माफक असावी; अश्रांत परिश्रम कांहीं सुखावह होणार नाहींत. शिलरचें म्हणणें कीं, " जो खेळाडू तोच खरा मनुष्य ". हें विधान थोडेंसें फाजील आहे तथापि, कामाचे माणसाला विश्रांति ही पाहिजेच. वर्षांतून एक महिना, आठवड्यांतून एक दिवस, दरदिवशीं एक-दोन तास याप्रमाणें मनुष्यानें कामाविर-

हित राहून त्या वेळांत आपले वर्तनाची तपासणी, किंवा मेंदूस विश्रांति, किंवा आल्हादकारक व्यायाम, ईशध्यान, अथवा कांहीं करमणूक, ह्या गोष्टी कराव्या. शिवाय, प्रत्येकानें रोज निजण्याचे पूर्वीं आज आपण काय काय केलें, त्यांत चुकलें काय, केलें पाहिजे होतें काय आणि केलें नाहीं काय, इत्यादि गोष्टींचा तपास करून आपले वर्तनाचा जमाखर्च पांच पळें खर्चून पहावाच पहावा. असें करीत गेल्यानें लौकरच वर्तन निर्मळ होत जाऊन त्या मनुष्याला शांत निद्रा, क्षुद्बोध व पवित्राचरण हीं लाभतील.

लबक म्हणतो; हल्लींच्या हुतुतूच्या काळांत आह्मीं निवांतपण व ईशचिंतन यांचें महत्त्व विसरल्यासारखे आहों फार काय, पण आह्मीं जे चेंडूफळी वगैरे खेळ म्हणून खेळतों त्यांचे देखील कायदे असल्यानें त्यांतहि मन दंग ठेवावें लागतें. उद्योगपरता हें मनुष्याचें कर्तव्यच खरें, तथापि, अखंड घाण्याला जुंपलें राहणें हा कांहीं कर्तव्यपरतेचा अर्थ नव्हे. वैतालिकानें दुष्यंताला म्हटलें आहे:—

( श्लोकचरण )

षष्ठे भागे त्वमपि दिवसस्यात्मनश्छंदवर्ती ॥

—शाकुंतलम् ।

भावार्थः—दिवसाचा सहावा भाग करमणुकींत घालवीत जा.

त्याप्रमाणें प्रत्येकाला रोज कांहीं वेळ तरी निवळ आत्मच्छंदानुवर्तित्वांत घालविलाच पाहिजे. त्यानें मनःप्रसाद व शांति हीं प्राप्त होतात. इंग्रजलोक सप्ताहांतील सहा दिवस म्हणजे कामाचे दिवस व्यवस्थितरीतीनें घालवितात; परंतु, सातवा म्हणजे विश्रांतीचा किंवा ईशचिंतनाचा जो रविवारचा दिवस तो नीट घालवीत नाहींत. हा दिवस ख्रिस्ती शास्त्रांत पवित्र धरिला आहे त्याअर्थीं या दिवशीं मन अध्यात्म व पारमार्थिक विचारांत मग्न ठेविलें पाहिजे. या दिवशीं चित्तवृत्ति प्रशांत, गंभीर, पवित्र व ईशपरायण अशी असली पाहिजे. परंतु याबद्दल वानवाच दिसतो; हें ठीक नाहीं.

अशा प्रकारें सप्तघांतून एक दिवस खर्चण्यानें हानि कधींहि होणार नाहीं. आज इंग्लंडांत अनेक शतकें सहाच दिवस काम करीत आले, पण त्यानें इंग्लंड दरिद्री न होतां उलटें श्रीमंतच झालें आहे. रविवारचे दिवशीं व्यापार थंड पडतो, नांगर शेतांत पडून असतो, सराफ्यांत नाण्याची छणछण बंद असते, कारखान्यांतील वाफेचे यंत्रांतून धुराचे लोळ दिसत नाहींत; असा जरी बाह्यात्कारी देखावा दिसतो, तरी अखिल यंत्रांचेंहि जनक जें मनुष्यरूपी यंत्र त्याचीं बिघडलेलीं आंतलीं मळसूत्रें वगैरे दु-

रुस्त होऊन या वेळांत सफाई होत असते व तीमुळें तें पुनरपि सोमवारीं अधिकच वेगानें काम करण्यास तयार होतें. म्हणजे, त्या पवित्र दिवशींच्या विश्रांतीनें व मनःशुद्धीनें मनुष्याची बुद्धि विशद होते; उत्साह वृद्धिंगत होतो, व शारीरशक्तिहि उत्तंभित होते. अर्थात्, विश्रांती-पासून राष्ट्राला हा कांहीं लहानसान फायदा नव्हे.

कधीं कधीं कांहीं लोक म्हणतात, ' उद्योग तरी कोणता करावा हेंच आह्मांस सुचत नाहीं'. हें त्यांचें म्हणणें ऐकून मोठें नवल वाटतें. लेखक म्हणतो, इतर तितर पोटाचा वगैरे धंदा कदाचित् एकाद्याला जरूर नसला किंवा सुचत नसला तरी, एक धंदा तर प्रत्येक मनुष्य म्हण-विणाराला असलाच पाहिजे. तो धंदा म्हणजे आत्मोन्नति किंवा आत्म्याचें शिक्षण हा होय. एकाद्या संस्थेची मालकी किंवा एकाद्या राज-पुत्राचें शिक्षकत्व किंवा पालकत्व मिळालें असतां आपणास मोठा अधिकार प्राप्त झाला असें आपण मानितों; परंतु, खरें पाहतां, असल्या मालकीपेक्षां किंवा शिक्षकपणापेक्षां आत्म्याची मालकी किंवा शिक्षकपणा संपादणें ही अधिक मानाची, महत्त्वाची, व अधिकाराची गोष्ट आहे.

या दृष्टीनें पहातां, आपणास आत्मोन्नति-साधनार्थ जितकें रिकामपण मिळेल तितकें इष्टच

आहे. निर्वाहाच्या वस्तु पैदा करण्याकरितां करावे लागणारे उद्दीम-व्यापार, नोकरी-चाकरी, उद्योग-धंदे, यांचेंहि महत्त्व आहेच; कारण, त्यांवांचून शरीरपोषणच शक्य नाहीं. शरीरपोषणाचें महत्त्व कितीहि मोठें असलें तरी, पुष्ट शरीरावरून आमची किंमत करणें म्हणजे आह्मीहि एका जातीचे पशूच ठरूं. परंतु, आह्मांला जें यावत् सृष्ट-प्राण्यांत श्रेष्ठत्व आलें आहे तें आमच्या आत्म्यामुळें आलें आहे. या आपल्या मानवी शरीरांत या आत्मारूपी देवाची वस्ती आहे, म्हणूनच याचें एवढें महत्त्व आहे. म्हणून शरीरपोषणापेक्षां आत्मोन्नतीचें महत्त्व अधिक मानिलेंच पाहिजे.

सेंट आगस्टिन म्हणेः " रिकामपणची काम-गिरी तर बहुत मोठी आहे ". या ठिकाणीं एक वेळ, ती अत्यंत किंवा निरतिशय मोठी आहे असें तो म्हणता तरीहि शोभतें. कारण, त्रिभुवन मिळालें आणि आत्मघात झाला तर काय मिळ-विलें ? अर्थात्, आत्मोत्कर्ष करणें हें फारच मोठें काम प्रत्येकाला आहे. असें असतां जगांत पहावें तों सुस्थितीमुळें मध्यवयांत किंवा पूर्व-वयांतच उद्योगधंदा सोडून स्वस्थ बसण्याची ज्यांना सवड झाल्यामुळें जे घरीं बसले आहेत, असे बरेच लोक कुरकुरतात कीं ' करावें तरी काय, वेळ जातां जात नाहीं ! ' या अज्ञानाला

काय म्हणावें! पोटाचा उद्योग नसला तरी सर्वोत्तम असे दोन व्यवसाय त्यांना मोकळे व अगत्याचे आहेत. ते व्यवसाय म्हणजे, अहर्निश परोपकार करणें व आपल्या आत्म्याचें शोधन करणें, हे होत. हे केल्यानें त्यांस सुखशांतीचा अवर्णनीय लाभ होईल.

( श्लोक )

यावत्स्वस्थमिदं शरीरमरुजं यावज्जरादूरतः ।
यावच्चेंद्रियशक्तिरप्रतिहता यावत्क्षयो नायुषः ॥
आत्मश्रेयसि तावदेव विदुषा कार्यः प्रयत्नो महान् ।
प्रोद्दीप्ते भवने तु कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः ॥१

— भर्तृहरि

**भावार्थः**–जोंपर्यंत हें शरीर निरोगी असून जरा दूर आहे, जोंपर्यंत इंद्रियें आपापली कामगिरी नीट बजावीत आहेत व आयुष्य संपत आलें नाहीं, तोंच शहाण्यानें शाश्वतसुखासाठीं यत्न करावा. कारण, घर पेटल्यावर विहोर खणूं लागणें हा कोणते प्रकारचा उद्योग म्हणावा?

# प्रकरण २

## शरीर

न शरीरं पुनःपुनः ।

—सुभाषित

( आर्या )

... ... ... ... ...

किं सौख्यमरोगिता जगति जंतोः ॥ १

—आचार्यकृत प्रश्नोत्तरमालिका

भावार्थः–आरोग्य हेंच जगतांत प्राण्यांचें सुख होय.

बायबलांत वर्णन आहे कीं, येशुख्रिस्तानें एकदां पांच पाव आणि दोनच मासे एवढ्यावर पांच हजार लोक जेवूं घातले. या कृत्याला अद्भुत कौतुक किंवा अलौकिक चमत्कार म्हणून नांव पडलें आहे. परंतु, सृष्टीच्या नित्यक्रमांत ज्या अनेक गोष्टी आढळतात, त्यांहून कांहीं हा चमत्कार अद्भुत नव्हे. एक दाणा पेरून त्याचे पायलीभर होणें; एका माशापासून लाखों माशांची वीण होणें; खाल्लेलें दुग्ध किंवा मांस ह्यांचें रूपांतर होऊन रक्त, मांस व मेंदु बनणें, हे काय हलके चमत्कार आहेत? वनस्पतींचें अन्न खावें, त्याचे रसरक्तादि सप्तधातु बनून

ते देहांत चैतन्य व क्रियासामर्थ्य उत्पन्न करितात हें तरी केवढें नवल आहे बरें ?

याहि चमत्कारापेक्षां पुरुषवीर्याच्या एका बिंदूपासून बनलेला हा दशेंद्रिययुक्त नरदेह व त्याचे अनंत व्यापार हें सर्वच मोठें अद्भुत गौडबंगाल नाहीं काय? पंचदशींत विद्यारण्यानीं म्हटलें आहेः—

( श्लोक )

एतस्मात्किमिवेंद्रजालमपरं यद्गर्भवासस्थितं ।
रेतश्चेतति हस्त-मस्तक-पद-प्रोद्भूत रोमांकुरं ॥
पर्यायेण शिशुत्व-यौवन-जरा-वेषैरनेकैर्युतं ।
पश्यत्यात्ति शृणोति जिघ्रति रसान् गच्छत्यथागच्छति ॥ १

**भावार्थः**----गर्भाशयांत पडलेला एक वीर्यबिंदु हस्तमस्तकादि इंद्रियांनीं युक्त होऊन व अनेक विषय व व्यापार करून बाल्य-तारुण्य-वार्धक्यादि अनेक अवस्था भोगून पुनः नाहींसा होतो, हें केवढें मोठें इंद्रजाल आहे बरें ?

शिवाय, अशा या अजब शरीरांत रहाणारें मन व आत्मा यांचे व्यापार तर केवळ अचिंत्यच आहेत. बरें, या शरीराला तरी घातुक अशा गोष्टी पदोपदीं आहेत. आगगाडीची थडक झाली, घोडाच उधळला, पाण्यांतच पाय घसरला, घरच कोसळलें, या आगंतुक; व शिवाय, तापजाळ, नाना व्याधि या प्रत्यक्ष, शरीरांत वसणाऱ्या गोष्टी प्रतिपदीं शरीरनाशाला

टपलेल्या असतात. तथापि, परमेश्वराची इच्छा आहे तोंपर्यंत इतक्याहि विघ्नांना दाद न देतां हें शरीर चालतें आणि ईश्वरी इच्छा फिरली कीं जें कांहीं क्षणापूर्वी हालत, बोलत, उड्या मारीत व त्रिभुवनाच्या उलाढाली करीत होतें, तें जड मातीचा ढेपसा होऊन जातें. हें तरी केवढें नवल ? साधु कबीर म्हणतो:—

( पद )

कची मटीका बंगला तेरा । पाव पलखमो गिरता है ॥

हें मानवी शरीर इतकें अद्भुत व कुशलतेचें असून पुनः क्षणभंगुर असावें हें तरी काय ? शिवाय शरीरघटनेंत सहस्रावधि गोष्टी आहेत. त्यांचा आह्मांस पत्ताहि नाहीं. स्पिनोझा म्हणतो, "स्वतःच्या शरीराचें आपणास पूर्णज्ञान असणें ही सहज गोष्ट आहे. परंतु, खरें पहातां आपल्यांतील मोठमोठ्या शरीरवेत्त्यांना देखील या शरीराचें ज्ञान फारच अल्प आहे. आपण बोलतों, वाचतों, विचार करितों, त्या वेळीं मेंदूंत कांहीं तरी व्यापार होत असलाच पाहिजे, हें खास; पण, हा व्यापार कसा व काय हें आपणास कळलें आहे काय ? मोठ्या इंद्रियविज्ञान-युक्ताला देखील या कामीं काळोखच आहे. कोणत्याहि विषयाचा इंद्रियद्वारा आपणास बोध होतो, म्हणजे तरी काय होतें ? कोण सांगूं शकेल" ?

सारांश, ज्याला आपण आपला—नव्हे, आत्मरूपच—समजतों, त्या या देहाबद्दल आपले ठिकाणीं इतकें गडद अज्ञान भरलें आहे. इंद्रियांची घटना व व्यापारच पहा ना? त्वगिंद्रिय घ्या. हें विशेषतः हस्ताग्र व जिव्हाग्र या ठिकाणींच अधिक तीक्ष्ण कां? शिवाय, एकाच त्वचेचे ठायीं शीत व उष्ण हे उलट संस्कार कसे होतात; व त्वचेला झालेले संस्कार मेंदूशीं कसे पोंचतात; आणि तेथें जाऊन तरी त्यांना बोधरूपत्व कसें येतें? जिव्हेचाहि तोच प्रकार. एकाच रसनेला षड्विध रसांचें ग्रहण कसें करितां येतें व त्यांचे सप्रमाण बोध मेंदूपर्यंत कसे पोंचतात; एकाच मेंदूंत प्रत्येक पृथक् इंद्रियांचे व्यापारांचा भिन्न बोध कसा प्रतीत होतो? इंद्रियव्यापारांत व विषयबोधांत पार्थक्य असतांना त्या सर्वांचें आनंदमय किंवा सुखमय असें एकच पर्यवसान कसें होतें? नाकास उत्तम सुवास आला; कानांत सुंदर ध्वनि पडला; जिव्हेस रुचकर खाद्य मिळालें व नेत्रांस रमणीय रूप दिसलें; तरी अखेर 'हां हां' म्हणून मनुष्य जी गोडशी मिटकी मारितो, तिचें रूप एकच म्हणजे सुखमयच असतें, हें तरी काय? कर्णाची तरी रचना किती चतुराईची, त्याचें ध्वनिवाहकत्व किती गमतीचें व त्याला तीव्र,

कोमल, ऱ्हस्व व दीर्घ इत्यादि असंख्य ध्वनि-भेदांचें पृथक् ज्ञान कसें होतें? नेत्रांची रचना व व्यापार ही तर चातुर्याची पराकाष्ठाच आहे. फार राहिलें, पण नेत्र तरी त्वचा-मांसच, असें असून तो सूर्य-कांतासारखा लकाकतो व कवडसा पाडतो, हें काय? एवढें तेज शरीरांतील तेवढ्याच त्वचेला कोठून आलें? बरें, बिंबग्रहणाचें सामर्थ्य तरी कसलें अद्भुत! फोटोग्राफर किंवा छायालेखक कार्डसाईज घेऊं कीं कॅबिनेट घेऊं (कारण, त्याप्रमाणें लहान किंवा मोठें प्रतिबिंब येईल) म्हणून पंचाईत करीत असतो. परंतु, या ईश्वरनिर्मित कनीनिकारूपी तुरीच्या डाळकणा एवढ्या कॅमेऱ्यांत मुंगीपासून ब्रह्मांडापर्यंत वाटेल तेवढ्या पदार्थांचें अचूक व स्वप्रमाण प्रतिबिंब पडूं शकतें, हें तरी कौतुक अनिर्वचनीय नव्हे काय? एका कवीनें म्हटलें आहे:—

(श्लोक)

नेत्रीं पुत्तलिका मसूरदलशी अत्यल्प जी नांदते।
वर्णूं शक्ति तिची अचाट किति मी ब्रह्मांडही ग्रासिते॥
जातां सूचिमधून वारण कमी आश्चर्य तें याहुनी।
देवा कौतुक हें तुझ्याविण दुज्या कोणा न साधे जनीं॥१

—अद्भुतकिमियागार

म्हणजे, नेत्रांत जी मसुरेच्या दालकणाएवढी क्षुद्र बाहुली आहे, तिचा पराक्रम काय वर्णावा?

ती सर्व ब्रह्मांडहि कवळूं शकते. या तिचे कृतीपुढें सुईचे नेड्यांतून हत्ती जाणें हें देखील मोठें आश्चर्य नव्हे. कवि म्हणतो, कीं हे देवा, हा अद्भुत चमत्कार तुझ्यावांचून अन्य कोणालाहि येणारा नाहीं.

जठराचा व्यापार तरी किती अचिंत्य आहे! जठर हें काय आहे, तर चामड्याची पिशवी आहे. पण, तींत भक्ष्य, भोज्य, लेह्य, चोष्य असे नैकविध पदार्थ टाकावे, तों त्यांचे रस होऊन सप्त धातु कसे बनतात व कां बनतात, हें कोणास समजतें? तुम्ही एक चामड्याची पिशवी घेऊन तींत एक शेरभर अन्न कोंबा आणि एका पेटींत ठेवा व दुसरे तिसरे दिवशीं पहा, काय दिसेल? तेंच अन्न सडून घाणतांना मात्र दिसेल, दुसरें कांहीं नाहीं. मग जठराचे पिशवींतच त्याचें असें अद्भुत रूपांतर कसें होतें?

अशीं एक नी दोन, या शरीरासंबंधी किती कौतुकें सांगावीं! या नऊ दरवाजांनीं युक्त अशा घरांत प्राणरूप वायूची स्थिति, हें तरी नवल नव्हे काय? एका दोहऱ्यांत म्हटलें आहे:—या शरीररूपी पिंजऱ्याचे नऊ दरवाजे खुले असतांहि हा प्राणरूपी पक्षी त्यांतून उडून जात नाहीं हें नवल आहे. उडून गेल्यास नवलच नाहीं!

अशा या कौतुकमय अद्भुत शरीरांत आपली सर्वदा वसति असून आपणाला त्याचें ज्ञान किती

तरी कोठें आहे? आणि असें असून आह्मी सर्वज्ञ, आह्मी भूदेव, इत्यादि प्रकारें आह्मी घमेंड मारितों, हें मूर्खपण नव्हे काय ?

दुसऱ्या एका दृष्टीनें पहातां, मनुष्याला तरी असंख्य गोष्टींचें ज्ञान आहे नव्हे का ? त्याची स्मृतिच तपासून पहा. हाहि एक अजबखानाच आहे. यांत किती तरी गोष्टींचा समावेश आहे बरें ? अगदीं मठ्ठ मनुष्याची स्मृति धरिली तरीहि तींत किती तरी गोष्टी सांठविल्या असतात! सामान्य बुद्धीच्या मनुष्याच्या स्मृतींत लक्षावधि वस्तु, पशु, पक्षी, मनुष्यें यांचीं रूपें; त्यांचे शब्द, स्पर्श, गंध, व्यापार; मित्र-शत्रु, आप्त-स्वकीय यांचे व स्वतःचे बाल्यापासून चालू मितीपर्यंत घडलेले वृत्तांत; नाना क्षेत्रें, तीर्थें, पूल, नद्या, किल्ले इत्यादि-इत्यादींचीं चित्रें; अनेक गाणीं, गद्य-पद्यें; अनेक राजे, वीर, राजपुरुष, मुत्सद्दी, कवि, इतिहासकार इत्यादिकांचीं चरित्रें; शेंकडो ठळक गोष्टींच्या तारखा, लढाया, राजक्रांत्या, यांत्रिक शोध, हीं सर्व सांठविलेलीं आढळतील. कोणी परिचितापैकीं आडून बोलतांना कानीं आलें, किंवा ओळखीचें भांडें वाजलें, तरी देखील आपणास नेमकी ओळख पटते, हें तरी अजब ज्ञान नव्हे काय? भांड्यावर बाहेरून हात ठेवावा तर, तें आंतून भरलें कीं रितें, हें समजतें. हे तरी

बोध स्मृतींतच राहतात. अर्थात् मनुष्याचें ज्ञान तरी मोठेंच आहे हें खरें. परंतु, त्या स्मृतींत हा अनंत वस्तूंचा पृथक् बोध प्रथम उमटतो कसा, तेथें तो स्थिरावतो कसा, अपेक्षा नसेल त्या वेळीं गुप्त किंवा लीन राहतो कसा, व आपली इच्छा होतांच पुन्हां प्रकट होतो कसा हें परम गूढ उकलीसा शहाणा कोण आहे? भगवंतानीं गीतेमध्यें—

( श्लोकचरण )

मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।

**भावार्थः**—मजपासूनच स्मृति, ज्ञान आणि तर्क हीं उत्पन्न होतात

म्हणून जें म्हटलें आहे, त्यावर हवाला देण्यापलीकडे कोणाचीहि अक्कल या ठिकाणीं चालेलसें आभास तरी वाटत नाहीं. जीवात्म्याचें क्रीडामंदिररूपी हें मानवी शरीर एक अप्रतिम कौतुकच खरें; व परिणामवादाप्रमाणें पहातां हें चिदचिदात्मक शरीर आकारास येण्याला प्रथम अनंतकाळ लागला असला पाहिजे. कारण उपनिषदांत म्हटलें आहे:—

तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधीभ्योऽन्नं । अन्नात्पुरुषः ।

—ब्रह्मानन्दवल्ली

**भावार्थः**—या आत्म्यापासून आकाश झालें. आकाशापासून अग्नि. अग्नीपासून जल झालें. जलापासून पृथ्वी. पृथ्वीपासून ओषधी. ओषधींपासून अन्न, व अन्नापासून पुरुषशरीर निर्माण झालें.

या परंपरेनें अव्याकृतांतून पुरुषाकारास येऊन पोंचेतों किती अवस्थांत किती काळ लोटला असला पाहिजे ? हा काळ अनंत म्हटला तरी शोभेल. बरें, पण इतक्या श्रमानें, इतक्या दीर्घ कालानें निर्माण झालेला हा निखिल कौतुकमय पुतळा क्षणभंगुर आहे, असें दृष्टीस पडलें म्हणजे आश्चर्यानें व दुःखानेंहि जीव व्याकूळ होतो व गोंधळून जातो. जिवंत असतां जो स्वर्गाला गवसणी घालण्यास किंवा परमेश्वराचे मांडीशीं मांडी भिडविण्यास समर्थसा भासत होता, तो देह एका क्षणांत पालथा होऊन सर्व तेज मावळून जातें व मृतकाष्ठाची त्याला उपमा येते. इतकेंच नव्हे, तर, माझा माझा म्हणून जिवंतपणीं त्याला कवळणारे आप्त-इष्ट स्वहस्तानें तो काष्ठभूत देह उचलून सरणावर घालून पेटवून देतात व त्याची तीन चिमट्या राख होऊन पडते ! हा सर्व प्रकार पाहिला म्हणजे प्रत्येक विवेकी मनुष्याचें हृदय शोकग्रस्त व शतधाविदीर्ण होतें. कार्लाइल म्हणतो, " याहून अधिक हृदयद्रावक किंवा मर्मकृंतक प्रकार अलं ब्रह्मांडांत देखील दुसरा कोठें

नसेल." भर्तृहरि तर हा प्रकार पाहून उद्वेगाचे भरांत विधात्याला आपण्डित म्हणण्याला कमी करीत नाहींत ! ते म्हणतात:—

( श्लोक )

सृजति तावदशेष गुणाकारं । पुरुषरत्नमलंकरणं भुवः ॥
तदपि तत्क्षणमंगिकरोति चेदहह कष्टमपंडितताविधेः ॥१

**भावार्थः**—हा ब्रह्मदेव पृथ्वीचें केवळ भूषण असें हें सर्वगुणसंपन्न पुरुषरूपी रत्न ( इतक्या यत्नानें ) निर्माण करून तें पुनः क्षणभंगुर करितो, तेव्हां या कर्त्याची मूर्खता पाहून वाईट वाटतें.

बरें, दुसऱ्या बाजूनें पहातां, भर्तृहरीनें बे-अकली म्हणून निवडलेल्या या विधात्याची या नरदेहांतच बेहद्द अक्कल दिसून येते. कारण, लेखक म्हणतो, या अद्भुत नरदेहाची रचना तपासून पहातां त्यांतील अनेक शिरा, स्नायु, पेशी, तंतु, धमन्या, वाहिन्या, आशय, रस, मल इत्यादिकांचे परस्परसंबंध व व्यापार इतक्या गुंतागुंतीचे आहेत कीं, असलें हें भानगडीचें यंत्र, कधीमधीं बिघडतें याचें नवलच नाहीं, पण तें क्षणभर तरी सुरळीत कसें राहूं शकतें याचेंच आश्चर्य वाटतें. सुश्रुतामध्यें आपले मनुष्यदेहांत १०७ मर्में आहेत म्हणून सांगितलें आहे. 'मर्म' या शब्दाचा अर्थ ज्या जागीं आघात झाला असतां तत्काळ प्राण जातो तें स्थान ( मारयन्तीति

मर्माणि ) असा आहे. अशीं स्थानें अर्थात् एक हात जागेंत ३१ आहेत. असें असतां कसरत करणारे गोपाळ, कोल्हाटी वगैरे लोक अंगाची वाटेल तशी घडी करितात; पोरेंबाळें खेळ खेळतांना, उड्या मारतांना अंगाचा आळापिळा करितात; सामान्य व्यवहारांत वाटेल तशा आपल्या शरीराच्या हालचाली होत असतात; आणि आपणास या मर्मांची दादहि नसते. तरीहि हीं सर्व मर्में अभंग राहूं शकतात ही तरी हें शरीररूपी यंत्र बनविणाऱ्या कारागिराची अतर्क्य चतुराई नव्हे काय ? हें मर्मरक्षण कसें होत असेल याचें उत्तर कोण देईल ?

हें जडशरीराविषयींचें कौतुक झालें. आता त्यांत वास करणारा जो चिदात्मा त्याचा या शरीराशीं कशा प्रकारें संबंध आहे—तीं दोन्ही अभिन्न होऊन मिसळलीं आहेत, किंवा पृथक्च आहेत, याबद्दल मतभेद होऊनच चार्वाकादि देहात्मवाद व इतर अनेक वाद उत्पन्न झाले आहेत. दोन्ही एक म्हणावीं तर, मृताचा देह अखंड असून, त्याला चिमटा घेतल्यास तो हायहुइ कांहींच करीत नाहीं. अर्थात् हायहुई करणारा, आजपर्यंत कोणीतरी शरीराहून वेगळाच होता व तो आतां सोडून गेला असें म्हणावें लागेल.

आचार्य म्हणतातः—

( श्लोक )

अत्यंत मलिनो देहो । देही चात्यंत निर्मलः ॥
तयोरैक्यं प्रपश्यंति । किमज्ञानमतः परम् ॥ १

**भावार्थः**—देह हा अत्यंत घाणेरडा, व देही हा अत्यंत निर्मळ, असें असतां, त्या दोघांस एक समजणें याहून दुसरें अज्ञान तें कोणतें ?

बरें, या प्रतीतीवरून हे दोन्ही पृथक् मानणाराला चिमटा घेऊन आपण सांगितलें कीं आह्मी या जड शरीरास चिमटा घेतों, तुम्हाला त्याचें काय ? तर तो गप्प बसत नाहीं. सारांश, ही चिज्जडाची ग्रंथी उकलणें मोठें दुर्घट काम आहे. देहांतरप्राप्तीचा प्रश्नहि असाच मोठा अवघड आहे. अनार्यांना तर त्याची कल्पनाच नाहीं. आमच्या वेदशास्त्रांनीं मात्र तो सप्रमाण उलगडला आहे खरा. तथापि, सामान्य समजुतीच्या माणसांना तें एक कोडेंच आहे.

शिवाय, देहांतर मानून चाललें तरीहि प्रकृत देहाचें महत्त्व तिळप्राय कमी होत नाहीं. कारण, देहांतरप्राप्तीवर विश्वास ठेवणारे आमचे साधुसंत देखील—

( पद )

असा काय नरदेह मिळेल पुन्हा । सिताराम सिताराम, भजरे मना वा भजरे मना ॥

" बारबार नहि आनेका "

इत्यादि वचनांनीं त्याचें अनन्यसाधारण

महत्त्वच गात असतात. शास्त्रांत या नर-शरीराचें लक्षण “ आत्मनो भोगायतनं शरीरं ” म्हणजे शरीर हें आत्म्याचें विषयभोग घेण्याचें स्थान, असें दिलें आहे. अर्थात्, आत्म्याला जर सुखशांतीचे अनुभव घेणें इष्ट आहे, तर प्रथमतः त्या उपभोगांस आधारभूत जें हें शरीररूपी स्थान तें स्वच्छ ठेविलें पाहिजे; आणि तसें होण्यास आपण तें मोठ्या विचारानें व काळजीनेंच वापरलें पाहिजे. पण, असें असून आपण या कामीं किती वेरें बेफिकीर वागतों ? पानावर बसलों, भजीं चुर-चुरीत झालीं आहेत, मारा हात ! मटाराची उसळ बहुत गुलगुलीत शिजली आहे, एक ओगराळें आणखी ! उद्यांचा विचार उद्यां. याप्रमाणें बे-सुमार अन्न खचतों. खीर अटुस झाली आहे, दोन द्रोण जादा ! सांभारें फक्कड बनलें आहे, झोका ! भरितास फोडणी नीट वठली आहे, ओ-रपा ! असा प्रकार चालतो. पण असलें खाणेपिणें म्हणजे शरीरपोषण नव्हे. म्हणच आहे, “ आचरट खाणें, आणि मष्णांत जाणें ”. पण तिकडे पहातो कोण! खाण्यापिण्याचा हा प्रकार. उद्योगविश्रांतींतहि हाच मासला. कांहीं लोक काम करणारे आहेत ते मरमर काम करितात, कांहीं आळसडे आहेत ते अंगावर उवा पडेतों देखील शरीर हालवीत नाहींत. शिवाय, स्त्री,

मृगया, अंमल इत्यादि व्यसनांत पडलेले जीव तर हें शरीर पोतेऱ्याप्रमाणें निष्काळजीनें वापरितात. व्यसनाचे भरांत त्यांना डोळां भुई दिसत नाहीं. आणि मग अखेर दारुण आधिव्याधींनीं आक्रांत होऊन तिडका देत तडफडत दांत वासून पडतात—मरतात ! !

शिव शिव ! मूर्ख, मदांध, विषयलोलुप जीव या अमोल नरतनूची स्वहस्तें अशी रांगोळी करितात आणि स्वतः अपराध करून विधात्याला दोष देतात. भीष्मद्रोणादिकांचीं शरीरें आपल्या सारखींच रक्तमांसाचीं होतीं, पण त्यांनीं तीं वज्रतुल्य अभेद्य व अजर केलीं होतीं; तीं कशानें?—तर स्वतःचे कमावणीनें—नियमित वर्तनानें. लबक म्हणतो, शरीर निर्मळ व सुयंत्र ठेवण्याची विद्या फार सोपी आहे. माफक खावें, तमाखू दारू वगैरेला अजीबात फाटा द्यावा, शुद्ध व मोकळ्या हवेंत पुरेसा व्यायाम घ्यावा, अंतरीं शांति ठेवावी व उद्योगधंदा नियमित करावा, म्हणजे आरोग्य महाग नाहीं. वाग्भटानीं म्हटलें आहे:—

" हितभुक्, मितभुक् सोऽरुक् । "

**भावार्थः**—जो हितकर व मोजकें खातो ( पितो ), तो निरोगी राहतो.

भगवंतानीं तर अमोलच नियम दिला आहे:—

( श्लोक )

युक्ताहारविहारस्य । युक्तचेष्टस्य कर्मसु ॥
युक्तस्वप्नावबोधस्य । योगो भवति दुःखहा ॥ १

—श्रीमद्भगवद्गीता

**भावार्थः**—आहार, विहार, उद्योग, निद्रा व जागृति हीं जो माफक ठेवितो त्याला दुःखाचा नाश करणारा असा योग साधतो. अर्थात्, असला मनुष्य सुखी असतो.

सारावली नामक ज्योतिष ग्रंथांतील आयुर्दायाध्यायांत म्हटलें आहेः—

( श्लोक )

पथ्याशिनां शीलवतां नराणां ।
सद्वृत्तभाजां विजितेंद्रियाणाम् ॥
एवं विधानामिदमायुरेव ।
सत्यं भवेत् वृद्धमुनिप्रणीतम् ॥ १

**भावार्थः**—येथें ग्रहमानानें ठरलेलें आयुष्य जे कोणी शीलवान्, सद्वर्तनी, पथ्यभोजी व जितेंद्रिय असतील अशांना मात्र भोगेल; इतरांस नाहीं.

अर्थात्, नियमित आयुष्य देखील दुराचरणानें तुटतें, हें स्पष्ट आहे व हिशोबीहि आहे. सरकारानें रेलवेकंपनीला शंभर वर्षांची मुदत दिली; परंतु तींत पोट-कलम असें घातलें कीं, अपघात झाल्यास अपघाताबद्दल अमुक मुदत तोडिली जाईल. व त्याप्रमाणें शंभर वर्षांपूर्वीच रेल्वेचें स्वामित्व सरकाराकडे गेलें. तोच न्याय आयुष्यासहि लागू

समजावा. शीर्षसामुद्रिक, हस्तसामुद्रिक वगैरे शास्त्रांचाहि हाच अनुभव आहे.

हें शरीररूपी यंत्र साफ ठेवण्यास वर सांगि-तलेले विषयांत मितपणा तर पाहिजेच पाहिजे, पण त्याशिवाय, स्वच्छता हाहि एक मोठा मुद्दा आहे. म्हणूनच आमचेकडे प्रातःस्नानादि शौचें सांगितलीं आहेत. लबक म्हणतो, स्वच्छपणा किंवा पवित्रता हें आजकाल इंग्रजांत दैवी (देवांस साजणारें) लक्षण मानिलें आहे. परंतु पुरातन-कालीं ख्रिस्ती धर्मांतील कांही पंथांत चमत्कारिक समजुतींमुळें गलिच्छ, अस्वच्छ राहणें हें साधुत्वाचें लक्षण मानीत असत. एदेल्ड्रेडा म्हणून एक मोठी संतीण होती; परंतु, ती मोठ्या धार्मिक उत्स-वाचे दिवशीं मात्र स्नान करी. थामस आ बेकेट म्हणून जो परमवंद्य मानलेला साधु तो जेव्हां मेला तेव्हां त्याचे डोचक्यांतून, कपड्यांतून किळसवाण्या उवालिखांची पागोळी लागली. डीन स्टॅनले म्हणतो कीं,—"तथापि एथे असलेले प्रेक्षक भक्त असलें डोचकें आपणांस अंतरलें म्हणून अश्रू ढाळूं लागले"! आपले देशांतहि 'अहिंसा' धर्माचा अतिरेक करून श्वासाची हवा देखील फडक्यानें गाळून पिणारे जैन जातींची स्वच्छता वरील साधूचे पसंतीस पडेशी असते.

असो. मिताहारविहार, स्वच्छता इत्यादि

गोष्टी शरीररक्षणास अवश्यच आहेत व प्रत्येकानें त्या सक्तीनें पाळिल्याच पाहिजेत. तथापि, अनुभवी वैद्य-डाक्तरांना कित्येकदा तरी असा प्रत्यय येतो कीं, शरीरस्वास्थ्य हें चित्तस्वाथ्यावर अवलंबून आहे. आह्मास एकानें ताजें उदाहरण सांगितलें कीं, 'जोशी' नामक गृहस्थांची सरकस कर्जत गांवांत उतरली होती. तींत वाघ होते ते आरोळ्या देत, त्यामुळें त्या आठवड्यांत कर्जत गांवांतील गायगुरें दूध देतना; व कांहीं गाई तर गांवांतच येतनाशा झाल्या. भयाचा किंवा चित्तास्वास्थ्याचा पशूंचे शरीरावर देखील जर हा परिणाम, तर मनुष्याचे किती असेल बरें? गर्भारशीचे मनाला धक्का पोंचल्यास आंतील गर्भाचा पात होणें, किंवा गर्भस्थ अर्भक व्यंग निपजणें, हेंहि अनुभव शेंकडो ग्रंथांत आहेत. व ह्याकरितां गर्भारशीला फार लाडांनीं पाळावी, तिचे डाहेळे संभाळावे अशी शास्त्राज्ञा आहे. मागील खानेसुमारीवरून पहातां, हिंदुस्थानांत प्रजावृद्धीची आंत-सवाई होत आहे; व इंग्लंड, जर्मनी या देशांत बाहेर-सवाई होत आहे. याचेंहि अंशतः हेंच कारण आहे. चिंता ही शरीर शोषण करिते. खुनी मॅकबेथ राजा बेचैन झाला असतां आपल्या वैद्याला म्हणालाः—

( अजंनी गीत )

व्यथा मन्मनीं दुर्वह होते। बाणाग्रेंही स्मृती टोंचिते॥
मस्तिष्कातें पाप चावतें। औषध त्या योजी ॥ १
कोमलशा या हृत्कमलातें। घोर राक्षसी चिरडुं पहाते॥
कुशल उपायें तेथुनि तीतें। काढुनिया लावीं ॥ २

--शेक्सपिअर

असो. चित्तास्वास्थ्य, मनोदौर्बल्य व दुर्व्यसनें हीं तर शरीरनाशाला कारणें आहेतच; पण, अज्ञान हें यांहीपेक्षां प्रबळ कारण आहे. लबक म्हणतो, गुरें, मेंढरें, घोडे यांची सरशी अवलाद निपजावी म्हणून आह्मी किती तरी श्रम घेतों; आणि पशूंपेक्षां ज्याचें वर्चस्व निस्तुल आहे अशा मनुष्याची संतति शरीरानें, मनानें व अध्यात्मदृष्टीनेंहि अधिकाधिक जोमदार निपजविण्याची मुळींच फिकीर बाळगीत नाहीं; या अज्ञानाला काय म्हणावें ? *

श्रीमंतीनें संतति सुधारेलसें नाहीं. कारण, श्रीमंत मनुष्य तितकाच सुज्ञ असला तर गोष्ट वेगळी, बाकी बहुधा श्रीमंतीनें अनेक व्यसनें लागून, संततीचा अधिकच बिघाड होतो. हिंदु-

* लबकसारखा जर या बाबतींत स्वजातीबद्दल एवढा विलाप करितो, तर, आह्मी आजच्या भारतवासीयांनीं केवढा केला पाहिजे बरें ? पण, आमचे मनाला याचा विटाळहि नाहीं.

स्थानांत तर बहुतेक गाद्यांवर दत्तमूर्ति आहेत, हें या गोष्टीचें स्पष्ट निदर्शन आहे. हवामान सौम्य व सुखकर असलें तर शरीराला ढिलाई येऊन बुद्धिव्यापार मंदावतो. त्यापेक्षां, जेथें हवामान इंग्लंडासारखें कडक व अति थंड असेल तेथेंच शिरास्नायु जोरकस राहून प्रगुणन ठीक चालतें. यासाठीं, साधेल तों चांगलें हवापाणीहि पहावें, म्हणजे संतती निरोगी व जोरदार होऊन स्वतःचें शरीर सुधारेल.

शरीरस्वास्थ्याला मनःस्वास्थ्याची विशेष अपेक्षा आहे म्हणून वरतीं सांगितलें; परंतु, खरें पाहतां, हा विषय अन्योन्यापेक्ष आहे. म्हणजे उलटपक्षीं, मनःस्वास्थ्यालाहि शरीरस्वास्थ्य हें पुष्कळ अंशीं कारण आहे. आपणा सर्वांस हा अनुभव आहे कीं शरीर निरोगी व सुदृढ असलें म्हणजे चित्तवृत्तिहि आनंदी व दमदार असते; परंतु शरीरीं अस्वास्थ्य आलें म्हणजे नेहमींचीं सुस्वभाव व शांत माणसेंहि रागीट व तिडतिडीं बनतात. अशा स्थितींत मनुष्याची सहिष्णुता नाहींशी होऊन, तो एवढ्यातेवढ्यावरून दुःख व संताप करितो. अर्थात् मनःशांतीलाहि शारीरिक आरोग्य अवश्य आहे. सत्ता व संपत्ति हीं जेथें असतात, तेथें दुर्व्यसनोत्तेजक अनेक मोह असल्यानें, चित्तस्वास्थ्य व तदनुषंगी शारीरस्वास्थ्य या दोहोंचा

वानवाच आढळतो. असें म्हणतात कीं डाक्तर रॅडक्लिफ यानें तिसरा विलियम राजा यास सांगितलें कीं ‘ तुझीं तीन राज्यें बदला देऊन माझ्या ह्या दोन खंबीर तंगड्या तूं मागशील तर मला देण्यास परवडणार नाहीं ’. दुसऱ्या एका राजाबद्दल शेक्स्पिअर कवीनें असेंच म्हटलें आहे कीं, “ तूं या गरीब व घट्टमुट्ट नोकरांचे गुडघे हुकुमानें वांकवशील; परंतु, त्यांचें आरोग्य किंवा बल स्वतःकडे तुला ओढून घेतां येणार नाहीं”.

कांहीं मनुष्यांची शरीरप्रकृति जन्मतःच रडकी असते, हें खरें; पण, असे लोक थोडे. व यत्नानें अशी प्रकृतीहि सुधारतां येईल, खास.

शरीरस्वास्थ्यावांचून चित्तस्वास्थ्य लाभत नाहीं; इतकेंच नव्हे, तर नाना प्रकारच्या विद्या, कला, कौशल्यें,—फारकाय पण खेळ देखील, निर्मळ प्रकृतीवांचून नीट साधत नाहींत. टेलर म्हणतो, “चेंडूफळीच्या खेळांत वर्चस्व मिळविणें तरी त्याला योग्यासारखा इंद्रियजय व शरीराचें स्वास्थ्य लागतें”. विद्यार्जन तर पुष्कळसें शरीराधीन आहेच आहे. नाटक्ये, सरकसवाले, गवई यांना देखील शरीराची जोपा अवश्य लागते. एतावता, आयुष्यांतील कोणत्याहि अवस्थेंत सुख प्राप्त होणें किंवा कोणताहि सदुद्योग धडपणें तडीस जाणें तर शरीरस्वास्थ्य अत्या-

वश्य आहे: त्यावांचून सुखहि दुःखमय होतें. तुकारामानें म्हटलें आहे:—

( अभंगचरण )

रोगियासि विषतुल्य तें मिष्टान्न ।

अर्थात् इतकें आगत्याचें जें आरोग्य तें बिघडविण्यास क्षणाचा वेळ लागत नाहीं हा आपणा सर्वांचा अनुभव आहे. पण त्याचेच उलट, आपण कायद्यानें वागल्यास, हेंच शरीर अजर होऊं शकेल व यंत्राप्रमाणें आमरणांत सुरळीत चालू राहील ही गोष्ट शेंकडोंच्या लक्षांत नाहीं. बरें, हा कायदा म्हणजे कांहीं अवघड नाहीं; खाणें, पिणें, उद्योग, व्यायाम इत्यादि हरएक गोष्टींत 'नेमस्तपणा' राखणें हाच काय तो कायदा. परंतु, शेंकडा नव्वद लोक हा कायदा मोडून, आहारविहारांत फाजील-पणा करीत असतात. कधीं काळां मेजवानीचे प्रसंगीं दोन घांस जास्त खाल्ले तर ती गोष्ट वेगळी. परंतु बहुतेक लोक आला तो दिवस खाण्यापिण्यांत अचरटपणा चालवितात, पण त्या योगानें अमृताचें विष होतें हें त्या मूढांना कळत नाहीं. अधिक खाण्यापिण्यानें शेंकडो बिघडून प्राणास मुकले आहेत. परंतु, अल्पाहारामुळें कोणी विपन्न झाल्याचें उदाहरणच नाहीं. म्हणच आहे, "भुकी तो सुखी". "भुके राखे चौथा कोन,

तेरा रोग घर घर रोवे". हीं वाक्यें लाख रुपयांचीं आहेत. अल्पाहारानें शरीर हलकें राहून इंद्रिय-पटुत्व अधिक राहतें, हा अनुभव उपोषणाचे पहाटेस येतो.* शरीर आहारलें म्हणजे इंद्रियें ज-डावतात व कार्याक्षम होतात, हाहि अनुभव अचुक आहे. इंग्रजी व संस्कृत वैद्यक ग्रंथकारां-चें असें म्हणणें आहे कीं, मानवी शरीराला प्राप्त होणारे जे कांहीं रोग आहेत त्यांपैकीं निम्मे सं-ख्या अजीर्णामुळें उद्भवते; व अजीर्णाला हेतु अध्यशन किंवा अत्यशन हेंच होय. † सरदेसाई म्हणून आमचे स्नेही आहेत, त्यांचे बंधु, अनेक

---

* व म्हणूनच धर्मग्रंथांत प्रार्थनेचे दिवशीं उपवास सांगितले आहेत. 'सुखात्मे' म्हणून अष्टावधानी गृहस्थ शेंकडोंनीं पाहिले असतील. त्यांनीं आह्मास स्वतः असें सांगितलें कीं, ज्या दिवशीं माझ्या अवधानांचा खेळ असेल त्या दिवशीं खेळ होऊन जाईतों मी जेवीत नाहीं. जेवल्यास, यावत् इंद्रियांना मांद्य येऊन अवधान वठत नाहीं, असा अनुभव आहे. **विष्णुबोवा ब्रह्मचारी** यानीं आपले वेदोक्तधर्मप्रकाशांत लिहिलें आहे कीं, क्षुधेनें किंचित् ग्लानि येई इतपत रान तापलें असतां ईश्वराकडे लय किंवा समाधि त्वरित लागते.

† ( श्लोक )

अनात्मवंतः पशुवद्भुंजते येऽप्रमाणतः ॥
रोगानीकस्य ते मूलमजीर्णं प्राप्नुवन्ति हि ॥ १

—योगरत्नाकर

पौष्टिकें व औषधें घेऊन दमले व पुण्याचे अण्णासाहेब पटवर्धनांकडे आले. त्यानीं त्यांचें अन्न अजीबात तोडलें व त्यांस एक कषाय व दूध यावर ठेविलें. दूध त्यांस फार जात नसे. तथापि चमत्कार हा कीं, सतरावे दिवसाला रोग्याचें वजन पक्के पांच पौंड वाढलें! परंतु, हें आमचें विधान त्रिवार सत्य असूनहि हें पत्करण्यास किती वाचक तयार होतील नकळे. कारण, जगांत जिव्हालौल्य फार जबरदस्त आहे. कांहीं आया तर इतक्या नादान असतात कीं आपल्या लाडक्यांना अक्षयी कोंबीत असतात, व हेंच सारें मातृत्व असें मानितात. रंगीबरंगी खाऊचें प्रस्थ तर अनर्थच माजलें आहे. अमेरिकन डाक्तर एफ्. व्ही. फूट हे ओरडून म्हणतात, "बायांनो पोरांना हे विषप्रयोग केल्यावांचून तुम्हांला चैनच पडत नाहीं काय"? चहानें तर हिंदुस्थान ठार होत आहे; पण हा शब्द उच्चारणारांस चहाभक्त हे हितशत्रूंत काढतील, इतका चहाचा पक्षपात बळावला आहे; याकरितां मौनच बरें.

आहारव्यवहाराचे नेमस्तपणाइतकीच आरोग्याला महत्त्वाची गोष्ट, मोकळ्या हवेंत व्यायाम करणें ही होय. हवा खाण्यांत गेलेले तास आयुष्यांतून वजा झाले किंवा फुकट गेले असें समजूं नये. ते वजा न जातां आयुष्याला दुपटीनें मि-

ळविले जाऊन तुमचें आयुष्य दीर्घतर करतील ह्यांत संदेह नाहीं. व्यायाम शब्दाचा यौगिक अर्थच 'विशिष्ट दीर्घता' असा आहे. अर्थात् व्यायामानें आयुष्यास दीर्घता आलीच पाहिजे. मात्र एथेंहि माफकपणा पाहिजेच. तो अर्धशक्तीनें घ्यावा असें वाग्भटाचें म्हणणें आहे. § नाकांतून वहाणारा श्वास तोंड उघडून टाकण्याची पाळी आली म्हणजे व्यायाम पुरा करावा, असें योगरत्नांत लिहिलें आहे तें समंजस आहे.* मोकळ्या हवेचें महत्त्व इंग्रेजी ग्रंथांत मोठीं स्तोत्रें करून गाइलें आहे, आणि तें यथार्थहि आहे.

---

§ (श्लोक)

अर्धशक्त्या निषेव्यस्तु । बलिभिः स्निग्धभोजिभिः ॥

**—वाग्भट**

**भावार्थः**—बलवान् व स्निग्ध आहार करणारे लोकांनीं व्यायाम घ्यावा, पण तो आपली अर्धशक्ति खर्च होईपर्यंतच घ्यावा.

त्या अर्धशक्तीचें माप असें आहेः—

* (श्लोक)

हृदयस्थो यदा वायुर्वक्त्रं शीघ्रं प्रपद्यते ॥
मुखंच शोषं लभते । तद्बलार्धस्य लक्षणम् ॥ १

**—योगरत्न**

**भावार्थः**—जेव्हां हृदयस्थ वायु (नेहमींप्रमाणें नाकावाटे न जातां) झपझप मुखावाटे जाऊं पहातो व तोंडाला कोरड पडूं लागते तेव्हां आपली अर्धी शक्ति खर्ची पडली असें समजावें.

लबक म्हणतो, याशिवाय, शारीरिक किंवा विषयजन्य सौख्यें कितीहि गोड वाटली तरी तीं विद्युल्लतेसारखीं क्षणिक आहेत; एवढेंच नव्हे तर, पुष्कळदां विजेप्रमाणें कायमचा धक्का देऊन चालतीं होतात, हें सुज्ञानें ध्यानांत वागवूनच त्यांचें ग्रहण करावें. परंतु, इतिहास पहावा तों आडाम आणि इव्ह ह्यांचे वेळेपासून आजपर्यंत अनंत जीव लंपटपणामुळें—प्रमुखतः जिव्हालौल्यानें—अकाल मृत्यु पावले आहेत व पावत आहेत. लॅटिन भाषेंत एक म्हण आहे कीं, “ तरवारीपेक्षां जिव्हेनें अधिक लोकांचे गळे कापले आहेत ”. बेकन म्हणतो, “ सर्व बंडांपेक्षां, जिव्हेचें बंड अधिक भयंकर आहे ”. “ जीभ थांबवा आणि आयुष्य लांबवा ”. सहज मरणानें मरणारे थोडे; बहुतेक लोक आपलें मरण आपलेच हातीं ओढवितात. दीर्घायुष्याला आदिकारण सर्व गोष्टींत नेमस्तपणा राखणें हेंच होय. म्हणच आहेः— “अति सर्वत्र वर्जयेत्”. ह्या नेमस्तपणाची खुणा कल्याण येथील रा० किरकिरे, बी. ए., एल्एल्., बी. यानीं स्वानुभवानें सांगितली, ती ध्यानांत धरण्याजोगीच आहे. हे गृहस्थ नियमितपणानें योग्यालाहि लाजवितील. त्यानीं सांगितलें कीं, “ करमाळें एथें माझा शौचकूप वेगळा आहे, व मी असें पाहिलें आहे कीं माझा मळ डुकरें

सुद्धां खात नाहींत. याचें कारण, माझ्या मिताशनामुळें अन्नाचा पाक इतका पूर्ण होतो कीं त्यांतील जेवढा मिळून पोषक अंश आहे तेवढा अशेष शरीरांत शोषला जाऊन, मल म्हणजे अत्यंत निःसार असा अवशेष असतो, व त्याचें स्वरूप बकरीच्या मळाप्रमाणें शुष्क व घट्ट असते". ही गोष्ट डॉक्टर कुन्हे यांनाहि कबूल आहे. किरकिऱ्यांचा हा कायदा सर्व लोक पाळतील तर अन्न कमी पुरून लोक दीर्घायु व अधिक उद्यमशील होतील. कारण राजश्री किरकिरे नित्य पांच तास मुन्सफीचें काम करून शिवाय इतके धंदे करितात कीं, त्याचे तिपटीनें खादाड मनुष्यास तितके होणार नाहींत. 'हंस' या सहीनें केसरींत जे कैलासयात्रेचें वर्णन देत त्यानीं लिहिलें आहे कीं, मी हिमालय उतरून कैलासाकडे जातांना नित्य आठ किंवा नऊ बिसाकिटें खाऊन दहा दहा मैल प्रवास करीत असें. हें सांगणें अनृत नव्हे. आतां हें पाळण्यानें म्युनिसिपालिट्यांचें सोनखत तुटेल खरें; परंतु, हल्लीं अनेक शरीरांचें खत होत आहे तें बंद होऊन सोनें होईल हें खास.

लबक म्हणतो कीं, अतिपानाचे ( मद्यपानाचे ) परिणाम तर अत्यशनापेक्षांहि भयंकर होतात. शेक्सपिअर म्हणतो:—" देवा ! देवा !

मनुष्यें आपलें मनुष्यत्व हरण करणारा हा मद्य-रूप शत्रु आपले हातानें आपले घाटीखालीं उतरतात, या मूर्खत्वाला काय म्हणावें" ? कीच-काख्यानांत **मयूर** कवीनें " न करील कां पित्याची दुर्गतिची माउली सुरा माती " या ओळींत सुरेला 'नरकाची आई' म्हटलें आहे, तें सर्वथा यथार्थ म्हटलें आहे. लब्बक म्हणतो:—आधि, व्याधि, कलह, अकारण घाय, ताम्र नेत्र, वायचळपणा, या सर्व गोष्टी एकत्र कोठें दिसतात, म्हणून कोणीं विचारिल्यास त्याचें उत्तर ' जे गुत्ताक्षेत्रीं जाऊन ताम्रवर्णी पेयाचा आस्वाद करितात त्यांचे ठिकाणीं ' हें होय. परंतु, हें सर्वानर्थमूल व्यसन युरोपांतील राष्ट्रांना व्यापून सांप्रत भारतालाहि घेरतें आहे. नुकताच झालेला मद्यपाननिषेधक प्रयत्न याची साक्ष आहे. या मदिरारूपी बयाचें एका ग्रंथकारानें पुढीलप्रमाणें अलंकारिक वर्णन केलें आहे. तो म्हणतो:—

" या बाईचें वर्णन मोठें ऐकण्याजोगें आहे. हिचें माहेर परद्वीपांत. हिचे पाणिग्रहणाबरोबर[1] पित्याची[2] मुद्रा सानंद होतीसें सांगतात. हिला पतीनें[3] सोडल्यामुळें, ती देशाटन करीत असते. तिला मोठमोठालीं विद्यापीठें, क्षेत्रें, धुंडण्याचा

---

१. लग्न; पक्षीं, हातीं धरणें. २. बाप; पिणारा. ३. नवरा; अब्रू.

फार नाद. ती व्हावें तसलें रूप घेते; ही मोठी सुस्वरूप आहे; तिचा वर्ण गुलाबासारखा मनोहर आहे. तिचे तोंडाला नेहमीं वास येत असतो यामुळें 'अखंड सुवासिनी' ही संज्ञा तिला फार शोभते. ती देवाप्रमाणें स्वतः बहुतेक अबोल आहे; पण तिची ज्यावर मेहरबानी झाली तो मुका असला तरी बृहस्पतितुल्य वाचाळ होतो. ही बहुगुणी आहे; लोळण-फुगडी, पिंगा वगैरे पोरींचे खेळहि तिला येतात. तसेंच, नर्तन-अभिनयादिकांतहि ती फारच कुशल आहे. ती पात्रें[1] पाहून आपली वृत्ति बदलिते; वैष्णवाप्रमाणें ती मस्तकीं मुद्रा[2] धारण करिते; ती एकादाच शब्द[3] बोलते; पण तेवढ्यानें श्रोत्यांस अगदीं वेडाऊन सोडिते; ही महापंचाक्षरी[4] आहे. हिचे कृपेनें सेवकें[5] वृद्ध असला तरी तरुण होतो. ही स्वतः फार जलाल व तापट आहे. पण हिचे अनन्य भजनीं लागेल त्यास त्वरितच गार करिते. ही दर्शनकालीं हंसतमुख[6] असते. हिला मोठमोठाले पुरुष मान देतात; व यामुळें हिचे आगमनाबरोबर लज्जा, शुद्धि, अब्रू, शक्ति वगैरे भिडस्त स्त्रिया दूर जातात. हिचा उपदेश

---

१. योग्य पुरुष; प्याला, भांडें. २. बाटलीवरील सील. ३. बुचाचा फट् आवाज. ४. मांत्रिक; पांच अक्षरांनीं युक्त. ५. नोकर; मद्य सेवन करणारा. ६. वरील शुभ्र फेंसामुळें.

ज्यांनीं घेतला त्यांचें भेदज्ञान तत्काळ नष्ट होतें. तसेंच त्यांचा झोंक, ताठा जाऊन ते इतके नम्र होतात कीं, भर रस्त्यांत देखील लोकांपुढें दंडवत घालितात. ही इतकी मायावी आहे कीं, मनुष्याचे पोटांत शिरून तत्काळ त्याचेकडून असेल तें ओकविते. ही इतकी धट्ट आहे कीं, चारचौघांसमक्ष देखील एकान्त गोष्टी करिते. हिचा नेत्रपात होतांच भक्तांची समाधी लागते. सद्गुरूप्रमाणेंच ' आपणासारिखें करिती तत्काळ। नाहीं वेळ काळ मग त्यांशीं ॥ ' असें हिचें सामर्थ्य आहे. माहितगार लोक हिचे समागमानें होणारा आनंद थेट ब्रह्मानंदापेक्षांहि कांहीं जास्त असें सांगतात; व हें खरेंहि असावें. कारण, ' कोण देहातें सांभाळी ' या उत्तरार्धाचा प्रत्यय इतरांचेहि दृष्टीस येतो खरा. ही गरीबगुरीबांनाहि ओळखते, तरी ही सुवर्णाक्षरांनीं[१] मंडित असल्यामुळें शिक्षणाचे भोक्ते हे तिचा फारच मनःपूर्वक आदर करितात. ' मी मी' म्हणणारे बडेमिया, पण या बाईनें त्यांना गुलाम करून सोडलें आहे. इतर कामीं कशीहि हयगय होवो, हिचे भेटीचें नेमलें मिनिट चुकतां कामा नाहीं, असा कांहीं हिचा कडक अंमल आहे. मोठमोठाले लोक हिला हात जोडून उभे आहेत.

१. विद्वत्ता; बाटलीवरील सोनेरी अक्षरें.

ही मोठी रंगेल असून अवर्णनीय शक्तिरूप आहे. अशी ही बाई कोण हें वाचकांचे लक्षांत आलेंच असेल. या बाईच्या संगतीनें आज हजारों घरांची धुळधाण चालली आहे. हिच्या नादानें हजारों गाजींचे पाजी बनले आहेत पण आला तो दिवस या बाईचीं वळणें अधिक अधिक वाढत आहेत अशी तिजपाशीं काय मोहिनी आहे न कळे!

लबक म्हणतो, मद्यपानानें मनुष्य भिक्षांदेहीस लागतो. याचेंहि कांहीं नाहीं; परंतु, तो मनुष्याचा पशु—नव्हे, पशूहून नीच—होतो, हें मला शल्यवत् टोंचतें. त्याला विपत्ति आली हें दुःख नव्हे; पण त्यानें ती स्वहस्तानें आणली, हें पहाणें असह्य होतें. मद्य हें परिणामीं विषोपम आहे हें वेगळें; पण आरंभींहि विषोपमच आहे. परंतु, मनुष्याला तें तसें वाटत नाहीं, उलट वाटतें; आणि मग तें छातीवर बसतें. कारण, जो कोणी स्नेह्याखातर म्हणून प्रथम एकादा घोट घेतो, त्याची उदासीनता, आळस, थकवा हीं तत्काळ जाऊन त्याला तरतरी येते. वाणी जलद चालूं लागते; व प्रेमालाहि रंग चढतो. चिंता मावळते; स्मृति जागृत होते; बुद्धि त्वरित स्फुरते; आशा अंकुरित होते; उमेद वाढते; दिल खुष होतो; इ० इ०. असें झालें

म्हणजे तो ‘ प्रमाणगणिता ’चा उपयोग करा-वासा वाटून दुसरें माप घशांत ओततो. त्याला वाटतें, आतां तर मी शतगुणित आनंदांत राहीन; वाचस्पति होईन; केवळ दिव्यच होईन; परंतु, तें दिव्यत्व लोपून **कालिदासानें** म्हटलें तसें—

( श्लोक )

नयनान्यरुणानि घूर्णयन् । वचनानि स्खलयन् पदे पदे ॥
+ + वारुणी मदः । प्रमदानामधुना विटंबना ॥ १

**—कुमारसंभव**

सर्व विटंबनेला कारण होतें. रावांचा झोंक-दारपणा नाहींसा होऊन गटाराकडे मात्र झोंक जाऊं लागतात. वाचस्पतित्वाचे जागीं वाचाल-पण येतें; स्नेहाचे जागीं कलहप्रियत्व येतें; तर-तरी जाऊन तरतराट येतो; व सगळ्या अक-लेचा, प्रकृतीचा, शेणखळा होतो. मार्टिनो म्ह-णतो, “ आळसानें मंदगति झालेले रक्तांत रंगीत पेयानें तरतरी आणूं या भ्रमाला बळी पडून कितीकांचा तरी सत्यनाश झाला आहे बरें ? ”

जन्ममरणांच्या नोंदी पाहिल्या असतां, नेमस्त मद्यप्यापेक्षांहि साधे लोक अधिक जगतात असें स्पष्ट दिसतें, व तें हिशोबीच आहे. कारण, मद्य केवळ शरीराचाच खराबा करून रहात नाहीं; तर मनाचाहि तसाच करितें. प्रसिद्ध साधु कबीर म्हणतातः—

(पद)

वंदे हुषार रहनावे। साहेब राजी रखनावे ॥ ध्रु०
गांजा दारू मत् पी यारो। आकल गुंग हो जाती।
आपने पल्लोके दाम खरचकर। मूमे मखिया जाती॥१

मद्यानें शांत असतील ते कज्जेदलाल होतात. मनोवृत्ति क्षुब्ध होऊन धिमा मनुष्यहि अनावर होतो. व पवित्रपणाची आवड सर्वप्रकारेंच कमी होत जाते. जेरेमी टेलर म्हणे, " आपल्या सर्व दुःखाला आपणच कारण आहों. रानचें कंदमूल आणि झऱ्याचें पाणी यांनीं माझ्या गरजा भागून सर्व ताप शांत होतो. आशा, तृष्णा, मत्सर, अहंकार, या सर्व रिपूंपासून मी मुक्त असल्यानें स्वस्थ आणि शांत निद्रेंत घोरत पडतों ". भर्तृहरि म्हणतातः—

(श्लोक)

फलमलमशनाय स्वादु पानाय तोयं।
शयनमवनिपृष्ठे वल्कले वाससीव॥
नवधनमधुपानभ्रांतसर्वेंद्रियाणा-
मविनयमनुमंतुं नोत्सहे दुर्जनानाम्॥ १

भावार्थः—मला निर्वाहाला झाडांचीं फळें व पानार्थ झऱ्याचें गोड पाणी पुरेसें आहे. शयनास भूतल व वस्त्रा-ऐवजीं वल्कलें पुरे आहेत. यामुळें, नवीन संपत्तिरूपी मद्यपानानें किंवा नवीन संपत्ति व मद्यपान यांचे योगानें ज्यांचीं सर्वेंद्रियें भ्रांत झालीं आहेत, अशा दुर्जनांचे दारीं जाऊन त्यांनीं केलेलें उद्दाम वर्तन माझ्यानें सोसवणार नाहीं.

आपलें मानवी शरीर हें अतिशयच करामतीनें जुळविलेलं व अति रमणीय असें एक नाजूक यंत्र देवानें आपल्या हवालीं केलें आहे. अर्थात्, शेजाऱ्याच्या मागून आणलेल्या घड्याळाप्रमाणें आपण हें फारच जपून वागविलें पाहिजे. लब्बक म्हणतो, या यंत्राची पूर्णता व सौंदर्य केवळ अलौकिक आहेत. म्हणूनच अशाचा नाश करण्याची आपणास शरम वाटली पाहिजे. कोणतीहि वस्तु तिचे योग्यतेप्रमाणें वापरली पाहिजे. भवभूति म्हणतो:—

( श्लोकार्ध )

नैसर्गिकी सुरभिणः कुसुमस्य सिद्धा ।
मूर्ध्नि स्थितिर्न चरणैरवताडनानि ॥ १

—उत्तररामचरितम्

भावार्थः—कोमल व सुगंधी पुष्प म्हणजे मस्तकींच ठेवावयाचें. तें पायांनीं तुडविणें मूर्खत्व आहे. या शरीराचें दिव्य मंदीर बनविणें किंवा कचऱ्याची पेटी बनविणें हें आपल्या स्वाधीन आहे.

रोमन लोकांत दोन मोठ्या महत्त्वाच्या म्हणी असत. ते म्हणत:(१) उद्योगाला अजिंक्य कांहींच नाहीं; व (२) उद्योग हा स्वतः सुखकर आहे. या म्हणी सर्वथा सत्य आहेत. कोणी मनुष्य कोणतेंहि काम करो, तें मनःपूर्वक करीत असला म्हणजे त्यांतच त्याला सुख होतें. देह व मन हीं वापरतीं ठेविलीं पाहिजेत, हा ईश्वरी सं-

कल्पच आहे. आणि याप्रमाणें तीं वापरलीं नाहींत तर गप्पहि बसत नाहींतच, व आळसानें त्यांस गंज चढतो. बरें, उद्योगानें आपला व्यवहार साधून रात्रौ आपणाला शांत व अमृतमय निद्रा येते. या निद्रेची सचिंत व वैभवशाली जीवांना फारशी गांठहि पडत नाहीं. हेन्री राजा म्हणतोः—

( श्लोक )

हे निद्रे मधुरे, प्रजाजन तुवां सप्रेम आलिंगिले ।
घेती झोंप सुखें, करूनि दिवसा उद्योग जे भागले ॥
भीशी कां नकळे, मला न शिवशी पक्ष्मांतिही कोमले ।
दुःखा विस्मृति ना पडे, मम जिणें दुःसह्य हें जाहलें ॥ १

—शेक्सपअर

या निद्रेचीं इंग्रजी कवींनीं निरनिराळीं रूपकें केलीं आहेत. कोणी तिला निसर्गाची कोमल धात्री म्हणतात; कोणी विचाराचें आवरण, क्षुच्छामक अन्न, तृट्शामक पेय, हिमनिवारक उष्णता, उष्णतानियामक शीतता,-राजा, रंक, बालिश व पण्डित यांस सारखेंच मोजणारें माप, इत्यादि संज्ञा देतात. बरें, असली ही अमोल वस्तु मिळण्यास कुठे देशांतरीं जावयास नको. दिवस योग्य व्यवसायांत घालविला म्हणजे रात्रौ निद्रा ठेवलेली. आतां, कधीं कधीं आयुष्यांत निद्रा उडविणारे असे आकस्मिक प्रसंग येतात,

व त्या वेळीं वरील नियम काम देत नाहीं; तथापि अशा वेळीं ब्रोमाइड, सल्फोनेल, द्रायोनेल इत्यादि औषधांनीं कृत्रिम झोंप आणणें फार अपायकारक होय. व्यवस्थित आचरण ठेवावें म्हणजे लवकरच पूर्ववत् निद्रा येऊं लागेल.

मन शांत ठेवण्याची आणखी एक किल्ली स्वप्नस्थितींत सांपडते. ती अशी. स्वप्नांत जागृतींतील विशिष्ट दशेची आपणास विस्मृति असते; त्यामुळें, खल्लड म्हाताराहि स्वप्नांत तरुणाचे भोग भोगूं शकतो. शरीरावरील व मनावरील जागृतींतील दडपण नाहींसें झाल्यानें मन स्वच्छंद क्रीडा करितें. देशकालादि परिच्छेद दूर झाल्यानें कल्पनाशक्ति अप्रतिबंध भराऱ्या मारीत असते. आपणास गतमित्र भेटतात. मन तितकें पवित्र व शुद्ध असल्यास, दिव्य गोष्टींचेंहि आपणास दर्शन होतें. यावरून पाहतां बाह्य चिंता झाडून टाकून जागृतींतहि मन जर स्वस्थ व शांत ठेवण्याचें साधेल तर पुष्कळ सुख होईल, हें निश्चित. पण, मन निश्चित व शांत ठेवितां येणें ही विद्या केवळ सोपी नाहीं. बरें, विश्रांतीचे वेळांतहि जर संसाराचे घोर मनाला त्रास देतील तर मग विश्रांति आणि व्यापृति यांत अंतर काय राहिलें ? असल्या विश्रांतीपेक्षां उद्योग बरा. याकरितां असले त्रासदायक विचार आपण

यत्नानें व हट्टानें मनाबाहेर घालविले पाहिजेत. बाकी हें सांगणें सोपें आहे, साधणें अवघड आहे. शिवाय, मन केवळ रितें राहणें बहुतेक अशक्यच आहे. याकरितां त्रासदायक विचार टाळून शुद्ध व आनंददायक विचार मनांत घ्यावे. आपले वेदांत याविषयीं " तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु " म्हणजे " असलें हें माझें मन पुण्य विचारांनीं पूर्ण होवो " अशा अर्थाचे अनेक मंत्र आहेत, त्यांप्रमाणें मन सद्विचारपूरित करावें. अथवा लबक म्हणतो त्याप्रमाणें, वर्तमानकाळाशीं ज्यांचा संबंध नाहीं अशा अतिपुरातन काळच्या कथा, भूगर्भशास्त्र, खस्थज्योतींचे चमत्कार, कोणाच्या शौर्याच्या किंवा प्रवासाच्या गोष्टी, इत्यादिकांचे श्रवणांत मन गुंतवावें, म्हणजे नित्याचे कर्मकहाणीची विस्मृति पडून तितकेंच मन हलकावतें. कारण, अशा वेळीं मन चालू दिवसाच्या कटकटी विसरून कल्पनेच्या पंखांवर बसून अनाद्यनंत देशकालांचे प्रदेशांत मौजेनें उडत राहतें व त्या आनंदानें प्रसन्न व ताजेंतवानें होतें. परंतु, ज्यानें कांहीं दुष्कृत्य केलेलें असेल अशाला असले उपाय उपयोगीं पडणार नाहींत. कारण अशाचें मन त्याला पोळीत रहातें. हॅमलेटचा चुलता क्लाडिअस याचे डोळ्यांपुढें सुंदर नाटक चाललें असतां त्याचें मन त्याला अधिकच छळूं लागलें,

हें सुप्रसिद्धच आहे. अर्थात्, कृत्रिम शांति मिळ-
ण्यास देखील मन निर्दोष पाहिजे, व तसें हो-
ण्यास सदाचरण पाहिजे.

लबक म्हणतो, मोठमोठे ऋषि व भविष्यज्ञ
साधु अशांना जे दिव्य साक्षात्कार झाले आहेत,
ते रात्रीचे वेळीं मन प्रशांत व विश्रांत असतां-
नाच झालेले आहेत. ही गोष्ट दिवसाचे भकास
उजेडांत साधत नाहीं. दिवसा सूर्यप्रकाशानें
आपणास असंख्य वस्तु दिसतात हें खरें; त-
थापि सूर्य अस्तमित होऊन रात्र पडली आणि
लाखों, कोटों ग्रह-नक्षत्र-तारकादि दिव्य र-
त्नांनीं आकाश भरून गेलें म्हणजे आपणास
असें वाटते कीं, सूर्यानें आपणास दिवसा स्व-
प्रकाशानें अनेक सुंदर वस्तु जरी दाखविल्या
तरी त्यांहीपेक्षां अनंत पटीनें रमणीय अशा
असंख्य वस्तु त्यानें त्याच प्रकाशानें आपल्या
दृष्टीपासून अंतरित केल्या होत्या. सारांश, निशा-
समय दिवसापेक्षांहि रमणीय व विश्रांतिदायक
असल्यानें दिव्य विचारांना पोषक आहे, आणि
आजसारख्या स्वार्थसाधु काळांतहि कोणाला
जर कांहीं दिव्य दृष्टान्त होत असले तर ते ढव-
ळ्या दिवसास न होतां ज्योत्स्नाभिराम अशा
गंभीर निशीथ समयींच होतात. व यासाठींच

योगीलोकांचें घड्याळ उलट चालतें. गीतेंत भगवंतानीं म्हटलें आहे:—

( श्लोक )

या निशा सर्व भूतानां । तस्यां जागर्ति संयमी ॥
यस्यां जाग्रति भूतानि । सा निशा पश्यतो मुनेः ॥ १

**भावार्थः**—इतर प्राणी जेव्हा घोरत पडतात तेव्हां योगी जागा असतो; आणि इतर जेव्हां जागे असतात तेव्हां हा निजून असतो. *

---

* या श्लोकाचा गूढार्थ वेगळा आहे; त्या गूढार्थाचें एथें प्रयोजन नाहीं.

सुषारथिरश्वानिव यन्मनुष्यान्नेनीयतेऽभीशुभिर्वाजिन इव । हृत्प्रतिष्ठं यदजिरं जविष्ठं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ।

—यजुर्वेद

**भावार्थः**—जसा सारथी घोड्याला आपले मार्गानें घेऊन जातो, त्याप्रमाणें, जेथें मन आसक्त असतें तेथें तें प्राण्यांना बळजवरीनें घेऊन जातें. तसेंच, तें मन सारथी ज्याप्रमाणें लगामांनीं घोड्यांना आपले कह्यांत ठेवितो त्याप्रमाणें सर्व प्राण्यांचें नियमन करितें. सर्व प्राणिमात्र मनाच्या आधीन असल्यासारखे झाले आहेत. या मनाला विचारी महात्मे आपल्या ताब्यांत ठेवतात व मूर्खलोक त्याच्या ताब्यांत रहातात. मन जेव्हां पवित्र असतें तेव्हां तें **सुखदायक** होतें व जेव्हां अपवित्र असतें तेव्हां तें **दुःखदायक** बनतें. जे मनुष्य याला जिंकतात त्यांना सिद्धि मिळते व जे याच्या ताब्यांत राहतात त्यांना अवनतीला जावें लागतें. म्हणून पूर्वीच्या उपायांनीं याला वश करावें.

# प्रकरण ३

## मन

कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धृतिरधृति-र्ह्रीं-धीं-भी-रित्येतत्सर्वं मन एव । —श्रुति

**भावार्थः**–काम, संकल्प, संशय, श्रद्धा-अश्रद्धा, धैर्य-अधैर्य, लज्जा, बुद्धि, भीती, हीं सर्वहि मनाचींच स्वरूपें आहेत.

आपलें हें मानवी शरीर तर आश्चर्यकारक व अमोलच खरेंच; परंतु त्यांत वसति करणारा जो आत्मा म्हणून आहे, तो या शरीरापेक्षां अनंतपटीनें तसा आहे. देह हें मंदिर व आत्मा हा त्यांतील देव असें म्हटलें म्हणजे या दोहोंतील योग्यतेचें तारतम्य ध्यानांत येईल. आत्म्याचें मोल केवळ देहाहूनच अधिक नव्हे, तर निखिल ब्रह्मांडाहून वरिष्ठ आहे. सेंट मार्क म्हणतो, "मला पृथ्वीचें राज्य दिलें आणि माझा आत्मा हिरावून नेला, तर मला काय प्राप्ति"? एडेसा एथील राजा होता त्यानें ख्रिस्ताचे चमत्कार ऐकून त्याला गांठून 'माझें शरीर निर्मळ कर' असें मागणें मागितलें; परंतु 'माझें मन निर्मळ कर' असें तो बोलला नाहीं; याबद्दल लोक त्याला हंसले. बाकी शरीर तुच्छ मानावें असें

मात्र नाहीं. कारण, आत्मा जरी मुख्य असला तरी त्याला देहाश्रय अवश्य आहे, अर्थात् 'आत्म्याचें घर' या नात्यानें तरी देहाचें महत्त्व कांहीं हलकें नव्हे. शिवाय, हा नरदेह तरी एक अलौकिक करणी आहे! त्यांतील विवेकशक्ति केवढी उदार! ज्ञानकला किती अगाध! आकार व चलनवलन किती मोहक व अजब! त्याचें क्रिया-सामर्थ्य केवळ देवदूतांसारखें व बुद्धि तर देव-तुल्य; असा हा चमत्कारमय आहे. तेव्हां तोहि आदरणीय आहेच.

अशा या देहांत दिव्य तेजाची ठिणगी कमी-जास्त प्रमाणानें आहे. भगवंतानीं गीतेंत स्पष्टच सांगितलें कीं,

( श्लोकार्ध )

ममैवांशो जीवलोके । जीवभूतः सनातनः ॥

म्हणजे, मृत्युलोकांत जीव संज्ञेनें अवतीर्ण झालेला हा माझाच सनातन अंश आहे. व

( श्लोक )

यद्यद्विभूतिमत्सत्वं । श्रीमदूर्जितमेव वा ॥
तत्तदेवावगच्छत्वं । मम तेजोंऽशसंभवम् ॥ १

भावार्थः—तुला जो कोणी वैभवयुक्त, श्रीमान् किंवा ऊर्जस्वल प्राणी आढळेल त्याचे ठिकाणीं माझे तेजाचा विशेष अंश आहे असें तूं समज.

अर्थात् जो कोणी शांतपणें विचार करील त्याला ह्या मानवी जीविताची महती कबूल करावीच ला-

गेल. सर थामस ब्रौन आपल्या निबंधांत म्हणतो:—" मनुष्य हा केवढा दिव्य प्राणी आहे. त्याला मातींत पुरा किंवा त्याची राख करा, तरी देखील त्याचें थोरपण झांकत नाहीं".

मनुष्ययोनींत जन्म मिळणें ही देणगी देवापासून मिळणाऱ्या सर्व देणग्यांतील श्रेष्ठतम आहे. म्हटलें आहे—" दुर्लभं मानुषं जन्म "— 'धन्यधन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पहा हो ॥' तें यथार्थच आहे. केवळ भौतिकदृष्टीनेंच पाहिलें तर मनुष्य म्हणजे कांहीं रासायनिक द्रव्यांचा मिलाफ आहे, व त्याचे नित्याचे कामाचें मान म्हणजे दोन शेर कोळशांचे उष्णतेपासून होणाऱ्या उष्णते इतकें आहे! प्रसिद्ध शास्त्रज्ञ हक्स्ले गमतीनें एकदां म्हणाला, मनुष्य मनुष्य तो काय?—अमोनिआ कॅर्बोनेटिस, सोडीफॉसफेटिस, कलोरिस ( ९८·$\frac{०}{४}$ ), व्हक्युइ पर्फेक्टिसिमि, पेशन्शी, व अक्की डिस्टिलॅटी यांचें मिसळण, म्हणजे झाला मनुष्य! हक्स्ले हें विनोदानें म्हणाला. परंतु कित्येक लेखक या नरदेहाबद्दल मोठे तिरस्कारयुक्त उद्गार काढितात. या देहाचे क्षणभंगुरत्वाविषयीं तर जागोजाग ओरड आहे. स्कॉट म्हणतो:—

( साकी )

तृणाग्रवर्ती बिंदु हिमाचे । फेनोद्गम कीं तरंगिणीचे ॥
अथवा बुद्बुद पर्जन्याचे । लोल तसा देहो ॥ १

बायबलांत मानवी जीविताला स्वप्न, निद्रा, छाया, वाफ, जलतुषार, गतगोष्ट, अशा प्रकारच्या असारत्त्वबोधक अनेक उपमा दिल्या आहेत. बरें, जीविताचें नुसतें ऱ्हस्वत्वच गाऊन भागलें नाहीं. शेंकडोंचा त्याचे तुच्छत्वावर विशेष कटाक्ष आहे. गौतमबुद्धाचें तर हें आदिसूत्रच होतें. त्याला सर्व जीवित दुःखमयच दिसत होतें. बुद्ध म्हणे—" जन्म म्हणजे उदरांतून बाहेर येणें, तें दुःखच; पुढें जराग्रस्त होणें तें दुःखच. आयुष्यांत प्राप्त होणाऱ्या आधिव्याधि ह्या तर मूर्तिमंतच दुःख; शत्रूचें दर्शन हेंहि दुःख; मित्राचा वियोग हेंहि दुःखच; सारांश, यावत् पंचेंद्रियांचे संबंध हे दुःखहेतु, व यास्तव सर्व जीवितच कष्टमय आहे ".

होमरनें आपोलोकडून वदविलें आहे कीं:-

( गीति )

हे मर्त्य दुःखभागी, पार्थिवजनि, अल्पजीवि तरुदलसे ।
विलसुनि गळती सत्वर, सुर हो त्यां साह्यदान योग्य नसे १
यास्तव तत्कृत-समरा मानुनियां तुच्छ सर्व अमरगण ।
दूर असा; घालूं द्या गोंधळ मूर्खांस त्या करूनि रण. २

व्हिक्टर ह्यूगोलाहि हें जीवित रणरणकदायी वाटत असे. पण गंमत ही आहे कीं, लोक या जीविताविषयीं इतकी कुरकूर करितात, तरी या जीविताचा विरह व्हावा असें इच्छित नाहींत.

कारण, असलेहि लोक मृत्यूची गोष्ट काढतांच दचकतात व म्हणतातः

( गीति )

हर! हर! वैभव, सत्ता, परिजन, चंद्रानना सपरिवार।
होणार मृत्युकवलित! देई चित्तास दुःख हें फार ॥ १

—ग्रे

पण, अशांना जर विचारिलें कीं, कां ? जीवित कष्टमय ना ? मग आतां मृत्युबद्दल विलाप कां ? तर म्हणतात—

( गीति )

भीत नसों मृत्यूतें: भीतों आह्मीं तदुत्तर स्थितितें।
नकळे जाऊं कोठें, पावूं अन्यत्र कोणत्या गतितें ॥ १

—ड्रायडन

मरणोत्तर काय गति होत असावी, हें गूढ सर्वत्र सर्व लोकांना आहे. व त्याबद्दल प्रत्येक धर्मांत निरनिराळे तर्क व समजुती आहेत. आमचे अतींद्रियद्रष्टया ऋषींनीं मात्र याचा उलगडा सप्रमाण व समाधानकारक केला आहे. या कामीं पुराणग्रंथांत अनेक ठिकाणीं उल्लेख आहेत. गरुड पुराणांत तर त्याचा विशेषच खल आहे, आणि यम व नाचिकेत यांचा उपनिषदांत दिलेला हृदयंगम संवाद या प्रकरणीं सर्वांस वाचनीय आहे. थिआसफीवाल्यांनींहि आपले शास्त्राधारें याविषयीं " डेथ आणि आफ्टर " वगैरे ग्रंथ लिहिले आहेत.

सिनेका म्हणतो, "एकाच मृत्यूचें स्वरूप निरनिराळ्या लोकांस निरनिराळें भासतें. कोणास तो प्रिय वाटतो; कोणास तो दुःखहर्ता भासतो; व तोच आपली चरमगति हें तर सर्वांसच वाटतें. कित्येकांचा मृत्यूचे नांवाबरोबर थरकांप होतो; कारण, मृत्यु म्हणजे क्लेशांची परमावधि अशी त्यांची कल्पना असते". म्हणच आहे–" नास्ति मृत्योः परं भयं". परंतु, खरें पाहतां मृत्यु सर्वांसच क्लेशदायी नसतो. जराजीर्णांचा प्राण पुट्दिशीं केव्हां जातो तें कळत देखील नाहीं. कित्येकांचे प्राण शिंक किंवा उचकी येतांच गेले आहेत. प्रसिद्ध न्यायमूर्ति रानडे नित्याप्रमाणें रपेट करून आले आणि एखाद्या इच्छामरणी मुनीप्रमाणें नाहींसे झाले. यहुदी लोकांतील ज्ञाते त्यांच्यापैकीं मोझेस, एरॉन, व मिरिआम यांचा मृत्यु म्हणजे केवळ प्रियेच्या चुंबनाप्रमानें सुलभ व गोड होता, असें मानितात. कांहीं लोक तर मृत्यु म्हणून कांहीं निराळा आहे असें मानीतच नाहींत. एक अमेरिकन कवि म्हणतोः–

( साकी )

मृत्यु नव्हे हा स्वर्गद्वारप्रवेश मजला वाटे।
नामश्रवणें इतर जनांचे न कळे कां मन फाटे ॥ १

—लॉंगफेलो

आमचे गीतेनें तर मृत्यूचा बागुलबोवा मुळींच हाकलून लाविला आहे. भगवान् म्हणतातः—

( श्लोक )

देहिनोऽस्मिन् यथा देहे। कौमारं यौवनं जरा ॥
तथा देहांतरप्राप्तिर्धिरस्तत्र न मुह्यति ॥ १

वासांसि जीर्णानि यथा विहाय ।
नवानि गृह्णति नरोऽपराणि ॥
तथा शरीराणि विहाय जीर्णा–
न्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २

भावार्थः—पहिलें वस्त्र जीर्ण झालें असतां नवें घेणें, हाच मासला जुना देह टाकून नवा देह घेण्याचा आहे; हें जाणून ज्ञात्यांचा मृत्यूविषयीं गैरसमज होत नाहीं. प्रसिद्ध तत्त्ववेत्ता सॉक्रेटीस यानें, दहा सेनाधीशांना अन्यायानें ठार करण्याचे कामीं तीस झोटिंगांनीं केलेल्या हुकुमाला आपली संमति दिली नाहीं, व त्यामुळें तो सार्वजनिक रोषास पात्र होऊन त्याजपुढें जेव्हां विष ठेविलें, तेव्हां तो शांत व गंभीर मुद्रेनें म्हणाला—“न्यायार्थ मरणें हा मी जयजयकारच समजतों”. मेकॉले म्हणतो, सॉक्रेटिसाच्या या अखेरच्या भाषणाइतकें मनोहर व आश्चर्यकारक भाषण किंवा वाक्य मीं अन्यत्र केव्हांच वाचलें किंवा ऐकिलें नाहीं. मिल्टन कवीला सॉक्रेटिसाचे हे मृत्यूबद्दलचे उद्गार रुचले नाहींत. तो म्हणाला:—

( साकी )

अनंतकालावगाहनक्षमसंविद्रत्नप्रपूर्ण ।
नरजीवित हें कष्टप्रदही सोडवे न मज तूर्ण ॥
मृत्यू मज न रुचे। दुःखद, दुःख हरी कैचें ॥ १

मेकॉले म्हणतो, प्रथम प्रथम माझेंहि मत मिल्टनप्रमाणेंच होतें; परंतु आतां आयुष्याचा एक एक दिवस अधिक लोटतो, तों तों **साक्रे-टिसाच्या** मताकडेच माझा कल वळत चालला. मृत्यु इष्ट वाटो कीं अनिष्ट वाटो, तो प्राप्त झाला असतां **साक्रेटिसानें** ज्याप्रमाणें निर्भयपणें व आनंदानें त्याचा अंगीकार केला, तसाच प्रत्ये-कानें केला पाहिजे. **साक्रेटिसाची** अखेरची वि-नंति वाचली म्हणजे **साक्रेटीस** हा मृत्यूचे वि-क्राळ दाढेंत सांपडलेला कोणी अपराधी नसून मौजेनें स्वर्गारोहण करणारा कोणी महात्मा अ-सावा असा भास होतो. आमचे **तुकारामबोवा** तर टाळांचे गजरांत लोकांना रामराम करीत म्हणतातः

( अभंग )

आह्मी जातो आपल्या गांवा। आमचा रामराम घ्यावा॥

यौं रे बहाद्दर. " तरति शोकमात्मवित् " म्हटलें आहे, तें खोटें नव्हे. **कालिदास** म्हणतोः—

( श्लोकार्ध )

मरणं प्रकृतिःशरीरिणां। विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः॥

**—रघुवंश**

भावार्थः—मृत्यु हा देहधारी जीवांचा स्वभावच ठरला; व जगणें हाच विकार होय, असें ज्ञाते म्हणतात.

तथ्य हें आहे कीं, मृत्युची डर पाप्याला किंवा अज्ञानाला; ज्ञात्याला व पुण्यवंताला तो मंगळ सोहळाच वाटतो.

मनुष्याला कोणीं कोणीं देवाची प्रतिमा म्हटलें आहे; कोणीं पशु म्हटलें आहे. दोन्ही उपमा खऱ्याच आहेत. यांपैकीं पहिले उपमेस पात्र होणें, किंवा दुसरीस होणें, हें प्रत्येकाचे स्वाधीन आहे. मनुष्याची रचना व त्याचीं कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांच्या शक्ति यांचा विचार केला असतां, मनुष्य हा दैवी प्रकृति व पाशव प्रकृति या उभयांचा मिलाफ आहे असें व्यक्त दिसतें. आमचे शास्त्रांत मनुष्यजन्म हा तिर्यक्‌योनि व देवयोनि या दोहींचे मध्यें ठेविला आहे, तें रास्तच आहे. दुसऱ्या मजल्यावर राहणारास ज्याप्रमाणें एक जिना चालतांच तळमजला दिसतो किंवा वर मजलाहि दिसतो, त्याचप्रमाणें, मनुष्ययोनींतून वरील देवयोनीस चढण्यासहि सोपान मार्ग आहे व पशुयोनींत उतरण्यासहि आहे. कोणता जिना चालावा हें ज्याचें त्याचें पहाणें आहे. आहार, निद्रा, मैथुन इत्यादि पशुकर्मांचाच दृढाभ्यास करीत राहिल्यास, पशुतुल्यताहि सुसाध्य आहे. सत्य, शौच, अहिंसा, आर्जव, इंद्रियदम, शांति, भक्ति, ज्ञान, विरक्ति इत्यादि दैवी गुणांचा अभ्यास करीत गेल्यास, नराचा नारायणहि होणें सुसाध्यच आहे; व दोन्हीहि गोष्टी केवळ त्याच्या हातीं आहेत. हे दोन्हीहि मासले

दुनियेंत आढळतात, व दोन्ही स्वकृतींचेच परिणाम आहेत. कवि म्हणतो, दोन्ही मार्ग तुजपुढें खुले आहेत, ' येनेष्टं तेन गम्यताम् '.

आरंभीं मनुष्य देवप्रकृतीला निकटच असतो असा सर्वत्र सर्व देशांत समज आहे. कारण, ' बाळाजवळ देव असतो, त्याला साप चावत नाहीं, ढोर तुडवीत नाहीं ' असें पुष्कळ लोक मानितात. देवाला चिठ्ठ्या टाकिल्या तरी लहान मुलांकडून आपण उचलवितों; याचें तरी इंगित हेंच. सर थामस ब्रौन म्हणतो, ' " खरोखरच, पंच भूतें व चंद्र सूर्य हे निर्माण होण्याचेहि पूर्वीं जें दिव्यतेज विद्यमान असेल, त्याचा कांहीं तरी अंश आह्मांत ( मनुष्यांत ) असलाच पाहिजे ". कित्येक सत्पुरुष देखील बालवृत्तीनें राहतात. कारण बालपणीं वृत्ति निष्पाप व निष्कपट असते. बालक कोणाचा द्वेष किंवा मत्सर किंवा अपमान करीत नसून सर्वांशीं प्रेमळ असतें. हेच निर्मळ धर्म जर उत्तरोत्तर वाढत जातील तर देवपणा खचीत लांब नाहीं. पण हें घडावें कसें ? व्यवहारपटु लोक मुलांना नादान म्हणतात. आणि लबाडी, आपमतलब वगैरे ज्याला कळूं लागली अशाला ' दाणा ' किंवा ' शहाणा ' म्हणतात ! इंग्रजी भाषेंत ' कनिंग ' या शब्दाचा मूळार्थ 'ज्ञान किंवा शहाणपण' असतां,

हल्लीं त्याचा अर्थ 'लुच्चेगिरी' असा झाला आहे, यांतील वर्म तरी हेंच आहे.

बाळपणीं मुलांना वळण देणें हें त्यांचे संगतीचे मनुष्यांचे स्वाधीन आहे. विशेषतः आईबापें व शिक्षक यांवर ही जबाबदारी आहे. मुलाचें मन कोऱ्या कागदासारखें असतें. त्यावर आपणास वाटेल तें आपण लिहूं शकूं. पण एकदां भलतें कांहीं लिहिलें म्हणजे तें वज्रलेप होणार, म्हणून वेळींच लिहिणें तें जपून लिहावें. हितोपदेशांत म्हटलें आहे:—

( श्लोक )

यन्नवे भाजने लग्नः। संस्कारो नान्यथा भवेत् ॥
कथाछलेन बालानां। नीतिस्तदिह कथ्यते ॥ १

भावार्थः—ओल्या मडक्यावर करावा तो संस्कार कायम होतो. यावरून, कोमळ बाळांना कथामिषानें आह्मीं **नीति** सांगतों.

लौकिकांतहि म्हण आहे कीं 'बाळा, तें जन्मकाळा' ती खरी आहे. कोमळपणीं शिक्षणाचा जसा परिणाम होतो, तसाच परिणाम उदाहरणाचाहि होतो. बाप चिलीम ओढीत असतांना दिसला म्हणजे पोरगा निदान विडीचा तरी झुरका घेईलच. म्हणच आहे—'देख्या गुरु कीं शिक्या गुरु'. व म्हणून आईबाप होणारांनीं आपली जबाबदारी ओळखून आपलें वर्तन ठेवावें. असें जे करीत नसतील, ते समाजशत्रू समजावे.कै०

प्रो० आगरकर आह्मांस वर्गांत ही गोष्ट विशेष कटाक्षानें व निर्भीडपणें सांगत. परंतु खेदाची गोष्ट ही कीं, समाजांत शेंकडों जोडपीं या कामीं बेफिकीर राहतात व समाजाची विपत्ति वाढवितात. आईबापें व शिक्षक यांचे जसे आपण ऋणी आहों तसेच गतकालांत जे सुप्रसिद्ध व उदाहरणीय सत्पुरुष होऊन गेले त्यांचेहि आपण ऋणी आहोंच. कारण, अशांचीं बोधवचनें व चरित्रें यांचा परिणाम आपले वर्तनावर किती तरी होत असतो. **मनु, याज्ञवल्क्य, ख्रिस्त, बुद्ध, महंमद, झोरास्तर, श्रीकृष्ण, व्यास, वाल्मीक, रामचंद्र, हरिश्चंद्र, एकनाथ, तुकाराम, ज्ञानेश्वर** इत्यादि पुरुषांचीं वचनें व चरित्रें आपणांस अंशतः तरी बोधक झालीं आहेत. व अर्थात् आपण त्यांचे ऋणी आहों. आमचे शास्त्रांत तर प्रत्येक जन्मलेला पुरुष देव, ऋषि व पितर यांचा ऋणी असतो, असें म्हटलें आहे; इतकेंच नव्हे, तर या तिघांचेंहि त्यानें अनृणी झालेंच पाहिजे अशी प्रत्येकावर सक्ती आहे. व ही न्याय्य नाहीं, असें कोण म्हणेल?

मनुष्य हा खरोखरच देवत्व व पशुत्व यांचें मजेदार मिसळण आहे. नुसतें शरीरावरून पाहिलें तर पशु आहे ( पश्यत्यसौ पशुः—केवळ चर्मचक्षूंचा व्यापार करितो म्हणून त्यास पशु

म्हणावें ), व सच्चिदानंदलक्षण जो दिव्य आत्मा त्याचा त्यांत वास आहे, म्हणून तो देवहि आहे. परंतु, लेखक म्हणतो, शेंकडों हजारों लोक आपलें देवत्व विसरतात; इतकेंच नव्हे तर, पशुत्वांत देखील पशूंच्या वर तान करितात. पशूचे ठायीं अज्ञानच असतें. परंतु, मनुष्य ज्ञानी असतांहि पाजी असतो व यामुळें नीच जंतूपेक्षांहि अधिक अनर्थावह होतो. एका कवीनें म्हटलें आहे: सर्पापेक्षांहि खल भयंकर. सर्प ज्याला स्पर्श करितो त्यालाच मारितो; परंतु खल हा एकाचे कानाशीं लागतो आणि तिसऱ्याचेंच प्राण-हरण करितो! कांहीं सुबुद्ध व सदाचरणी स्त्रियांचे वांट्यास कुठे कुठे असे पुरुष आलेले आढळतात कीं, त्या बिचाऱ्यांनीं आपल्या ह्या मालकासंबंधी बोलतांना "वागवितो[1] नरें[2] पशुसमें[3] आह्मां[4]" या ओळीचा अन्वय, ३, २, ४, १ अशा अनुक्रमानें लावल्यास अन्याय होणार नाहीं.

मनुष्यांत असलेलें देवत्व नांवारूपास आणणें तर मनुष्यानें अंतस्थ आत्म्याची ओळख करून घेऊन आपलें वर्तन शुद्ध ठेविलें पाहिजे. आत्मशोधन करण्याला देखील शरीरबल लागतें.

( श्लोकार्ध )

धर्मार्थकाममोक्षाणां । मूलमुक्तं कलेवरं ॥ **भावप्रकाश**

भावार्थः—(सुदृढ) शरीर हें धर्म-अर्थ-काम व मोक्ष या चारहि पुरुषार्थांचें मूळ म्हटलें आहे.

अर्थात् आत्मसाधनाला शरीरदार्ढ्य अत्यावश्य आहे. परंतु केवळ वज्रदेही झालें म्हणजे पुरुषार्थ झाला असें मात्र नव्हे. कारण, हर्क्युलीस मोठा भीम होता; पण त्याच्या बलाचें काय चीज झालें? त्याला वैभव किंवा स्वातंत्र्य कांहींच नव्हतें. एका दुष्ट जुलमी राजाची गुलामगिरी करण्यांत त्याचें आयुष्य गेलें. माथेफिरूपणाचे तडाक्यांत त्यानें स्वतःचींच पोरें ठार मारिलीं व अखेर एका मत्सरी स्त्रियेपायीं हालहाल होऊन तो मेला! सॅमसन हा दुसरा एक नवनागसहस्रबली होऊन गेला. त्याचें तरी कपाळ अशाच प्रकारचें. तेव्हां, नुसतें रेड्याचें बळ असल्यानें सार्थक झालें असें नाहीं. शरीर या शब्दाचा अर्थ "शीर्यते तत्" म्हणजे "नासतें तें"; अर्थात् तें नासकें असेंच आहे. परंतु आंत बांधलेल्या हिरकणीसाठीं जसें वरील चिंधीस जपावयाचें, त्याप्रमाणें तदंतर्गत जें आत्मरूप रत्न आहे त्यासाठीं शरीराला जपावयाचें. खोबऱ्यासाठीं करवंटीची पर्वा, खोबरें नसेल तर नरोटी ती काय? जाळावयाचे कामीं! सारांश, शरीर हें साधन आहे, आत्मा हें साध्य आहे. त्याचें ज्ञान न संपादिल्यास, आचार्य म्हणतात,

आत्मज्ञानविहीना मूढाः। ते पच्यंते नरकनिगूढाः ॥

—शंकराचार्यकृत मोहमुद्गर

भावार्थः—जे मूढजन आत्मज्ञानानें हीन राहतात, ते अखेर नरककुंडांत बुडून पचत पडतात.

असो. वर मनुष्य या शब्दानें ज्या गोष्टी सांगितल्या त्या स्त्री व पुरुष यांना सारख्याच लागू समजाव्या. कायद्याचे भाषेंत ‘ मनुष्य ’ या शब्दांत ‘ स्त्री ’ व ‘ पुरुष ’ या दोहों-चाहि अंतर्भाव होतो. तथापि लेखक म्हणतो, स्त्रीविषयीं स्वतंत्र असे चार शब्द सांगितले पाहिजेत. स्त्री आणि पुरुष यांत मुख्य भेद असा दिसतो कीं, पुरुषांत मनाची दृढता अधिक व स्त्रियांत सद्भावनेची दृढता अधिक; आणि सद्भावना ही सुखास अवश्य आहे. आदम हा प्रत्यक्ष नंदनवनांत होता, तरीहि, त्याची अ-र्धांगी ईव्ह हिच्या संगतीवांचून त्याला सुख लागेना. उघडच आहे:—

( श्लोक–चरण )

विना सीतादेव्या किमिव नहि दुःखं रघुपतेः ।

—भवभूति

भावार्थः—सीतादेवीवांचून रघुपतीला सर्व दुःख-मय आहे.

एका कवीनें म्हटलें आहे कीं—

( श्लोक )

वृक्षमूलेऽपि दयिता । यत्र तिष्ठति तद्गृहं ॥
गृहं तु गृहिणीहीनं । कांतारादतिरिच्यते ॥ १

भावार्थः—तुम्हीं झाडाखालीं उभे असा; स्त्री जर सन्निध आहे, तर तेथेंच घर आहे. आणि तुम्हीं बांधल्या घरांत असून स्त्री जर जवळ नाहीं तर तें अरण्याहून वाईट.

दुसरा कवि म्हणतो, " असारे खलु संसारे । सारं सारंगलोचना ॥ " म्हणजे या नि:सार संसारांत हरिणाक्षी हीच काय तें सार आहे. तिसरा म्हणतो:—" भोगाः के रमणीं विना ? " म्हणजे रमणी नाहीं, तर भोगांना रुचि कसली ? पण लबक म्हणतो, हीच रमणी जर वाह्यात गुलचैनी मिळाली तर नवऱ्याचें टप्पल शेकल्यावांचून रहाणार नाहीं. शिवाय एक वेळ दुष्ट पुरुष पुरवेल, पण दुष्ट स्त्री पुरवणार नाहीं. एक कवि म्हणतो—" नारी प्रत्यक्ष राक्षसी " दुसरा म्हणतो—" रामा पामेव राजते " ही रामा नव्हे ओली खरूज आहे. तिसरा दुहेरी निकाल देतो—" नामृतं न विषं किंचिदेकां मुक्त्वा नितंबिनीं " म्हणजे स्त्रीला सोडून दुसरें अमृतहि नाहीं व विषहि नाहीं. म्हणणें खरें आहे.

पुरुषाला जसें शरीरबल, तसें स्त्रियांना सौंदर्य. * परंतु, सौंदर्य हें सर्वथाच सुखहेतु असतें असें नव्हे. पुष्कळदा तेंच भयहेतु होतें.

---

* " सौंदर्य ही दिव्य अमोघ शक्ति । "

—सती ठाकुराणी

" रूपाढ्यं योषितः ". द्रौपदी, सीता, कृष्ण-कुमारी, नूरजहान इत्यादिक मोहिनींच्या दिव्य रूपलक्ष्मीपायीं जगांत केवढे दुर्धर अनर्थ उद्भवले हें मशहूरच आहे. एक कवि म्हणतोः—

( श्लोकार्ध )

पक्वान्नासम सुंदरी जगभरी आस्वाद्य सर्वां गमे ।
ऐसा कोण शुक्रावतार रमणी पाहूनि जो ना रमे ॥

हा रूपमेवा नको असा कोणाला? कोठें जा, त्यावर बोके टपलेलेच आहेत. यामुळें स्त्रियांना रूप हें भूषणहि आहे व मरणहि आहे. शिवाय, तारुण्याची झुळुक ही केवळ क्षणिक आहे.

( श्लोक )

अभ्रछाया, खलप्रीतिर्नवसस्यानि योषितः ॥
किंचित्कालोऽपभोग्यानि ।; यौवनानि धनानिच ॥ १

—सुभाषित

भावार्थः--ढगांची सांवली, खलाचें प्रेम, नवें धान्य, स्त्रिया, यौवन, व धन, हीं अल्पकालच उपभोगण्यास सांपडतात.

कोणी स्त्री कशीहि सुंदर असो, सौंदर्याची झांक तेरड्याचे रंगाप्रमाणें तीन दिवसांपलीकडे टिकत नाहीं. म्हण आहेः—" नदी, नारी, व्यापारी । गजना करिती दिवस चारी ॥ ". ज्या काव्यामुळें होमर कवीचें नांव अजरामर झालें त्या काव्याला आदिहेतुभूत जी दिव्य सुंदरी

हेलेना ती एकदां उत्तरवयांत आपलें मुख सहज आरशांत पहात असतां, मुखाभोंवतीं वार्धक्याच्या झुरळ्या पडलेल्या पाहून दुःखानें रडली; व स्वतःशींच म्हणाली, " मला मेल्यांनीं दोन वेळां कशाकरितां हिरावून नेलं ! तसें नेलें नसतें तर माझ्या अप्रतिम रूपाची घडी बिघडली नसती ". लबक म्हणतो, हें तिचें म्हणणें सर्वथा खरें नव्हे. कांहीं केलें तरी रूप हें टिकणारें नव्हेच. परंतु एक गोष्ट खरी कीं, ही हेलेन दोन वेळां दुर्जनांचे तावडींत न सांपडती व तिला वागविणारे बदफैली न मिळते तर तिचे ज्वानींतील सौंदर्याची चमक पोक्तपणाच्या प्रशांत व उदार अशा तेजांत परिणत झाली असती. आणि पाजी लोकांनीं जर तिला फसवून तिच्या रूपाचा पूर्ववयांत खराबा केला नसता, तर तेच लोक असल्या त्रिभुवनैक सुंदरीच्या चरणाचे सेवक तिच्या पोक्त वयांत आनंदानें झाले असते. ज्ञात्यांचें असें म्हणणें आहे कीं, विशींत प्रत्येक स्त्री सुंदर ( रूपानें ) बनूं शकेलच असें नाहीं; पण ती जर सद्वर्तनी असेल तर पन्नाशींत तिच्या सौंदर्याचें ( वर्तनाचें ) तेज फांकल्याशिवाय राहणार नाहीं. म्हटलें आहे—" नारीरूपं पतिव्रतं " म्हणजे साध्वीत्व हें स्त्रीचें खरें सौंदर्य आहे. अर्थात् हें सौंदर्य संपादणें प्रत्येकीचे

हातचें आहे. रूपसौंदर्य हें तसें स्वाधीन नाहीं, व शाश्वत तर नाहींच नाहीं. कितीहि उमदा गुलाब झाला तरी तो कोमेजणारच. तीच दशा सौंदर्याची समजावी.

तथापि, स्त्रियांचें सौंदर्य रसपूर्ण व सहृदय अशा कविगणांचीच वाणी पल्लवित करून राहिलें नाहीं; तर शांत व गंभीर अशा गद्य-लेखकांना देखील त्यानें वाचाळ केलें आहे. प्लूतार्क म्हणतो, " स्पार्टांतील स्त्रियांची महत्त्वाकांक्षा आपण वीरपत्नी व वीरमाता व्हावें अशी असे. व या त्यांच्या गुणामुळें लेखकांनीं त्यांचीं स्तोत्रें लिहिलीं ". एकंदरींत स्त्रियांचें स्तोत्र गाण्यांत कवींनीं तर पराकाष्ठाच केली आहे. हॅर्बर्ट स्पेन्सर म्हणतो कीं, या कविमंडळीनें या स्त्रीजनाला हरभऱ्याच्या झाडावर चढवून त्यांचा नाश मात्र केला आहे. आमचे विरक्त भर्तृहरी म्हणतातः—

( श्लोकचरण )

अहो, निंद्यं रूपं कविजनविशेषैर्गुरुकृतम् ।

भावार्थः--या निंद्य स्त्रीरूपाला या प्रतिष्ठित कविमंडळीनें महत्त्वास चढविलें, दुसरें काय ?

लबक म्हणतो, स्पेन्सरचें म्हणणें मलाहि खरें दिसतें. कारण, या जातीचें स्तोत्र करण्यांत कवींची जशी कांहीं चढाओढ दिसते. एक कवि म्हणतोः—

(श्लोक)

किमिंदुः किं पद्मं किमुमुकुरबिंबं किमुमुखं ।
किमब्जे किं मीनौ किमुमदनबाणौ किमुदृशौ ।
खगौ वा गुच्छौ वा कनककलशौ वा किमुकुचौ ।
तडिद्वा तारा वा कनकलतिका वा किमबला ॥ १

—सुभाषित

भावार्थः--हा चंद्र आहे, कीं कमल आहे, कीं आरसा आहे, कीं मुख आहे!–हीं कमलें आहेत, कीं मासे आहेत, का मदनाचे बाण आहेत; कीं डोळे आहेत! तसेंच हे कोण ? हे चक्रवाक, कीं फुलांचे गेंद, कीं सुवर्णाचे कलश ?—तशीच ही कोण ? ही वीज आहे, कीं चांदणी आहे, कीं सोन्याची वल्ली किंवा स्त्री आहे ?

इंग्रजी कवि चॉसर म्हणतोः—

(श्लोक)

निखिलगुणनिधान-स्त्रीजनादर्शभूता ।
विपुल रुचिरकीर्ती शोभते सुंदरी ही ॥ १

इलिझॉबेथ राणीचे थडग्यावर बेन जान्सननें लिहिलेंः—

(चाल–क्षमातळीं०)

" शिलातळीं या निद्रित राहे लोकत्रयसुंदरी ।
उदारा, गुणिजनपिकमंजरी " ॥ १

'रंगेल' भर्तृहरि म्हणतोः—

(श्लोक)

द्रष्टव्येषु किमुत्तमं ? मृगदृशः प्रेमप्रसन्नं मुखं ।
घ्रातव्येषुच किं ? तदास्यपवनः; श्राव्येषु किं ? तद्वचः ॥

किं स्वाद्येषु ? तदोष्ठपल्लवरसः ; स्पृश्येषु किं ? तद्वपुः ।
ध्येयं किं ? नवयौवनं सहृदयैः , सर्वत्र तद्विभ्रमः ॥ १

**भावार्थः**--जगांतलि सर्व दर्शनीय वस्तूंत श्रेष्ठतम वस्तु कोणती ? उ०—हरिणाक्षीचें प्रेमानें फुललेलें मुखकमल. सुवासिकांत अग्र्य काय ?—तिचे मुखकमलांतील उच्छ्वासगंध. श्राव्यांत मनोहर काय ?–तिची वाणी. व सर्व आस्वाद्यांत अत्यंत रुचिकर काय ?–तिचें अधरामृत. स्पृश्य वस्तूंत सुखावह काय ?–तिचा गात्रस्पर्श *. सहृदयजनांना उत्तम ध्येय कोणतें ? तिचे नवतीचा बहार. आणि, जिकडे तिकडे आपल्याभोंवतीं असावेंचसें काय? तिच्या विलासाची झुळुक.

ख्रिस्तधर्म्यांची आदिमाता ईव्ह हिजबद्दल **मिल्टन** म्हणतोः—

( साकी )

चरणन्यासीं विभ्रम भरला । दिव्य तेज तें नयनीं ।
अभिनय जीचा प्रतिपदिं दावी । प्रेम सभ्यता, दोन्ही ॥१

सर हेन्री टेलर आपल्या एका नायिकेचे वर्तनकौशल्याबद्दल म्हणतो व तसेंच **कालिदास**हि मालविकाग्निमित्रांत म्हणतो :—

( श्लोकचरण )

पादन्यासो लयमुपगतस्तन्मयत्वं रसेषु ।

**भावार्थः**—मालविकेचें पाऊल टाकणें केवळ ठेक्याला

---

* प्रभु **राम**चंद्र देखील म्हणतातः–" तव स्पर्शे स्पर्शे ममहि परिमूढेंद्रिय गणो ।" (अर्थात् एवढी जबर मोहिनी सीतेचे स्पर्शांत होती. )

जुळून आहे. आणि श्रृंगारादि रसांशीं तर ती एकजीवच होऊन गेली आहे.

वॉलर कवि एका स्त्रीच्या मेखलेचें वर्णन करितांना म्हणतोः—

( साक्या )

कटिगत कांचीवलय प्रियेचें, अल्पवर्तुलाकार ।
निखिल सुखाचें, सौंदर्याचें भासे मज आगार ॥ १
नाहीं मागत दुसरें कांहीं, द्या मज इतुका प्रांत ।
हीन भासतें मजासि यापुढें, जें जें या लोकांत ॥ २

ब्लेक हाहि एका सुंदरीचें असेंच महिम्न गातोः—

( श्लोक )

दिव्यस्वनें लाजवि किन्नरीतें ।
पदार्पणें पूत करी धरेतें ।
क्षेत्रीं· वनीं, वा विजनीं असो ते ।
तत्संगमीं नंदन तुच्छ मातें ॥ १

लेखक म्हणतो, या सर्व वर्णनांपेक्षां महाभारतांतील साध्वी द्रौपदीचें सौंदर्य, वर्तन व सत्त्वशीलता हीं तर निरुपमच होत. वस्त्रहरणसमयीं तिच्या तेजाची पूर्ण कसोटी प्रत्ययास आली. प्रत्यक्ष धर्मराजानीं तिचें केलेलें वर्णनहि स्मरणीयच आहे.

( आर्या )

शरदुत्पलपत्राक्षी शरदुत्पलपुण्यगंधसमगंधा ॥
अस्खलित चालवी मज गृहधर्मीं यष्टि पथिं जशी अंधा ॥ १
आधीं जिणें उठावें, पाहुनि निजलों असें मग निजावें ॥
रागेजणें सुदुर्मिळ तेंहि जिचें ज्वालसें गगनिं जावें ॥ २

धौम्यापासुनि गोपांपर्यंत जिणें स्वयें समाचार ॥
घ्यावा, श्रित-तापहर श्री-गंगेचा जिचा समाचार ॥ ३

--मोरोपंत

शहाण्या सालोमननें दिलेलें कुलस्त्रीचें वर्णन याच तोडीचें आहे म्हणून पुनरुक्ति करीत नाहीं. बृहत्संहितेंत वराहमिहिर म्हणतोः—

( श्लोक )

श्रुतं, दृष्टं, स्पृष्टं, स्मृतमपि नृणांल्हादजननं ।
न रत्नं स्त्रीभ्योऽन्यत्क्वचिदपि कृतं लोकपतिना ॥
तदर्थं धर्मार्थौ विभववरसौख्यानिच ततो ।
गृहे लक्ष्म्यो मान्याः सततमबला मानविभवैः १ ॥

भावार्थः—स्त्रीसारखें दुसरें रत्न विधात्यानें केलेंच नाहीं. कारण, या स्त्रीरत्नाचें नामश्रवण, दर्शन, स्पर्शन किंवा नुसतें स्मरण देखील पुरुषांना आनंद देतें. धर्म, अर्थ, वैभवांतील सौख्यें हीं सर्व स्त्रीपायीं आहेत. याकरितां या अबलारूपी गृहलक्ष्म्यांचा प्रत्येक घरीं मानवैभवदानानें सत्कारच करावा.

लेखक म्हणतो, पुरुषजातीवर ज्यांचें इतकें वर्चस्व चालतें, त्यांना "अबला" म्हणण्यांत अर्थ काय ? भर्तृहरि म्हणतोः—

( श्लोकार्ध )

याभिर्विलोलतरतारकदृष्टिपातैः ।
शक्रादयोऽपि विनिता अबलाः कथं ताः ॥ १

भावार्थः—ज्यांनीं नुसत्या चंचल नेत्रकटाक्षांना इंद्रादिक जिंकले, त्या अबला कशाच्या !

असो. लेखक म्हणतो, जरी स्त्रीपुरुष बऱ्याच गोष्टींत भिन्न असलीं तरी मनुष्यत्व ह्या धर्मांत उभयतांचेंहि साधारण्य आहे. स्त्रियांना जरी कोणी "फुसकें भेंड" म्हणतात, तरी त्यांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं, ह्या भेंडांत चित्कलेची वसति आहे. अर्थात्, स्त्रिया शरीरानें नाजुक झाल्या तरी मनुष्यप्राणी या दृष्टीनें विवेकादि सामर्थ्य त्यांनाहि आहेच, व यामुळेंच पुरुषां-प्रमाणेंच आत्मोन्नति स्त्रियांचेहि हातची आहे. तसें म्हटलें तर जात्या प्रत्येक मनुष्य (स्त्रीपुरुष) उन्नतच आहे. मूर्खलोक स्वकृतीनें अवनतीस जातात इतकेंच. मनुष्यांत जर ईश्वरी अंश आहे, तर मनुष्य हा क्षुद्र प्राणी कसा होईल? परंतु, ह्या गोष्टीचें त्याला स्मरण पाहिजे. तें नसलें म्हणजे कोल्हीचे पोरांत वाढलेल्या सिंहाच्या बच्चाप्रमाणें त्याला आपल्या सत्यस्वरूपाबद्दल भ्रांति पडून तो हीनदीन होतो. मनुष्य जर आपली किंमत ओळखून चालेल तर त्याला मोलच नाहीं. तो दरिद्री असेना; तो जर आत्मगत मनुष्यत्वाचें तेज स्वकृतीनें पूर्णपणें उदयास आणील, तर एकाद्या राजाचीहि किंमत त्याहून कमी आहे. राजाजवळ बाह्यवैभव असतें; परंतु आंतर किंवा आत्मवैभवाचा अभावच. दुसऱ्यांना जिंकण्यापेक्षां आत्मजय करणें यांत पुरुषार्थ अधिक आहे.

कारण, आत्मजय करणारांनीं दुर्विकार, दुर्ग्रह व मोह इत्यादिकांपासून अलिप्त राहून अढळ नीतीनें चालावें लागतें.

मनुष्याचें खरें मनुष्यत्व कशांत आहे? उच्च पदवी, भव्य मंदिर, विपुल द्रव्य किंवा दिव्यवस्त्रें यांपैकीं कशांतहि तें नाहीं. तें सर्व उत्तम शीलांत आहे. म्हटलेंच आहे, " शीलं परं भूषणं। ". आपले मनांत मात्र पाहिजे म्हणजे आपणा प्रत्येकास आपला वर्तनक्रम इतका चोख ठेवितां येईल कीं, शेक्स्पिअरनें जसें कॅसिओबद्दल म्हटलें आहे त्याप्रमाणें " प्रतिदिवशीं त्यांत नवीन नवीन मौज दिसत राहील ".

मनुष्यजीवीत हें एक मोठेंच गूढ आहे, यांत संशय नाहीं. एक बयान आहे:-" आनेका वाट कोन, जानेका घाट कोन, ब्रह्मका कपाट कोन, कहांसे जीव आया है? ". एक फ्रेंच लेखक म्हणतो:-" मी जन्मास आलों खरा; पण कां व कसा तें मला कळत नाहीं. मी जगलों खरा; पण त्यांतील वर्महि मला माहीत नाहीं. आणि आतां मी मुमूर्षु झालों आहें, यांतीलहि हेतु मला उमगत नाहीं ". पॅस्कल नामक ग्रंथकार म्हणतो, " यावत्सृष्टवस्तूंत मनुष्य हें मोठेंच गूढ आहे. मनुष्याला आपलें शरीर हें काय आहे, ह्याचेंच पूर्ण ज्ञान नाहीं. तद्वत् चैतन्याचें तर त्याहून-

हि कर्मीच. आणि जड शरीर व चेतन आत्मा यांचा हा बेमालूम मिलाफ कसा बनविला आहे याबद्दल तर पूर्णच काळोख आहे". बरें, ह्या गोष्टी दूरच्या म्हणाव्या तर त्याच्याच ठिकाणीं त्या आहेत, असें असून त्याला त्यांचा बोध नाहीं. याहून मोठें कोडें तें कोणतें? उपनिषदांत म्हटलें आहे.:—

पराञ्चिखानि व्यतृणत्स्वयंभूस्तमात्स्वयं पश्यति नांतरात्मा ।

भावार्थः—ब्रह्मदेवानें हीं इंद्रियें बाहेर तोंड करून कांतलीं यामुळें ह्यांनीं आंतरज्ञान होत नाहीं. डोळ्यांनीं बाहेरील सर्व जगत् दिसतें; परंतु आंतील कांहींच दिसत नाहीं.

कार्लाइल म्हणतो, " प्रत्येक मनुष्य हें एक चालतें बोलतें आश्चर्य आहे. भोंवतीं पहावें तों अनाद्यनंतीकाल व अपरिमित अंतराल; अशांत मध्येंच चेंडूसारखा हा कुठून उसळून आला असावा, याबद्दल तर्क कांहींच काम करीत नाहीं. आतां, हें कोडें जरी उलगडलें नाहीं तरी, मनुष्य हा दिव्य व पार्थिव या दोन्ही अंशांचा घडला आहे, त्या अर्थीं त्यानें पृथ्वीकडे पाहून म्हणजे नम्रतेनें चालावें व दिव्यांशाकडे पाहून आचरण पवित्र व उदात्त ठेवावें; व आंत जी सद्बुद्धिरूप ईश्वरी ज्योत आहे तिच्या उजेडानें चालावें, इतकें मात्र निर्विवाद आहे ".

मनुष्य हा एका दृष्टीनें दीन, दुर्बल व ज्ञानहीनहि आहे. बरें, दुसऱ्या दृष्टीनें त्यानें अचाट करणी केली आहे. त्यानें या भूगोलाचें वजन काढिलें आहे! हिमालयासारख्या गगनचुंबि महीधरांची उंची मापिली आहे! अगाध महार्णवाचाहि ठाव घेतला आहे! अनंत अंतरिक्षांतील चंद्र, सूर्य व इतर ग्रहोपग्रह यांचीं अंतरें मोजिलीं आहेत; खस्थ ज्योतींचींहि क्षेत्रफळें व वजनें ठरविलीं आहेत; त्यांच्या गतींचे काल, वेग व दिशा निर्णीत केल्या आहेत. आणि याहीपेक्षां नवलाची गोष्ट—ह्यांचीं घटकद्रव्यें कोणतीं तींहि निवडलीं आहेत! व याहून अधिकाधिक गोष्टी पुढें पुढें करण्याची त्याची उमेद आहे. तेव्हां इतक्या पराक्रमी प्राण्याला क्षुद्र तरी कसें म्हणावें? आणि खरोखरच तो क्षुद्र नव्हे. त्याच्यांत ईशकला वसत आहे. मात्र त्यानें अहंकारानें ताठून न जातां नम्रपणें परमात्मास शरण राहून यत्नपूर्वक आत्मशोधन करीत रहावें म्हणजे आजमित्तीस प्रतिपच्चंद्ररेखेप्रमाणें अंधुक दिसणारी ही त्यामधील ईशकला दिवसानुदिवस वृद्धिंगत होऊन पूर्णिमेच्या प्रभेला येईल, यांत संदेह नाहीं.

( श्लोक )

आशापाशशतैर्बद्धाः । कामक्रोधपरायणाः ॥
ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १
इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे । भविष्यति पुनर्धनम् ॥ २
असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी । सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ ३
आढ्योऽभिजनवानस्मि । कोऽन्योऽस्ति सदृशो मया ॥
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य । इत्यज्ञानविमोहिताः ॥ ४

**—श्रीमद्भगवद्गीता**

**भावार्थः**—जे शतशः आशापाशांनीं बद्ध झालेले, कामक्रोध हेंच ज्यांचें सर्वस्व, ते कामभोगासाठीं अन्यायानें द्रव्यसंचयाची इच्छा धरितात. व आज मीं हें मिळविलें, आतां हा मनोरथ मी साध्य करीन, मजपाशीं हें इतकें धन आहे, आतां आणखी हें मला मिळेल, हल्लीं मीं हा शत्रु मारिला व आणखी दुसरे मारीन, मी मोठा समर्थ, भोगणारा काय तो मीच, मी सिद्ध, बलवान् व सुखी आहें, सर्व कांहीं मीच, सारांश, ह्या जगांत मीच काय तो मुख्य आहें, मी धनवान् आहें, मी संभावित कुळांत जन्मलों आहें, माझ्यासारखा दुसरा कोण आहे ? मी यज्ञ करीन, दानें देईन, व आनंद करीन, ह्याप्रमाणें ते अज्ञानामुळें मोह पावून बडबडतात.

# प्रकरण ४

## आरुरुक्षा ( उदयेच्छा )

( श्लोकार्ध )

स जातो येन जातेन । याति [ लोकः ] समुन्नतिं ॥

—**हितोपदेश**

भावार्थः—ज्याचे जन्मास येण्यानें लोकांचा अभ्युदय होतो तोच खरा जन्मला.

मरहूम सर **जेम्स स्टीफन** एकदां तरुण मंडळीला उपदेश करीत असतां म्हणाला, " माझ्या उपदेशाचें सार एका वाक्यांत सांगणें म्हणजे तुम्ही ' आरुरुक्षुं किंवा उदयेच्छु व्हा ' एवढेंच आहे ".

हा उपदेश खचितच अमोल खरा. पण उदय म्हणजे कशाला म्हणावें ? जें दृष्टीस पडेल तें आपल्या घशांत उतरून आपणच फुगून बसणें किंवा आपल्या भोंवतालच्या इतरा सर्वांस खालीं पाडून आपण वरचढ होण्याची उमेद धरणें हिला उदयेच्छा म्हणूं नये. असली इच्छा मोठी गर्हणीय होय. ईशावास्योपनिषदांत म्हटलें आहे, " मा गृधः कस्यचिद्धनं "—म्हणजे अपहारबुद्धि धरूं नको. लेखक म्हणतो, खरी उदयेच्छा म्हणजे इतरांसह आत्मोत्कर्ष चिंतणें हीच होय.

( श्लोकार्ध )

यस्मिन्जीवति जीवन्ति । बहवः सोऽत्र जीवति ॥

—हितोपदेश

भावार्थः—ज्याचे जीवावर अनेक पोट भरतात तोच जगला म्हणावा.

जो दुसऱ्यांना तुच्छ मानितो, तो स्वतःच तसा आहे असें खास समजावें. आकांक्षा मोठी असावी. सिंहाचे शिकारीची तयारी ठेवावी म्हणजे निदान कोल्हें तरी हातीं लागतें. उडी टाकील तो प्रसंगीं बुडेल, चढेल तो पडेलहि; तथापि, बनेल तों, जपून यत्न करावा, म्हणजे यश येईलच. परंतु, कांहीं अळसेंड लोक समजतात कीं, यत्न कशाला पाहिजे ? " असेल आमचा हरि, तर देइल खाटल्यावरी ". पण हें बोलणें नादानपणाचें आहे. ज्ञात्यांचें सांगणें आहे:—" बळेंच करणी करावी; आणि ओढून लक्ष्मी आणावी". हें म्हणणें योग्य.

साधु **आगस्टिन** म्हणे:—" लोभ आणि आकांक्षा हीं नुसतीं पापमूल नव्हत तर स्वयं पापरूपच आहेत ". हें म्हणणें खरें आहे. परंतु या दोन शब्दांचा अर्थ थोडासा मर्यादित धरला पाहिजे. एरव्हीं, सदुत्कर्षाची इच्छा देखील त्याज्य म्हणावी लागेल. व कुटुंबभरणार्थ न्यायानें द्रव्यसंग्रह करणें हेंहि निषिद्ध मानावें

लागेल; पण तसें करणें संसारी मनुष्यांस शक्य नाहीं. आकांक्षा तर पाहिजेच, पण ती कशी असावी? स्वतःची व इतरांचीहि उन्नति करण्याची इच्छा धरणें ही योग्य आकांक्षा आहे. तुकाराम म्हणतोः—

( अभंग )

आपण तरला नव्हे हें नवल।
लोकांतें तारील तोचि ज्ञानी ॥

ज्ञानाचा जो मार्ग तोच शरीरबलाचाः–

( श्लोकार्ध )

स्वसंरक्षण त्राण वा दुर्बलाचें।
तिजें याहुनि चीज नाहीं बलाचें ॥

—सती ठाकुराणी

अथेनियन शिपाई प्राचीन काळीं युद्धास जातांना अशी शपथ घेई कीं, "माझ्या या पवित्र ढालीला मी डाग लावणार नाहीं. रणांगणीं माझ्या योद्ध्या बंधूला एकटा सोडून मी पळणार नाहीं. माझ्या देशांतील संपन्न किंवा असंपन्न अशीं देवस्थानें व कुटुंबें यांचें परक्यांपासून रक्षण व्हावें म्हणून मी लढेन व मी आपल्या जन्मदेशाला मजमुळें कमीपणा येऊं न देतां यथाशक्ति चढत्या कळेस आणण्यासाठीं झटेन". ही शपथ साम्राज्यांतील प्रत्येकजणानें ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

आपले समकालीन व राष्ट्रबंधु यांची मान्य-

ता संपादणें ही आकांक्षा स्पृहणीय आहे. बाकी अनिवार लौकिकतृष्णा कांहीं बरी नव्हे; ती मोहक तितकीच घातुकहि आहे. सिसिरो म्हणतो, " दुरंत तृष्णा चांगली नव्हे; कारण, ती आपलें स्पृहणीय स्वातंत्र्य हिरावते ".

( आर्याचरण )

आशाया ये दासास्ते दासाः सर्वलोकस्य ॥

—सुभाषित

( श्लोकचरण )

जया आस तो दास सर्वा जगाचा ।

—शीलनाथ-अष्टोत्तरी

( श्लोकार्ध )

अतितृष्णा न कर्तव्या । चक्रं भवति मस्तके ॥

--पंचतंत्र

सत्ता ही देखील अतितृष्णेप्रमाणेंच पुष्कळदा अनर्थावह होते. कारण, ती उन्माद आणिते व अखेर अधःपातास नेते. त्याचप्रमाणें अनेक मनोविकार, उच्छृंखलवृत्ति, भीरुता, आलस्य, विषयलंपटपणा व क्रोध ह्या गोष्टींचाहि उदयेच्छूंनीं त्याग केला पाहिजे.

( आर्या )

आलस्यं स्त्रीसेवा सरोगता, जन्मभूमिवात्सल्यं ॥
संतोषो, भीरुत्वं षड्व्याघाता महत्वस्य ॥ १

—हितोपदेश

भावार्थः—आळस, बायकोची गुलामगिरी, रोगीपण, जन्मभूमीला धरून बसणें, वितृष्णता, व भित्रेपणा हे सहा उदयाला आडफांटे आहेत.

पुष्कळ माणसें श्रीमंत व समर्थ लोकांचा हेवा करितात. तीं म्हणतात, "श्रीमतस्तु किमापदः". म्हणजे श्रीमंताला काय कमी? वाटेल ती वस्तु प्राप्त आहे. लहर लागेल तें करण्याचें सामर्थ्य आहे, मग तेथें सुखाला काय विचारावें? पण ही चूक आहे. संपत्ति असली म्हणजे सुख असतेंच असें नाहीं. शिकारीला गेलें असतां प्रत्यक्ष सावज हातीं सांपडण्यापेक्षां तें मिळविण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या धावाधावींतच गोडी अधिक असते. पर्वतीवर जाणारास, टेंकडीचे माथ्यावर पोंचून स्वस्थ बसण्यापेक्षां, चढाओढीनें पायऱ्या चढत जाण्यांत मौज अधिक वाटते, हा आपला अनुभव आहे. जगांत जर सर्व गोष्टी अयत्नसिद्ध प्राप्त असत्या तर आयुष्यांतील अर्धी अधिक गंमत नाहींशी झाली असती. गोल्डस्मिथ म्हणतो, "आशापूर्तीपूर्वीं मनचे मांडे असतात ते यथेच्छ खातां येतात, पूर्ती झाली म्हणजे ते बंद पडतात व जें बरें-वाईट ताट पदरीं पडेल त्यावरच तृप्त रहावें लागतें". गर्भसंभव झाल्यापासून स्त्रिया ह्या भावी स्नुषादर्शनाचे सुखांत मिटक्या मारीत असतात, व प्रसूत्यादि उदंड कष्ट त्या आशेचे जोरावर निमूट आनंदानें सोशितात. बाकी प्रत्यक्ष सूनबाई कधीं कधीं लाथाच देते! सारांश, आशेचे गुंगींत

जेवढें सुख आहे तेवढें आशापूर्तींत नाहीं. व म्हणूनच सदय परमेश्वरानें आपल्या लाडक्या मनुष्याला बहुतेक वस्तु यत्नप्राप्य ठेविल्या आहेत. तुपाच्या लालचीनें जसें उष्टेंहि पवित्र वाटतें, तसे भावी फलाकांक्षेमुळें पूर्वगामी श्रमहि गोड लागतात. पण, हे श्रम ज्यांना पडत नाहींत त्यांना त्या हिश्याचें सुखहि वजाच पडतें. आणि ह्यास्तवच, गर्भ-श्रीमंतांना जरी पुष्कळ गोष्टी अयत्न अनुकूल असतात, तरी ती अनुकूलताच त्यांना घातक होते. लोक त्यांना 'आयतोजी' म्हणतात व त्यांची अदेखाई करितात. मत्सरी लोक त्यांचा घात करण्यास टपलेले असतात. अर्थापायींच त्यांस अनेक अनर्थ सोसावे लागतात. प्रतारणाकुशल असे धूर्त तोंडपुज्ये लोक त्यांना स्तुतीनें भुलवून तोंडघशीं देतात. शिवाय, याचक, मागतेकरी लोक त्यांना पुरेपुरेसें करितात. याखेरीज, अनेक शुष्क कामीं—सभा, परिषदा, मेजवान्या, नाच, तमाशे, पार्ट्या, खाजगी भेटी इत्यादि इत्यादिकांत त्यांचा अमोल वेळ फुकट जातो. आणि थोरपणाचे पायीं त्यांस अनेक चिंता आणि काळज्या टोंचीत असतात. लोकांना मात्र दुरून भासतें कीं श्रीमंत ते सुखी आहेत. पण तुकाराम म्हणतो:—

( अभंग-चरण )

ऐरावतीं रत्न थोर । त्यासि अंकुशाचा मार ॥

शेक्स्पिअर म्हणतोः—

( श्लोकचरण )

"राजास विश्रम तसा तिळमात्र नाहीं ॥"

श्रीमंताला पुष्कळ भोग्य वस्तु अनुकूल असतात. पण फल काय ? त्यांचा आस्वाद घेण्याला अवश्य जें चित्तस्वास्थ्य तें कोठें असतें? * बेकन म्हणतो, "राजे वगैरे मोठे लोकांची स्थिति आकाशांतील ग्रहांप्रमाणें आहे. ते कालनियंते असून सर्वत्र पूज्य असतात, परंतु, त्यांना विसांवा मिळून नसतो. चालू पिढीला गणिताचे परात्पर गुरु कै० केरूनाना छत्रे पेनशन घेऊन घरीं बसले असतां एकदां म्हणाले:—"लोकांना वाटतें माझी चैन आहे, काम ना धाम. पण खरी स्थिति उलट आहे. अभिप्रायार्थ मजकडे इतके ग्रंथ येतात कीं ते वाचण्याइतकें मला बळ किंवा वेळ नाहीं. बरें, अभिप्रायास उशीर झाल्यास लोक लख्ख शिव्या देतात कीं 'रिकामपणीं एवढेंहि करवेना का'? शिवाय म्युनिसिपालिटीचें नळसफाईचें काम मजवर हवाललें आहे. दि-

---

* कादंबरींत बाणभट्टानीं शुकनासमुखानें राजपुत्राला वैभवाच्या अनर्थांचें जें वर्णन दिलें आहे, तें केवळ बिनतोड आहे, तें जिज्ञासूंनीं अवश्य वाचावें.

वसा काम करीन तर ‘ कोणा मेल्यानें ओइरा धुण्याचे वेळींच पाणी बंद केलें, कोण जाणें ? ’ म्हणून घरोघरच्या माउल्या मला शिव्या-शाप देतील, सबब मी हल्लीं चांदिण्यारात्रीं कंदील लावून नळांतला गाळ काढवीत असतों ”. नानांची थोरवी नानांनाच. नानांचें चरित्र साधुसंतांइतकें आवडीनें लिहिण्याजोगें असून तें तितक्या पूर्णतेनें कोणी लिहीत नाहीं हें दुर्दैव आहे! असो.

इतिहास वाचुन पाहतां मोठे लोकांवरच प्राणघाताचे प्रसंग विशेष. कितीतरी राजे पदच्युत केले, परागंदा झाले, मारेकऱ्यांनीं मारले, जनतेच्या रोषास बळी पडले, विषादिकांनीं प्राणास मुकले, असें आढळतें. सामान्यांच्या वांट्यास हे अनर्थ नाहींत. ठीकच आहे:—

( श्लोकार्ध )

वर्धते क्षीयते चंद्रः । न तु तारागणः क्वचित् ॥

वृद्धिक्षय चंद्राला; गिऱ्हा गिळणार चंद्रसूर्याला; क्षुद्र चांदिण्यांना कोण पुसतो ? सारांश, ‘वैभव तथें सौख्य’ हें फारसें खरें नसून “ ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठीण ॥” हेंच सत्य आहे. प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकार रूसो हा राजपुत्र लडविग ह्याला म्हणाला:— “ मी जर राजपुत्र होण्याइतका दुर्दैवी असतों, इ० इ० ”.

जो जुलमी राजा दुसऱ्यास बंदींत घालतो, त्याचा स्वतःचाहि जीव पिंजऱ्यांतच असतो, हें खास. किंबहुना तो अधिकच धाक्यांत असतो. शिवाय, बेकन म्हणतो कीं, "जो फाजील हावे-मुळें उडी घालून पुढें धांवतो, त्याला एकादी आकस्मिक ठोकर का लागली, कीं तो स्वतःवरच रुष्ट होऊन तोंड फुटल्यासारखा मट्ट बसतो". म्हणून इतकी लसलस बरी नाहीं.

मन प्रशांत व निष्कलंक असून बंदिवास बरा; परंतु, मन चिंताग्रस्त असून मोठें दिव्य सिंहासन मिळालें तरी बरें नव्हे. तशांतहि हें सिंहासन ठक-बाजी किंवा प्राणघातादि पापकर्मांनीं संपादिलेलें असेल तर, तेथें सुखाचें नांवच नको. या कामीं शेक्स्पिअरकृत 'मॅकबेथ' 'हॅमलेट' हीं नाटकें वाचावीं. लबक म्हणतो, ज्ञात्यांचें म्हणणें आहे कीं दडपशाही हा कांहीं स्वास्थ्याचा सदुपाय नव्हे, तें सर्वथा खरें आहे. प्रसिद्ध कवि सादी म्हणतो, "बाहुबळाचे जोरावर इच्छेची परिसीमा गांठण्याचा विचार निव्वळ चुकीचा आहे".

(श्लोकचरण)

मनोरथानामतटः प्रपातः।

—कालिदास

किंवा—

मनोरथानामगतिर्नविद्यते।

मनोरथांची धांव केवळ अकुंठ आहे. शिवाय उच्चस्थलीं चढून जाणें कष्टप्रद आहेच; पण तेथील स्थितिहि सचिंतच आहे. कारण उंचावरून घडाडायला वेळ लागत नाहीं; व म्हणूनच मिल्टन म्हणतो कीं, " कित्येकजण या पतनभयास्तव चढण्याचेच खबदरीत पडत नाहींत '. अवघड कडद्याच्या धारेवर आपण उभे असलों म्हणजे खालीं पडण्याचा धाक क्षणक्षणीं उभा असतो. आणि असल्या उंचीवरून जर का झोंक गेला तर ठिकऱ्याच ठिकऱ्या होण्यास अंतर होत नाहीं ". समाजांत तरी इतर सर्वांच्यावर डोकीं उचलून जे डौलानें चालत असतात अशांचा कधीं कधीं असाच मासला होतो. रामजोशी म्हणतात,

( लावणी )

घोडा जाऊन खोडा येईल, बसेल एखादा धरमधका !

आणि असें झालें म्हणजे, एक कवि म्हणतोः—

( श्लोकार्ध )

दूरारोहपरिभ्रंश। विनिपातोऽहि दारुणः ॥

म्हणजे अति उंचीवर चढून जर का घसरलें तर तो विनिपात फारच भयंकर होतो. याकरितां दूरारोही आशामृगाचे मागें धांवत न सुटतां, अल्पांत तुष्ट असावें; त्यांत सुख आहे.

( श्लोक )

यज्जीव्यते क्षणमपि प्रथितं मनुष्यैः।
विज्ञान-विक्रम-यशोभिरभज्यमानं ॥

तन्नामजीवितमिदन्तिप्रवदांति तज्ज्ञाः ।
काकोऽपि जीवति चिराय बलिंच भुंक्ते ॥ १

—हितोपदेश

भावार्थः—मनुष्याचें जगणें क्षणभरच कां होईना, पण तें विज्ञान, शौर्य व यश यांनीं युक्त असावें; म्हणजे त्यालाच खरें जगणें असें ज्ञाते म्हणतात. एऱ्हीं कावळाहि उंज्या खात असतो आणि दीर्घकाळ जगतो.

हें म्हणणें केवळ टाकाऊ नव्हे. तथापि, असलें भाग्य मिळविण्याचे नादांत जर सुख, शांति, स्वातंत्र्य या सर्वांची होळी होत आहे, तर त्या भाग्याला काय करावें ? महमूद गिझनवीनें हिंदुस्थानावर सारख्या स्वाऱ्या करून अपार संपत्ति नेली व मरतांना रत्नांच्या राशींकडे पाहून उसासा टाकला. म्हणजे इतकी संपत्ति असूनहि तो असुखीच राहिला. अशानें संपत्ति मिळवून तरी चीज काय ? कित्येकांना अन्न खावयाला स्वस्थपणा नसतो. एवढी तरी द्रव्यतृष्णा काय चांगली ? द्रव्याचाच न्याय सत्तेला. दुसऱ्यावर सत्ता चालविणें म्हणजे स्वतःला बांधेल व्हावेंच लागतें; म्हणजे क्षेत्रफळ एकच झालें. समजा, आपण दुसऱ्याला बंदींत घातलें, पण तो पळून न जावा म्हणून रखवाली राखावी लागणार. म्हणजे विकत श्राद्ध घेऊन नसतें सव्यापसव्य करीत बसण्यांतलेंच आहे ! मॅडेम डी. स्टेल म्हणते, पुष्कळ वेळां " जेथें नांवलौकिक असतो तेथें

सुखाचे नावानें शंखवाद्य असेंच समजावें". बाकी तिचे हे उद्गार "परोपदेशे पाण्डित्यं" पैकींच होते. ती कीर्तीसाठीं हापापलीच होती. मॉंटरोजचा मार्किसहि आपल्या एका प्रिय हृदयवल्लभेला म्हणतो

( श्लोक )

भीरू असो कीं गुणहीन होवो ।
त्वसंगमीं जो न धजेल रावो ॥
पर्णूनि तूतें पसरीन कीर्ति ।
लेखें, कृपाणें, तव मी दिगंतीं ॥ १

मी तुझी दिगंत कीर्ति पसरीन. अर्थात् कीर्तीची लालसा बहुतांच्या हृदयांत आहे.

उटलपक्षीं शेक्सिपअरचे 'आठवा हेन्री' या नाटकांत वुल्से हा क्रॉमवेलला म्हणतोः--

( साकी )

सोड सोड ही वैभवतृष्णा । ही न लेशसुखदायी ॥
देवदूतही भ्रंश पावले । या पापाच्या पायीं ॥
आहे शपथ तुला । तृष्णा न भली; सोड हिला ॥ १

शिवाय, वैभव, मान, व सत्ता यांचेपायीं पुष्कळदां आयुष्यांतील खऱ्या सुखाला मनुष्य मुकतो. तोच वुल्से तृष्णेची निंदा करून पुढें दुःखितस्वरानें म्हणतोः—

पद ( चाल–भला जन्म हा तुला० )

राम राम आजि शेवटचा हा करितों, नृपवैभवा ॥
न सोसे मजला त्याची हवा ॥ १

मानवजीवित क्षणभंगुर हें, रंग तेरड्या जसा ।
धरावा तेथ कसा भरंवसा ॥ २
आशांकुर जे कोमल सुंदर, नयना दिसती अजी ।
होति ते पुष्पित अल्पावधि ॥ ३
पाहुनि त्यांतें दंग होउनी, डुलतों सौख्यामधीं ।
मानितो 'धन्य धन्य' मी जगीं ॥ ४
आकस्मिक तों दुर्दैवाचें वारें सोसाउनी ।
मत्सम पाडी त्या उमळुनी ॥ ५
घेउनि चुकलों पूर्णपणें मी या देहीं अनुभवा ॥
दुरोनी वंदन त्या वैभवा ॥ ६

हा त्याचा विलाप अयथार्थ नव्हे. ज्यानें परक्यावर आपलें पगडें चढविण्याची हांव धरिली, तो शांतीला मुकला. ठीकच आहे, व्याप तेथें संताप उभाच. यास्तव ज्यांना शांत व सुयंत्र असा जीवितक्रम प्रिय असेल त्यांनीं व्याप फार माजवूं नये. सिनेका म्हणतो, "धरणीवरून आकाशांत उडी मारणें सोपें काम नव्हे". लॉब्रुअरी नामक फ्रेंच ग्रंथकार म्हणतो, "या भूतलावर लोकमान्यता संपादण्याइतकें बिकट काम दुसरें कोणतेंच नाहीं. त्याची पुरी वाट गांठली नाहीं तोंच हें टीचभर आयुष्य निघून देखील जातें". याकरितां या नादीं फारसें पडूं नये. ज्यावर त्यावर आपली छाप बसविण्याची तळमळ तरी कांहीं चांगली नव्हे. उडी मारणें तरी फा-

जील उशीनें फेंकल्यास टिपण चुकून कोलमंडी मात्र खावी लागते.

लेखक म्हणतो, लौकिकी-सत्ताप्राप्तीचे कच्छपीं लागत बसण्याचें कारण नाहीं. शहाणपणानें व भलाईनें चाललें म्हणजे ती न बोलवितां आपण होऊन मागें लागत येईल.

( श्लोक )

सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदांपदम् ॥
वृणुतेहिविमृश्यकारिणं । गुणलुब्धाःस्वयमेवसंपदः ॥ १

—भारवि

भावार्थः—जो विचारपूर्वक चालतो अशाला गुण-लुब्ध लक्ष्मी स्वतःच होऊन माळ घालिते.

नशीबावर हवाला देऊन भलतीच उडी टाकण्यापेक्षां नीतीचे व सद्गुणाचे अढळ पायावर उभें असावें हेंच श्रेयस्कर होय. कोणतेंहि काम करा, त्यांत यश येण्यास सक्त व सतत प्रयत्न हा पाहिजेच. ' कर नकऱ्याचा वसा ' घेऊन किंवा साठा सहामासीं एकदां लक्ष पोंचवून कोणतीहि महत्कार्यसिद्धि होत नाहीं. शांत, सुदृढ आणि एकनिष्ठ अव्याहत प्रयत्न चालेल तरच सिद्धि करगामिनी होईल. कैलासदर्शन करून आलेले ' हंस ' ही सही करणारे गृहस्थ आपलें प्रवासवृत्त सांगत असतां, त्यांच्या वज्रनिभ दृढ-निश्चयामुळेंच ते बर्फाच्छादित हिमगिरी तीस

दिवसांत पायीं चढून त्याचे पलीकडे तिबेटांत गेले, असें वाटतें. कारण त्यांजपाशीं स्वेन हेडिन साहेबांप्रमाणें उपकरणसामग्री कशी ती नव्हती. बर्फावरून पाय घसरून कितीदां ते खालीं येत. एकदां तर बर्फाची ढगळी सरल्यामुळें ते १००० फुटांवरून खालीं पडले. तथापि पांचसहा तासांनीं शुद्धींत आल्यावर गाजींनीं पुनरपि गिर्यारोहण सुरूच ठेवलें, व अखेर असल्या उंच उच्चैःशिरसाच्याहि माथ्यावर पाय देऊन गेले. तसेंच, मुद्रणकलेंत केवळ अद्भुत शोध लावणारे प्रो० शंकर आबाजी भिसे हे म्हणाले, "हा शोध लावण्यापूर्वी सतत दहा वर्षेपर्यंत रात्रीचे नऊ वाजल्यापासून पहाटचे दोन वाजेपर्यंत नित्य नियमानें मी विजेचे दिव्याशी, 'असें केलें तर कसें जमेल, तसें केलें तर कसें जुळेल,' याप्रकारें भावी यंत्रासंबंधी कल्पविकल्प करीत बसत असें; तेव्हां ही युक्ति सिद्ध झाली". हाय रे शूर! सिद्धि अशा बहाद्दराच्या कशी गळां न पडावी? सारांश, अविरत व अनाश्रांत प्रयत्न हेंच सर्व सिद्धींचें वर्म आहे. शेक्स्पिअर म्हणतो,

( श्लोक )

दृढोद्यमें उज्वलकीर्ति राहे। आलस्ययोगें वरि डाग लाहे॥
कृपाण कीं खुंटिस टांगियेला। शूरास आणी उपहास्यतेला॥

आपल्या पश्चात् आपल्या मुलांबाळांना ए-

कादी इनाम—जहागीर किंवा गजान्त संपत्ति करून ठेवणें हें कांहीं प्रत्येकास साधेलच असें नाहीं. परंतु, कुलवान्‌पणाबद्दलचा लौकिक आपले सद्वर्तनानें कमावून तो आपल्या मुलांबाळांस मागें ठेवणें हें प्रत्येकाचे हातीं आहे. सिसिरो म्हणतो, " एकाद्याला हजारों लोकांपुढें उभें राहून बृहस्पतितुल्य वक्तृत्व करण्याचें किंवा रणांगणीं युद्ध करण्याचें सामर्थ्य जरी नसलें तरी चिंता नाहीं; त्याला देवानें जेवढी शक्ति व बुद्धिमत्ता दिली असेल तिचाच त्यानें सदुपयोग केल्यास पुष्कळ कार्य होणार आहे ". यास्तव प्रत्येकानें न्याय, मान्यता, औदार्य, मर्यादशीलता व नेमस्तपणा या गुणांचा अवश्य संग्रह करावा; म्हणजे याहून उंची गुण नसले तरी देखील त्यांचें उणेपण झांकून जाईल. आणि आपल्या मुलांना सद्गुण व सत्कृति यांचें वळण आपले मागें ठेवणें हें विपुल पितृधनापेक्षांहि अधिक आहे. यासाठीं प्रत्येकानें सद्गुण व सदाचार यांची हानि जेणेंकरून होईल असल्या वर्तनास सदैव भीत असावें. कोणीहि मनुष्य कितीहि दीन परिस्थितींत जन्मो, तो जर इमानें इतबारें आपलें कर्तव्य नेटानें करीत राहील तर त्याचे हातून कांहीं ना कांहीं तरी जगाचें कल्याण झाल्यावांचून राहणारच नाहीं. कारण,

जगत्कल्याणाचें रहस्य सद्वर्तन व सदुद्योग यांतच आहे; अपार सत्ता किंवा संपत्ति यांत नाहीं. पुष्कळदां सत्ता किंवा संपत्ति दुर्जनांचे हातीं पडते व तिचे जोरावर जगतांत ते घोर अनर्थ माजवितात. इतिहास पहावा तों सत्ता व संपत्ति यांचे उन्मादानें दुर्जनांनीं दुनियेला फार गांजणूक केली; आणि गरीब परंतु नीतिमान् अशाच लोकांनीं जगताची स्थिति सुधारली आहे, असें आढळून येतें.

सत्ता व संपत्ति यांपायीं सामान्य जनांवर होणारे जुलमांना त्रासून युरोपांत आजकाल " समुदयस्वत्ववादी किंवा सोशिआलिस्ट " नांवाचा एक नवा पंथ निघाला आहे. त्याचें म्हणणें समाजांत हा नवकोट नारायण आणि हा भिकारी हा भेदच नको. राष्ट्राचे एकंदर संपत्तीवर सामयिक सत्ता असावी; म्हणजे कोणीं कोणावर अरेरावी करावयास नको. * लबक म्हणतो, हा मार्ग शहाणपणाचा नाहीं. अशानें व्यक्तिस्वातंत्र्य व व्यक्तिसाहस यांचे पाय मोडतात. त्यामुळें उद्योग शिथिल होऊन धान्यादि अवश्य

* आपलेकडे विष्णुबोवा ब्रह्मचारी यानीं आपले वेदोक्तधर्मप्रकाशांतहि असलाच प्रकार सुचविला आहे त्यांचें म्हणणें गांवची जमीन सर्वांनीं मिळून कसावी. येईल तें उत्पन्न एकाच कोठारांत सांठवावें व प्रत्येक कुटुंबाचे गरजेप्रमाणें वांटणी द्यावी.

पदार्थांचा निपज मंदावेल. शिवाय, या पंथांत, संस्थानचे अधिकारीमंडळाची आज्ञा निमूट ऐकणें भाग आहेच, मग फळ काय ? या मंडळानें आपणास अन्न–वस्त्र–घर–धंदा हीं सर्व पुरवावयाचीं म्हणजे आह्मी अर्थातच सांगितल्या कामाचे आणि घातल्या अन्नाचे–म्हणजे गुलामापेक्षाही गुलाम झालों. अशा स्थितींत आह्मांस किंवा आमचे मुलांबाळांस रुचेल तो धंदा करण्यास सवड नाहीं; संस्थानचे किंवा स्थानिक मंडळाचे कामगार दाखवितील तोच धंदा उचलला पाहिजे. पण, अशानें राष्ट्राची अर्थवृद्धि, प्रगति, व स्वातंत्र्य यांना खो मात्र येईल; दुसरें कांहीं होणार नाहीं. सबब, या सामयिक स्वत्ववादी पंथांत काहीं हंशील नाहीं. त्यापेक्षां धनमत्त लोकांचे जुलुमाला अन्य कांहीं मार्गानें आळा घालून राष्ट्राचा उत्कर्ष किंवा प्रगति खास करितां येईल.

जुन्या लोकांना प्रगतीची कल्पनाच नव्हती. जें कांहीं चांगलें, जें कांहीं उत्कृष्ट, तें आपल्या फार पूर्वींच होऊन गेलें, व आतां दिवसेंदिवस जग निकृष्ट होत जाणार असा त्यांचा समज होता. भरतखंडांत ही कल्पना अजूनहि दृढरूढ आहे. जें काय चांगलें होतें तें मागील युगांत होतें. कलि म्हणजे बुडता पाया. परंतु, ही सम-

जूत घातक आहे. युरोपखंडांत ही समजूत यावत्काल चालू होती तावत्काल युरोपाचें पाऊल शास्त्रीय ज्ञानांत किंवा प्रगतीचे मार्गांत मुळींच पुढें पडेना. आपल्या इकडल्या न्यायशास्त्र्यांप्रमाणें तिकडील मोठाले विद्वान् केवळ शब्दवादांत दंग असत. मेकॉले म्हणतो:—" शब्द, शब्द आणि शब्द ". तूस कांडून हातीं काय यावें ? घाण्याचा बैल संध्याकाळपर्यंत फिरला तरी खोलीचे बाहेर मजल जात नाहीं. त्याचप्रमाणें हजार वर्षें जरी शब्दवादांत चक्रा मारीत बसलें तरी पुढें पाऊल कसें पडावें ? अनुभव किंवा प्रतीतीवांचूनच कांहीं तरी एक तत्त्व गृहीत धरावें, आणे मग त्याबद्दलच शाब्दिक वाद घालीत बसावें, अशानें काय होणार ? युरोपांत मध्ययुगांत हाच बखेडा चालू होता व तोंपर्यंत अर्थातच प्रगतीचे नांवानें, इकडल्याप्रमाणेंच तिकडेहि शून्याकार होता. पण पुढें मनु पालटून सृष्टवस्तूंचें अवलोकन व अनुभव यावर जेव्हां विद्वानांनीं भर दिला, तेव्हांपासून युरोपाची शास्त्रीय प्रगती सुरू झाली. ठीकच आहे; श्री नृसिंहसरस्वती स्वामींनीं म्हटलें आहे:—

( ओंवी—अर्ध )

अमोल मोल तो अनुभव । ययाव्यतिरिक्त सर्व वाव ॥

—स्वात्मसौख्य

अनुभवानें ठरेल तेंच पक्कें. त्याविरहित नुसतें तर्कजाल उदंड माजविलें, फळ काय?* हक्स्ले म्हणतो, "तुम्ही कितीहि भक्कम व सुंदर तर्कजाल पसरा, प्रतिकूल अनुभवाचे एके फटक्यास त्याचे धुडके उडतात". आणि मग आपणांस जरी दुःख वाटलें कीं 'अरेरे, कसलें सुंदर जाळें विणलें होतें!' तरी तें निरुपयोगी म्हणून फेंकून देणें भाग पडतें. परंतु, जी गोष्ट अनुभवाचे चिऱ्यावर ठोकून ठाकून घेतली, तिचे धुडके उडण्याचें भयच नाहीं. यासाठीं प्रत्येक नवीन कल्पना उद्भवली कीं ती अनुभवाचे–साक्षात्काराचे कसोटीवर टिकवून पहावी आणि मग ती वापरण्यांत आणावी. युरोपानें ही साक्षात्कार-पद्धति जेव्हांपासून अंगीकारिली तेव्हांपासून मात्र त्याची शास्त्रीय प्रगती, मेकॉले म्हणतो, "जो बिंदु काल दिसतहि नव्हता तो आज दृष्टीचे पुरापुर टप्प्यांत आला व उद्यां तर पायाखालीं पडला", या प्रकारें सारखीं झपाट्यानें चालू झाली व तशीच चालू राहणारही. आम्ही भारतवासी

---

*(श्लोकार्ध)

बहुशास्त्रकथाकन्थारोमन्थेन वृथैव किं ॥

—विद्यारण्य

**भावार्थः**—उगाच शास्त्रीय शब्दांचें गोवडें चघळीत बसून निष्पन्न काय? साक्षात्काराचे खटपटीस लागा.

लोक बुद्धीनें कमी नाहीं; परंतु, जोंपर्यंत आह्मी आपली रबरी स्थितिस्थापकता सोडीत नाहीं, तोंपर्यंत आमचे 'पहिले पाढे पढो पंचावन' हीच दशा रहणार. सुदैवानें या कामीं युरोपाचें उदारण डोळ्यांपुढें आहे. त्याचें अनुकरण सर्वांतर्यामानें आह्मीं केल्यास आह्मांसहि आनंदाचे दिवस दुरावणार नाहींत.

गत शतकांत * युरोप—अमेरिका खंडांत झालेली शास्त्रीय ज्ञानाची वाढ खरोखर तोंडांत बोट घालण्याइतकी आश्चर्यकारक आहे. तिच्या पायीं आकाशांतील गोलांचें केवळ वजन व मापच नव्हे, तर अंतर्गत घटना देखील समजून आली आहे. अगाध व अतल अशा भूविवरांत व महार्णवांत बिनधोक उतरणें सुलभ झालें आहे. भूगर्भशास्त्रानें मोठमोठे पर्वत, दरेखोरे, नद्या कां व कशा निर्माण होतात हें कळून आलें आहे. महानद देखील सेतुबंधनानें सुतर झाले आहेत. महोदधीवरून जशी काय पायवाटच पडली आहे. प्रवासांत असलीं असलीं शीघ्रगतिक यानें-वाहनें अनुकूल झालीं आहेत कीं, त्यांचे साधनानें दूरदूरचे प्रदेश देखील

---

* ही पुढील शास्त्रीय प्रगतीची प्रशंसा हिंदुस्थानाला जरी लागू नाहीं तरी तिचा फायदा हिंदुस्थानास अंशतः तरी मिळत असल्यानें तिचें वर्णन वाचकांपुढें ठेविलें आहे.

ओसरी-अंगण होऊन राहिले आहेत. विद्युत्प्रकाशानें चांदोबाची शेखी उतरली आहे. व्याधिग्रस्तांचें दु:ख हलकें केलें आहे. आयुर्मर्यादा वाढविली आहे व एकंदरींत जीवित अधिक विलोभनीय करून सोडिलें आहे. या शास्त्रीय ज्ञानानेंच आह्मांस प्राचीनतम अशाहि काळाचे सम्यक् ज्ञान प्राप्त झालें असून भविष्यत्कालीं अशीच प्रगति चालत राहील असा विश्वासहि उत्पन्न झाला आहे.

रेनान नामक ग्रंथकार म्हणतो कीं, गतशतक मोठें मौजेचें होतें. लबक म्हणतो, नुसतें मौजेचें म्हणणें बरें नाहीं; अत्यंत चित्ताकर्षक व फायद्याचें होतें असें माझें मत आहे. त्यांत कसकसले गूढ शोध व दिव्य कल्पना निर्माण झाल्या आहेत! अग्निरथ आणि अग्निनौका; तारायंत्र, किरणलेखन; धुराचे–राकेलचे, विजेचे दिवे; सौरप्रकाशाचें पृथक्करण, अंतर्हितवस्तुलेखन ( x-rays ), रेडियम किंवा कांतधातूसारख्या अनेक मूलभूत शुद्ध पदार्थांचा शोध, ध्वनियंत्र ( टेलेफोन ), ध्वनिलेखक यंत्र ( फोनोग्रॉफ ); हवेचें–विशेषत: जलजनक वायूचें–द्रावण, डार्विन साहेबानें लावलेले अगाध शोध; भूगर्भशास्त्राचें स्थापन, वेदनापहारक बेशुद्धीचीं औषधें, आयोडोफार्मसारखीं शरीराचें सडणें बंद करणारीं

औषधें, इत्यादि इत्यादि अद्भुत व अभिनव शोधांकडे पाहिलें म्हणजे डोळे दिपून जातात. आधिभौतिक ज्ञानाप्रमाणेंच नीतीचेंहि पाऊल पुढें आहे. उदार शिक्षण व अप्रतिबंध व्यापारपद्धति हीं या नीतिप्रियतेचीं उदाहरणें आहेत. धार्मिक कल्पनाहि बऱ्याच निवळत चालल्या आहेत. भुतेंखेतें, चेटकें यांवरील विश्वास युरोपांत फार दृढ होता, तो बहुतेक नष्ट झाला आहे. तसेंच कलाकौशल्य व सामान्य वाङ्मय यांनाहि उदंड भर पडली आहे. या भौतिकशास्त्रांवर कोणाकोणाचा आक्षेप असा आहे कीं, ह्यांचे व्यासंगानें बुद्धि अरसिक व मंदकुतूहल होते; परंतु हें खरें नव्हे. भूगर्भशास्त्रानें विश्वकर्त्याचे कृतींतील जीं अद्भुत कौतुकें निदर्शनास येत आहेत, त्यांपुढें मोठमोठ्या कवींचे कल्पनेचीहि भरारी थंड पडेल. ज्वालामुखी पर्वताचा उद्भव कसा होतो तें आजकाल समजून आलें आहे, तिकडे लक्ष दिलें म्हणजे सृष्टिकौतुकानें मन वेडेंच होऊन जातें.

गतशतकाची ही कर्तबगारी पाहिली म्हणजे या चालू–विसाव्या–शतकांतहि असाच उदय होईल, अशी उमेद आहे. लॉर्ड डर्बीचें म्हणणें " झाली हीच शिकस्त झाली आहे; आतां पुढें कोठें जाणार"? पण, लबक म्हणतो, मला हें रुचत नाहीं. कारण, आपल्याला जरी आपरुें ज्ञान

अफाट वाटत असलें तरी निरभिमानपणें बोलूं गेल्यास या अनंत विश्वांत भरलेल्या ज्ञानापैकीं ' खंडींत पाव रती ' देखील हातीं आलें नाहीं. फार कशाला ? जगांतील कोणताहि एकच पदार्थ घ्या; एकादी वनस्पति घ्या; तिचेच यावद्गुणधर्म कोणाला कळले आहेत ? आपले सभोंवार असल्या कांहीं अतर्क्य गूढशक्ति भरलेल्या आहेत कीं, त्यांचें आपणांस स्वप्न देखील नाहीं. आपण चमत्कृतिपूर्ण अशा विश्वांत उभे आहों. अजून आपण काय बोलतों याचा देखील पुरापुर अर्थ आपणास समजत नाहीं; मग ईश्वराची बोली दूरच राहिली. तथापि, आला तो दिवस अधिकाधिक समर्थ व तीव्र अशी यंत्र व साधनसामुग्री आह्मांस प्राप्त होत आहे, व तीमुळें अधिकाधिक सृष्टिकौतुकें गोचर होत आहेत; अधिकाधिक विद्वान् शोधांचे मागें लागत आहेत, व आज अंधुक असलेली गोष्ट उद्यां अधिक व्यक्त होत चालली आहे, त्या अर्थीं ज्ञानाचा प्रकाश पसरत जाऊन आह्मांला पुढें पुढें वाट दिसत जाईल. एक डोंगर चढून गेलें म्हणजे पूर्वीं त्यानें व्यवहित असलेला भूप्रदेश आपल्या डोळ्यांपुढें येऊन पुनः पलीकडील नवेच डोंगर दिसूं लागतात, तसाच प्रकार या ज्ञानाचे यात्रेंत होतो. अर्थात्, आमची गति एका डोंग-

राशीं आल्यानें कुंठित झाली नाहीं. तिचा अधिकाधिक प्रसर होणें शक्य आहे, हाच सिद्धांत.

लेखक म्हणतो, आजकाल आमचे मुलांचें शिक्षण मोठमोठ्या समर्थ व शास्त्रीयज्ञाननिष्णात अशा अध्यापकांचे हातून होत आहे. शिवाय, दिवसानुदिवस हरप्रकारें सोई व साधनें ह्यांची वाढ होत आहे. प्रवास सुलभ व सुखकर झाल्यानें ज्ञानाला व चातुर्याला भर घालणाऱ्या गोष्टींतील प्रमुख जें पर्यटन तें सुसाध्य झालें आहे; त्यामुळें दूरदूर देशीं जाऊन तेथेंहि शिक्षण घेतां येतें. या सर्व गोष्टींचा विचार करितां शास्त्रीय विज्ञानाचा याहूनहि अद्भुत उत्कर्ष होणार आहे असा माझा खास अंदाज आहे. आणि हा खरा झालेला, पुढील पिढीचे अनुभवास खचित येईल. शास्त्रीय ज्ञानानें आह्मांस दीर्घायुषी केलें आहे. वेदना कमी करून रोगराईहि बहुतेक नष्टप्राय केली आहे. जमिनीचा सुपीकपणा वाढविला; दर्यावर्दी लोकांचे धोके कमी झाले; शूर शिपायांस नवीनच शस्त्रास्त्रें मिळालीं आहेत; मोठमोठ्या खाड्या, नद्या, नद यांवर सेतु बांधले आहेत; आकाशांतील उल्का निमूटपणें भूमींत दबडली आहे; काळोख्या रात्रीला पौर्णिमेचें ऐश्वर्य दिलें आहे. चर्मचक्षूंची ( दुर्बिणीचे साह्यानें ) अनंत अंतराळांत धांव

पोंचविली आहे. मनुष्याचें शारीरबलहि प्रगुणित केलें आहे. गतीची त्वरा फार वाढली आहे; अंतर जणू नाहींसेंच झालें आहे. परस्पर पत्रव्यवहार, व्यापार, दळणवळण, फार सुलभ झालें आहे. अगाध समुद्राचे तळीं जाणें किंवा अनंत आकाशांत पक्ष्याप्रमाणें उडणें, खोलखोल भूविवरांत निर्बाध प्रवेश करणें, अश्वरहित रथांतून वायुवेगानें भूपर्यटन करणें, व तासांत दशयोजन गतीनें वायूचे उलट दिशेनेंहि समुद्रांतून हिंडणें ह्या गोष्टी केवळ करतलामलकवत् स्वाधीन झाल्या आहेत.

शास्त्रांत ज्ञानाला निर्झराची उपमा दिली आहे; ती योग्यहि आहे. तीवरून पहातां असें दिसतें कीं, निर्झराप्रमाणेंच ज्ञानप्रवाह पुढें पुढें वहात राहील तितका तो स्वच्छ व निर्मल होत जाईल. आणि तोच कोंडून पडेल तर नासून जाईल याकरितां आपले शास्त्रीय ज्ञानाचा प्रवाह अखंड अधिकाधिक वाढता राहणें इष्ट आहे. शास्त्रीय ज्ञानाचा अद्भुतपणा यक्षिणींचे कृत्यांहूनहि अधिक आहे व कादंबरीपेक्षांहि मोहक आहे. जों जों हा प्रवाह पुढें पुढें जाईल तों तों त्याचे तळीं दिव्य दिव्य रत्नें निपजूं लागतात; व ज्यांची कधीं कल्पनाहि नव्हती असल्या अपूर्व मौजा दृष्टीस येतात. आयुष्य हें एकाद्या बगीच्याहूनहि आरामशीर वाटूं लागतें व त्या-

मुळें जीवाला हुशारी येऊन अधिकाधिक उद्योग करण्यास हौस येते. असे अनेक फायदे ज्ञानवृद्धी-पायीं होत असूनहि जे कोणी ज्ञानाची उपेक्षा करीत असतील ते परमकारुणिक व उदार परमात्म्यानें मनुष्यास दिलेली एक अद्भुत देणगी उकिरड्यावर फेंकून देत आहेत, असें दुःखानें म्हणावें लागतें.

शास्त्रीय ज्ञानाचें आह्मी इतकें कौतुक गातों खरें; परंतु, या ज्ञानाचा इतिहास पहातां एका कवीनें म्हटलें आहे—

मार्जारो लभते न पंजरशुकालापेन कौतूहलं ।

म्हणजे—राघूच्या बोलकेपणाचें मांजराला कौतुक नाहीं, त्याची आठवण होते. कारण, ज्या मनुष्यानें दूर अंतराल जवळ आणणाऱ्या अशा या दुर्बिणीचा शोध लाविला, त्याला कारागृहवासाची बक्षिसी मिळाली! ज्यानें सूक्ष्मदर्शकयंत्रद्वारें भूगर्भाचें निरीक्षण केलें, तो हद्दपार केला जाऊन अन्नअन्न करून मेला! ही तर या दुर्जनपूर्ण जगांत ज्ञानासारख्या सद्वस्तूची दशा आहे. तथापि, बेकन म्हणतो, "आपले पोटांत अपार संपत्ति व माल घेऊन समुद्रांतून परतीराला गांठणारे समुद्र-यानाबद्दल जर जगास कौतुक वाटतें, तर, या सनातन कालसमुद्रावरून, पोटांत अनंत विचित्र रत्नें घेऊन अखंड चालत राहणारी व गत आणि

आगामि अशा अति दूर कालांची भेट करविणारी ही ज्ञानरूपी नौका निखिल जनास प्रेमास्पद व कौतुकाधान-हेतु व्हावयास नको काय "?

लेखक म्हणतो: शास्त्रीय विज्ञानाचें हें महत्त्व ध्यानांत वागवून आपण त्याचा पुरस्कार अगत्य केला पाहिजे. तेणेंकरून ज्ञानाची प्रगति होऊन आपले सुखांत भर पडेल. तथापि, मानवी जातीची जी खरी खरी उन्नति ती केवळ शास्त्रीय प्रगति ही नव्हे. व्यापाऱ्याची आयात-निर्यात पुष्कळ वाढली; धंदा-उदीम, यांत्रिकशक्ति बळावली; आगगाड्या, तारायंत्रें देशभर पसरलीं; देश पादाक्रांत करून आमचे राज्याला जोडले, तरीहि त्यानें आमची खरी खरी उन्नति झाली असें म्हणतां येत नाहीं. कोणत्याहि राष्ट्राची खरी उन्नति म्हणजे त्यांतील प्रत्येक व्यक्ति सत्त्वशील, आनंदी, थोर मनाची, व परहितनिरत होणें यांत आहे. तुकारामानीं म्हटलें आहे:—" भूतदया ठेवा, मग काय उणें ? । प्रथम साधन हेंचि असो ॥ " अर्थात्, आपल्या राष्ट्रांत वरील गोष्टी व्यक्तीचे अंगीं उदाहरणानें व उपदेशानें आणण्याविषयीं झटून यत्न करणें, याहून श्लाघ्य व पवित्र कार्य कोणतेंहि नाहीं. हें जो कोणी महात्मा करीत असेल त्याला याहून अधिक स्पृहणीय अशी दुसरी वस्तुच या जगांत उरली नाहीं.

( इंदवच्छंद—सवाईच्या चालींवर )

जो दश वीश पचाश भये शत, होइ हजार तु लाख मगैगी।
कोटि अरब्ब खरब्ब असंख्य, धरापति होनकी चाह जगैगी।
स्वर्गपतालकु राज करौं तृसना अधिकी अति आग लगैगी।
सुंदर एक संतोषबिना सठ, तेरि तूं भूख कधीं न भगैगी॥ १

**—सुंदरदास**

**भावार्थः**—पदरीं जेव्हां दहा रुपये झाले तेव्हां विसांची आशा करूं लागला. वीस झाले तेव्हां पन्नासांची. याप्रमाणें शंभर, हजार, लाख, कोटि, अर्व, खर्व,—अगणित पैशाची इच्छा होऊं लागली. पुढें भूलोकाचा राजा व्हावेसें वाटलें. भूपतीत्व मिळाल्यावर स्वर्ग व पाताळचेंहि राज्य मागूं लागला. तरी तृप्ति नाहींच. सुंदरदास म्हणतात, आग लागो या तुझ्या तृष्णेला! अरे मूर्खा, असें करशील तर तुझी ही भूक कधींच पुरी होणार नाहीं. याकरितां संतोष ठेव म्हणजे सर्व हाव मिटेल.

# प्रकरण ५

## संतोष

( श्लोक )

संतोषामृततृप्तानां । यत्सुखं शांतचेतसां ॥
कुतस्तद्धनलुब्धानामितश्चेतश्च धावताम् ॥ १

—हितोपदेश

**भावार्थः**—संतोषरूपी अमृताचे पानानें तृप्त झालेल्या शांतवृत्तीचे लोकांस जें सुख आहे, तें द्रव्यामागें लसलस करीत भटकणाऱ्या हांवऱ्यांना कुठून वरें मिळणार ?

( श्लोकार्ध )

जरी तूजला इष्ट तें प्राप्त नोहे ।
तरी प्राप्त तें इष्ट मानोनि राहें ॥

—बुशी रावटिन

या गोलार्धांत या वेळीं चंडरश्मी सूर्य कितीहि प्रखर तपत असला तरी दुसऱ्या अर्धांत याच वेळीं निबिडतम असणें नवल नव्हे. नवल नव्हे इतकेंच नव्हे, तर अवश्य प्राप्त आहे. कारण, या सापेक्ष व समर्याद जगताची घटनाच अशी आहे. प्रकाश म्हटला कीं काळोख आलाच; शीत म्हटलें कीं उष्ण आलेंच; रात्र म्हटली कीं दिवस ठेवलेलाच. अशी येथें जबरदस्त भाऊबंधकी आहे. या द्वंद्वांचे मिठीपुढें प्रत्यक्ष देवाचें देखील कांहीं

चालत नाहीं. सृष्टीचा हा केवळ स्वभावच आहे. तेथें बिचारा विधाता तरी काय करितो ? म्हणच आहे, ' स्वभावो दुरतिक्रमः '.

प्रभु रामचंद्र म्हणतातः—

(श्लोक)

सुखमध्ये स्थितं दुःखं । दुःखमध्ये स्थितं सुखं ॥
द्वयमन्योन्यसंपृक्तं । प्रोच्यते जलपंकवत् ॥ १

भावार्थः—हा लक्ष्मणा, या जगांत सुखदुःखाचें साहचर्य चिखल आणि पाणी यांसारखें आहे.

पिंडार म्हणतोः—सुख व दुःख यांच्या लाटा या मानवी शरीरांत सारख्या मागें-पुढें हेलकावत असतात.

पण असें आहे तरी समर्थांनीं म्हटलें आहे त्याप्रमाणें " सुखें राहतां सर्वही सुख आहे ". लॅसिडेमॉन या गांवीं एकदां एक पाहुणा आलेला गृहस्थ मुद्दाम मोठी चट्टीपट्टी करीत बसलेला पाहून डायाजेनीज या प्रसिद्ध ज्ञात्यानें त्याला विचारिलें, 'कां आज इतकी छानीशी'? पाहुण्यानें उत्तर केलें, ' आज आह्मास मेजवानीला जावयाचें आहे '. तें ऐकून तत्त्ववेत्त्यानें हटकलें, ' भल्या मनुष्याला प्रत्येक दिवस मेजवानीचाच नाहीं काय ' ? मोरोपंतांनीं पुण्यश्लोक नळ राजाचें वर्णन करितांना म्हटलें आहेः—

( आर्या-चरण )

लोकां महोत्सवप्रद तोचि, तयां अन्य पाडवा नलगे ॥

लवक म्हणतो, जगत् जरी द्वंद्वात्मक असलें तरी ज्ञात्याला हें जगत् म्हणजे खरोखरच नित्य नवी चमचमीत मेजवानी आहे. कारण, हें जगत् म्हणजे एक अद्भुत व अत्यंत रमणीय असें मंदिर आहे. आणि मनुष्यानें हातानें घडलेल्या दगडी मूर्ति पहात बसण्यापेक्षां जो कोणी या विश्वमंदिरांत त्या अजब कारागिरानें स्वहस्तानें ठिकठिकाणीं स्थापिलेल्या आत्मविभूतिरूप सूर्य, चंद्र, नक्षत्रें, नद्या, नद, भूतधात्री व रत्नगर्भा धरित्री, इत्यादि देवता पहात बसेल, त्याला सकल दुःखांची विस्मृति पडून त्याची तानभूक नाहींशी होईल व तो अखंड सुखांतच मग्न होऊन जाईल, यांत संशय नाहीं. योग्याबद्दल म्हटलें आहे कीं, "यत्र यत्र मनो याति । तत्र तत्र समाधयः" त्याचप्रमाणें ज्ञानी मनुष्य या विभूतिमय जगतांत दृष्टि लावील तेथेंच त्याची समाधी लागेल, इतकें हें रसपूर्ण आहे. परंतु, पहावें तों जगतांत शेंकडों हजारों लोक देवाचे नांवानें धोंडा घालीत असतात, व जगत् हें कष्टमय आहे म्हणून कोकलत असतात! आणि सर्वदा हातपाय मोडल्यासारखे निराश बसतात. याला काय म्हणावें? या विश्वांत किती तरी आनंद भरला आहे हा त्यांना होऊन कळत नाहींच; पण, दुसरा कोणी त्यांची समजूत घालूं लागेल तर

त्याचाहि ते कंटाळा करितात. तेव्हां मात्र अशांना पाहून " अंधस्य दीपो बधिरस्य गीतं । मूर्खस्य किं शास्त्रकथाप्रसंगः ॥" म्हणजे अंधाला दिव्याचें, बहिऱ्याला गायनाचें व मूर्खाला शास्त्रज्ञानाचें काय होय ? या म्हणीचें स्मरण होतें.

बरें, अशांना आम्ही विचारितों कीं, हें जगत् व हें तुमचें जीवित कष्टमय आहे ना ? मग तुम्ही मरावयास तयार आहां का ? तेवढें मात्र त्यांना कबूल नाहीं. असें कां असावें ? जगत् दुःखमय आहे हें त्यांचें म्हणणें जर खरें असेल, तर त्यांनीं तें सोडण्यास उद्युक्त असलें पाहिजे. आणि ज्या अर्थीं ते नाहींत, त्या अर्थीं उघडच जीवितांत सुख आहे, गोडी आहे, रस आहे, हेंच सिद्ध झालें. " सबसे जीव प्यारा है " पण कथा-कादंबऱ्यांत काव्य-नाटकांत वाचावें तों जीवित दुःखमय आहे म्हणून ठिकठिकाणीं कुरकूर आहे. तुकाराम म्हणतो:–" सुख पाहतां जवापाडें, दुःख पर्वताएवढें ". संस्कृतावरून कै० किर्लोस्कर गातात:–" निःसारीं संसारीं नच सुख, होय सुखाची भ्रांति ॥ ". कोणी 'जग हें बाभळीचें वन, विंचवांचें तळें, गडद अंधारी गुहा ' असें म्हणतात; व अशा जगांतील आयुष्याचा एक एक दिवस म्हणजे दुःखाची लांबण असें त्यांना वाटतें. कांहींचें म्हणणें—

( साक्या )

खाया, प्याया, ल्याया घ्याया, । असेल मुबलक पैसा।
तरी मग सुंदर भासे जग हें। आह्मां न दुजी आशा ॥ १
परि भिक्षाशन अथवा याचन । अथवा धन तुटपुंजी ॥
नको नको तरी दुष्ट जगत हें। जीव येतसे रंजी ॥ २

पर्कास म्हणतो, " एक तर जन्मच नको; आलाच तर दीर्घायुष्य नको ". सालोमन हा नाणावलेला शहाणा व परमेश्वराचा इतका लाडका होता, पण तो देखील म्हणतो, " मला जीविताचा तिटकारा आहे. कारण, हें सर्व मिथ्या असल्यानें एथें केलेले श्रम केवळ दुःखरूपच आहेत. शिवाय आयुष्य अल्प असल्यानें, मी मर मर मरावें आणि माझ्या श्रमाचें फळ भलत्यांनीं खावें! काय फायदा? सारांश, मनुष्याला या मायामय संसारांत सुख मिळून नाहीं. निद्रेंत देखील त्रास आहे". लॉर्ड बेकन्सफील्ड म्हणतो, " बापहो, ज्वानी हा फजिता आहे, मध्यवय ही लढाई आहे, व वार्धक्य हा पस्तावा आहे". अंमळ सुखाचेसे दिवस म्हणजे बाळपणचे. तेवढे गेले म्हणजे एक एक दिवस सुख अधिकाधिक दुरावत जाऊन वार्धक्य तर सुखशून्यच होतें. कांहींचें म्हणणें तारुण्य हा वसंत व वार्धक्य हा हेमंतकाल आहे. शेक्सपअर म्हणतोः—

( पद )

तरुण, थेरडा यांचा जोडा, कधीं सुखानें नांदेना ।

तारुण्याचा वार्धक्याचा तुल्यभाव हा साधेना ॥ ध्रु०
तरुण लढाऊ, कृपण थेरडा। तरुण गुलाबी, खल्लड बुढा।
तरुण खिलाड्, वृद्ध लंगडा। गरम तरुण तो आणि रंगेला।
थंड वृद्ध तो आणी दुबळा। जरठ शिथिल तर तरुण चळवळा
कविवर बोले यांची तुलना। कशी करावी मज समजेना ॥ १

याशिवाय अन्य स्थलींहि शेक्स्पिअरचे उद्गार वार्धक्याची निंदा सुचविणारे आहेत. आमचे भर्तृहरीहि म्हणतातः—

( श्लोक )

गात्रं संकुचितं, गतिर्विगलिता, भ्रष्टाच दंतावलिः।
दृष्टिर्नश्यति, वर्धते बधिरता वक्त्रंच लालायते ॥
अर्थप्रार्थनशंकया न कुरुतेऽप्यालापमात्रंसुहृत्।
हा कष्टं पुरुषस्य जीर्णवयसः पुत्रोप्य मित्रायते ॥ १

भावार्थः—शरीर आंखडलें, गति मंदावली, दांतांची कवळी कोसळली, दृष्टि गेली, बहिरेपणा वाढला, तोंडांतून लाळ चालली. अर्थयाचनेचे भयानें स्नेही बोलतनासे झाले. हर हर ! अधिक काय सांगावें, पण वृद्धवयांत पोटचा पोर देखील पुरुषाचा तिटकारा करितो.

कबीर साहेब म्हणतातः—

( पद )

बुड्ढेपनमों कांपन लागा। निकल गया अवसान।
अब तुम कब समरोगे राम। जिवडा दो दिनका जजमान.

म्हटलें असतां बायरन कवि हा गुलजार; पण तो देखील वार्धक्याचा कंटाळा करितो. ' माझा छत्तिसावा वाढदिवस ' या नांवाच्या कवितेंत तो म्हणतोः—

( साकी )

झालों पिकलें पान अतां मी । बहर उलगला ज्वानीचा ।
प्रीतिपुष्प तें गळुनी गेलें । किडा लागला चिंतेचा ॥ १

अन्यत्रहि तो या मनुष्यदेहाविषयीं म्हणतो—

( श्लोक )

देहक्षेत्रा काल हा नांगरूनी ।
चिंताबीजें देतसे पाभरूनी ॥
अंतीं मृत्यू सर्व जीवां नियंता ।
कापूनी तें क्षेत्र, दावी स्वसत्ता ॥ १

जोबर्टचे मतें आपले आयुष्यांतील बाल्य व वार्धक्य हे दोन भागच अत्यंत श्रेष्ठ होत. पहिल्यांत व्याप आणि संताप हे नसल्यानें सर्व आनंद असतो; व दुसऱ्यांत विवेकाचें सुख असतें. बाकी या दोन अवस्थांतील सुखांत एक भेद आहे. बाल्यांतलें सौख्य परायत्त असतें; वार्धक्यांतलें स्वायत्त असतें. आईबापें खातींपितीं व संगोपनदक्ष असलीं म्हणजे बाल्य विशेष सुखावह होतें. प्रभु रामचंद्रहि अशा बाल्याची आठवण करून म्हणतातः—

( श्लोक )

जीवत्सु तातपादेषु । नवे दारपरिग्रहे ॥
मातृभिश्चिंत्यमानानां । तेहि नो दिवसा गताः ॥ १

—**उत्तररामचरितम्**

भावार्थः—अरेरे, आमचे ते पोरपणचे मौजेचे दिवस गेले! त्या दिवसांची मौज काय वर्णावी? बाबा जिवंत होते, नुकतेंच लग्न झालें होतें आणि आमची सगळी

काळजी मातोश्री वहात असल्यामुळें आह्मी खुशाल-चेंडूप्रमाणें उड्या मारीत असूं. पण ते दिवस आतां गेले, म्हणून खेद होतो.

बाल्याच्या ह्या सुखदायित्वावरून कोणी कवि त्याला आयुष्याच्या कालांतील मधुमास असें म्हणतो. तें ठीकच आहे. लबकचे मतें शैशव, तारुण्य, मध्यवय व वार्धक्य या चारहि अवस्था आपापल्यापरी सुखदच आहेत. मात्र त्या त्या अवस्थेला अनुरूप अशी स्थिति असली पाहिजे. ज्या घरांत कज्जेकफावती नाहींत, आईबापें प्रेमळ व दक्ष आहेत, मूल स्वतः प्रकृतीनें निरोगी व सणसणीत असून त्याचा वाढता जोम आहे व आला तो दिवस त्याचें मन या अपरिचित सृष्टींतलि मौजा पहाण्यांत रमत आहे, अशा स्थितीचें बाल्य खरोखरच स्पृहणीय होय. नवीन कल्पनेचा परिचय होणें हें एक अप्रतिम सुख आहे. व बाल्यांत सर्व जगच अपरिचित असल्यानें नित्य नव्या कल्पना व मौजा यांचा सुकाळ असतो. यापरि बाल्य सुखावह झालें. आतां, तारुण्य अधिकच सुखमय आहे. कारण, बाल्यांतील सुख मुग्ध किंवा मुकें असतें. पण तारुण्यांत समजूत प्रगल्भ झाल्यानें आपल्याला हें चमत्कारपूर्ण विश्व अधिकच सुख देतें. पोरानें ग्रहनक्षत्रांकडे पाहिलें, तर त्याला फक्त नेत्रानंदच होईल. परंतु प्रौढवयानें पाहिलें, तर त्याला

त्या अद्भुत तेजोगोलांची घटना, गति, कार्यें वगैरे अवांतर गोष्टी कळल्यानें त्याचें अंतरंगहि आनंदानें उचंबळून येऊन त्याचे नेत्र, पोराप्रमाणें त्या ज्योतींवरच स्थिर न राहतां, "ज्योतिषामपि यज्ज्योतिः।" असें ज्याला म्हटलें आहे त्या दिव्य सृष्टिकर्त्याकडे स्नेह व पूज्यभाव यांनीं प्रेरित होऊन लावतील. आणि असलें हें विचित्र विश्व आपल्या उपभोगार्थ दयाळू देवानें निर्मिलें आहे हें कळलें म्हणजे तर त्याला गुदगुल्याच होतील; व असल्या लाभाचें आपण चीज करून दाखवूं अशी त्याला उमेद चढेल. त्याचे पुढें मध्यावस्था आली समजा. या अवस्थेंत शरीरबल पूर्ण असतें. जगत् हें एक गमतीचें कोडें आहे, व त्यांत येणारे प्रसंग ह्या आपल्या किमतीच्या कसोट्याच आहेत व संकटें ह्या सूचना आहेत असें मनुष्याला कळलें असल्यामुळें तो परमेश्वराचा संकटांतहि सद्धेतु ओळखून विश्वस्त असतो. व शिवाय या अवस्थेंत त्याला प्रभु रामचंद्राचे म्हणण्याप्रमाणें—

( श्लोकार्ध )

त्वं जीवितं त्वमसि मे हृदयं द्वितीयं।<br>
त्वं कौमुदी नयनयोरमृतं त्वमंगे॥

—रघुवंशम्

तूं जीव तूं हृदय तूं मजला विसावा।<br>
तूं चंद्रिकाच नयना शरिरा सुधा वा॥

या रूपकांचें भाजन अशा प्रियेचें समागम-सुख प्राप्त असतें, यामुळें ही अवस्था तर मागली-पेक्षांहि रसपूर्ण असते. तथापि, या तीनहि अ-वस्थांपेक्षां सुखावह अवस्था म्हणजे वृद्धावस्था होय. पूर्ववयाचा जर आपण सद्व्यय केला असेल, तर ही अवस्था फारच बहारीची असते. या वेळीं सगळा व्याप-संताप मिटला असतो; हातापा-याला व पोटाला कर्तेसवरते मुलगे असतात; स्वतःला काळजी नसते; करमणुकीला कच्चींबच्चीं नातवंडें असतात. जगाबद्दलची हांव संपलेली अ-सते, यामुळें चित्त सहजच स्वस्थ असतें. व आपण जन्मास आल्याप्रमाणें जगांत पुरुषार्थ केला; स्वार्थ, परार्थ, देशार्थ हे अंशतः तरी साधले; व दीनदुःखितांस साह्य करून मनुष्यजातीचे सु-खास अल्प तरी भर घातली; असले सद्विचार मनांत येत असतात, व यामुळें मन स्वानंदपुष्ट असतें. स्वदोषानें कोणी घाण करील तर वेगळें; एरव्हीं वार्धक्य सुखी असणें अशक्य नाहीं. आतां, वार्धक्य म्हणजे मृत्यूची उपान्त्य अवस्था असल्यामुळें पुष्कळांस त्याचा बाऊ वाटतो. परंतु, अनंतर मृत्यु असला म्हणून तेवढ्यानें वा-र्धक्याचे सुखांत विरजण पडण्याचें कारण नाहीं. आपण जर ‘ देवा तुझें सान्निध्य आह्मांस मिळो ’ म्हणून नित्य देवाची प्रार्थना करितों, तर मृत्यु

ओंगळ व भयप्रद कसा वाटावा ? शिवाय, चारुदत्तानें म्हटलें आहे:—

( श्लोकार्ध )

विशुद्धस्यहि मे मृत्युः । पुत्रजन्मसमः किल ॥

—मृच्छकटिकम्

भावार्थः—मी निष्कलंक आहे तर मृत्यु हा मला पुत्रोत्सवच आहे.

त्याप्रमाणें पुण्यवंताला मृत्यु हा बागुलबोवा नसून आनंदच असतो. तेव्हां तो वार्धक्यासन्निध असला म्हणून वार्धक्य नीरस मानण्यास जागा नाहीं.

शरीरास जरा न येऊं देणें हें आपल्या स्वाधीन नाहीं; पण, मनाला जरा येऊं न देणें हें आपल्या हातचें आहे. असें असतांना, गेटी म्हणतो कीं, " पुष्कळ लोक राजपुत्र हॅमलेटप्रमाणें खिन्न व चिंतातुर असतात. बाकी राजपुत्राप्रमाणें त्यांचे मागें कांहीं भूत लागलेलें नसतें किंवा त्यांना पित्याचे मृत्यूबद्दल सूडहि घ्यावयाचा नसतो. पण त्यांचा स्वभावच तसा. शंभर दुःखोद्धार काढण्याचे श्रम करण्यापेक्षां एकवार मधुरस्मित करणें हें अधिक बरें ". शेक्स्पिअरचे ' ऍझ यू लाइक इट ' नामक नाटकांत, खेदी जेकीस रोझालिंडला म्हणाला, ' मी पुष्कळ फिरलों, त्यावरून मी या जगताविषयीं सर्वदा

खिन्न असतों'. त्यावर रोझालिंडनें खुबीनें उत्तर केलें, 'हं! एकूण जग हें खेदमय आहे हाच आपला अनुभव ना? आणि हा पैदा करण्याकरितां आपणास इतकी तंगडयातोड करावी लागली ऑं? धन्य आपली! असला अनुभव संपादण्यास यत्न करण्यापेक्षां, मी आपली एकाद्या मूर्ख नकल्याची संगत करून आनंदांत राहीन'.

लबक म्हणतो, मी एकंदरींत जरी सुखवादी आहें, तरी या जगांत म्हणजे सर्वच 'घी शक्कर' आहे, असें माझें म्हणणें नाहीं. त्यांत खारट तुरटहि आहेच. पोप कवि म्हणतो:–

(गीति)

एक सुखाचा, दुसरा दुःखाचा कुंभ ठेवुनी जवळी ॥
वाढी देव कुणातें सुखदुःखें शुद्ध; पुष्कळां मिसळी ॥ १

असें जरी आहे, तरी दुःखांत हें आहे कीं, सुखदुःखें अस्थिर स्वभावाचीं आहेत. गीतेंत भगवान् म्हणतात:—

(श्लोकार्ध)

आगमापायिनो भावा । स्तांस्तितिक्षस्व भारत ॥

भावार्थः—बाबारे, हे सुखदुःखदायक भाव येते जाते आहेत (कायम टिकणारे नाहींत) हें ध्यानांत घेऊन ते सहन कर, म्हणजे संपलें.

शिवाय, म्हण आहे:–चार महिन्यांचा उन्हाळा आणि घटकेचा पावसाळा! त्याप्रमाणें अल्प सुखहि दुःखाचा विसर पाडितें. कालिदास म्हणतो:

( श्लोकचरण )

क्लेशः फलेनहि पुनर्नवतां विधत्ते ।

—कुमारसंभवम्

भावार्थः—श्रमाचें चीज झालें म्हणजे ताजेपणा येतो.

एतावता, दुःख झालें तरी कायम निराश होण्याचें कारण नाहीं; व, बनेल तों, सुखांत दुःखाची मिसळ होऊं देऊं नये. दुसराहि एक विचार आहे. तो असा कीं, दुःख जर अपरिहार्यच असेल तर तें कुरकुरीनें सोसण्यापेक्षां आनंदानेंच सोसावें हें बरें. सुखें आणि दुःखें यांची खिचडी ठरलेलीच. मग तक्रारींत तरी जीव काय? पण, कांहीं लेखक दुःखाचे नांवानें जी कांहीं ओरड करितात ती कांहीं बेसुमार ! हे फक्त मिळवणीच जाणतात, वजाबाकी ओळखीतच नाहींत. केवळ दुःखाचे क्षण हिशोबांत धरितात व ओरडतात; पण त्यांत सुखाचा हिशोब वजा देत नाहींत. शिवाय, दुःखाचा हिशोब करण्यांत देखील लोक न्याय विसरून देवाचे नांवानें खडे फोडितात. कारण, न्याय पहातील तर त्यांस असें दिसून येईल कीं, त्यांवर येणाऱ्या शारीरिक व मानसिक दुःखांत स्वतःचें अनियमित किंवा आचरट वर्तन, संतापी स्वभाव, अनेक दुर्व्यसनें, यांपासून उद्भवणाऱ्या दुःखांचीच संख्या पंधरा आणे असते.

( श्लोक )

राग-शोक-परीताप-बंधनं-व्यसनानिच ॥
आत्मापराधवृक्षाणां । फलान्येतानि देहिनाम् ॥१

—हितोपदेश

भावार्थः--रोग, शोक, परीताप बंधन व व्यसनें हीं सर्व मनुष्यांनीं स्वतः लाविलेल्या अपराधरूपी वृक्षांचींच फळें होत.

हें म्हणणें सर्वथा खरें आहे. हे आपण दुष्कर्में करितात आणि देवाचे नांवानें ओरडतात. तुकोबानें म्हटलें आहेः—

( अभंग )

आपुला दुर्गुण लाविती पराला । नेणति आपुला दोष कांहीं ॥

यांतलाच हा प्रकार आहे. याखेरीज दुसरी गोष्ट म्हणजे पुष्कळदां आधीं जें दुःखसें दिसतें तें फलतः सुख असतें. उदाहरण, दारिद्र्याबद्दल मनुष्यें अति नाखुष असतात; पण, आपले कर्तबगारीनें उदयास आलेले लोकांचे इतिहास पाहूं जातां, यांतील बहुप्रमाण दारिद्र्यांत जन्मलेल्यांचें आहे. किंबहुना दारिद्र्यानें त्यांना या रूपास आणिलें असें म्हणणें गैर होणार नाहीं. आणि हें जर खरें, तर दारिद्र्य हें अपकारक कीं उपकारक ? पण मनुष्यें हा विचार करितात कुठें ? तिसरी गोष्ट, पुष्कळदां अविचारी मनुष्यें दोरीलाच साप समजून भ्यावें तशा प्रकारें काल्पनिक दुःखांनींच हैराण असतात.

(श्लोक)

शोकस्थानसहस्राणि । भयस्थानशतानिच ॥
दिवसे दिवसे मूढ । मा विशंति न पण्डितम् ॥ १

—महाभारत

भावार्थः—जो मूढ आहे त्याला आला तो दिवस हजारों शोकाच्या व भयाच्या जागा दिसतात. ज्ञात्याचें तसें नाहीं.

एक कवि म्हणतो, "करनिहतकंदुकसमाः पातोत्पाता मनुष्याणाम् ।" अर्थात्, मनुष्याची चेंडूप्रमाणें खालवर स्थिति होत असते. लेखक म्हणतो, आपले आयुष्यांत नानाविध गोष्टी एकच वेळीं होत असतात; कांहीं बऱ्या असतात व कांहीं वाईट असतात. म्हण आहे, "आजा मेला आणि नातू झाला". त्याचप्रमाणें एक सुख, एक दुःख, असें मिसळण असतें. निखळ सुख किंवा निखळ दुःख असें विरळा. कवीनें म्हटलें आहे:—"क्वचिद्वीणावादः क्वचिदपिच हाहेति रुदितं ।" कोठें मधुर वीणानाद, तर कोठें विलापस्वर ! तसाच प्रकार असणार. तेव्हां खरा सुखाचा मार्ग म्हणजे गीतेंत भगवंतानीं म्हटल्याप्रमाणें—

(श्लोकार्ध)

सुखदुःखे समे कृत्वा । लाभालाभौ जयाजयौ ॥

सुखदुःखांचें समीकरण करून चालावें हाच आहे. पण, हें समीकरण सिद्ध करण्याला थो-

डीशी तरी अक्कल लागते. तें बावळ्यांचें काम नाहीं. सिसिरो म्हणतो, "सुखी मूर्ख व दुःखी ज्ञाता हें मिळणेंच नाहीं". उपनिषदांत म्हटलें आहे:—"तरति शोकमात्मवित्"—ज्ञाता शोकातीत असतो.

लबक म्हणतो, इकडे अशी म्हण आहे कीं, 'आयरिश मनुष्य भांडत असला म्हणजे शांततेंत (समाधानांत) असतो; स्कॉच मनुष्य भोवंडत असला म्हणजे घरीं असल्यासारखा (सुखी) असतो; व इंग्रज कुरकुरत असला म्हणजे सुखांत असतो'! पण हा कुरकुरण्याचा आरोप केवळ आह्मां इंग्रजांवरच आहे असें नाहीं. व्हाल्टेअरनें एका पात्राचे तोंडून फ्रेंचांच्या असंतोषी वृत्तीबद्दल अशीच तक्रार केलेली आहे. दांतओंठ खात असतांना त्यांचें खरें बुद्धिवैभव दिसून येतें, असें त्याचें म्हणणें आहे.

कांहीं मनुष्यांचा स्वभावच असा दुष्ट असतो कीं, तुम्हीं सात सायास करा, त्यांना मिळून संतोष नाहीं. एक कवि म्हणतो:—

(श्लोक)

पतिरतीव धनी सुभगो युवा ।
परविलासवतीषु पराङ्मुखः ॥
शिशुरलं कुरुते भवनं सदा ।
तदपि सा सुदती रुदती कुतः ॥ १

भावार्थः—विचारीचा नवरा अतिशय संपन्न, देखणा व तरुण असून परस्त्रीकडे वांकडा डोळा देखील करीत नाहीं, स्वस्त्रीनिष्ठ आहे. बरें, घरांत सोन्यासारखा बालक खेळतो आहे. तरी पण, आमच्या ह्या सुंदरीला गोड मिळून लागत नाहीं. आपली मुळमुळ रडत असते, याला काय म्हणावें ?—हा स्वभाव.

एपिक्टेटस म्हणे, "मला एकान्त नको; कारण तो शून्यमय असतो. बरें, लोकान्तहि नको; कारण तेथें गोंधळ असतो"! अशा बाबाला खूष तरी कसें करावें ? 'वरमाते' बद्दलची हरदाशी नक्कल प्रसिद्धच आहे. कांहीं केल्या विहिणी खूष होतना. शेवटीं व्याह्यानीं काळोखांत चौदावें अर्पण केलें तेव्हां विहिणीचें पित्तशमन झालें. अशा मासल्याचीं दुराराध्य माणसें खरोखरच आढळतात. अशी आख्यायिका सांगतात कीं, प्रसिद्ध बापू-मेहेंदळे यांजकडे एक कानडा सावकार आपली लाडकी दुसरी बायको क्षयाचे पंथाला लागली म्हणून उपायासाठीं आला. बापूनीं प्रकृति पाहून तिला लावून दिली व पश्चात् त्या सावकारास म्हणाले, हिचा रोग विलक्षण आहे. हिचे हाताखालीं चाकरमनुष्य टिकत नसावासें वाटतें, खरें काय ? सावकार हंसून म्हणाला, होय. बापू म्हणाले, तर मग सांगतों, उपाय हा करा. आपली मोहना राणी रुष्ट होऊन बसली म्हणजे हिला मुक्तहस्तानें चौदावें रत्न अर्पण करीत

जा, म्हणजे ही षण्मासाचे अंत महिषीतुल्य होईल. सावकारानें तसें केलें व बापूंचें भविष्य खरें झालें. एपिक्टेटस म्हणतो, "तुला सुख व्हावें म्हणून जग तुजसारखें होईल ही आशा व्यर्थ आहे. त्यापेक्षां तूंच जगासारखा हो म्हणजे सुखाला वाण नाहीं ". म्हटलें आहे—" उपानद्गूढपादस्य ननु चर्मावृतेव भू: " म्हणजे स्वत:चे पायांत चढाऊ असला म्हणजे कंटकवनांतहि रुजामाच आहे. तसें आपण समाधानी वृत्ति ठेविली म्हणजे सुखाला केव्हांहि दुकाळ नाहीं. इरसाल आंबा झाला तरी साल तुरट असते; बरें, निवडुंगाचेंहि बोंड गोड असतें. एतावता, निर्भेळ सुख किंवा निर्भेळ दु:ख असें कचित्. म्हणून कांहीं असलें तरी गोड करून घेण्याची करामत संपादावी म्हणजे सुखाची महागाई राहणार नाहीं. कदाचित् राहिली तरी, आक्रोश करण्यांत कोणता फायदा ? त्यापेक्षां ती निमूट सोसल्यास अधिक सह्य व क्षेमकर होईल. 'गोड करून खावें व मऊ करून निजावें' हेंच शहाणपण.

लोकयात्रा ही एक मोठी अवघड गोष्ट आहे, हें जाणून सावधगिरीनें चाललें पाहिजे हें खरें; परंतु अवघड झाली म्हणून दु:खमय आहे असें मानण्यांत शहाणपण नाहीं. शिवाय, खरें बोलूं जातां, तींतील पुष्कळशीं दु:खें आपले कृतीचीं

असतात; आणि बहुतेक सुखें ईशदत्त असतात. परंतु माणसाची बोली उफराटी असतेः 'चांगल्या गोष्टी किंवा सुखें संपादिलीं तीं मीं; आणि दुःखें तेवढीं देवानें धाडलीं '. ही भाषा देवाला कशी खपावी ? अडाम आणि ईव्ह यांना आनंदवनांतून काढून दिलें, तरी त्यांचा दोष देवाकडे नव्हता हें सुप्रसिद्धच आहे. आणि हाच न्याय आपणा बहुतेकांस लागू आहे.

पुष्कळांचा समज असा आहे कीं, सुखाचा काळ मागेंच गेला; हल्लींचा कलिकाळ हा काळच दुःखाचा, तेथें काय उपाय ? पण, ट्राहर्नी म्हणतो, " आदिपितरें दिव्योद्यानांत असतांना तारे जसे चमकत होते तसेच ते आजहि आहेत; सूर्यहि तसाच प्रकाशत आहे; व समुद्रहि तसाच शुद्ध व परिपूर्ण आहे. मग आज बदल तो कोणता झाला ? सृष्टीचें स्वरूप पुराणकालीं तेंच आज आहे, मनुष्याची नीति मात्र बिघडली आहे. आणि यामुळेंच हा काळ फिरलासा भासतो. जर शांति, व्यवस्था, प्रेम ह्या गुणांचा उत्कर्ष असेल तर आजचाहि काळ आनंदमयच आहे. परंतु आजकाल पहावें तों लोभ, मत्सर, परस्वापहार, जुलूम, चैन, हांवरेपणा, अहंकार इत्यादि अनेक दुर्गुणांचा फैलाव झाल्यामुळें, जगांत तंटेभांडणें, लढाया, रक्तपात, देशोद्वासन इत्यादि अनर्थ मा-

जून जगत् हें कंटकवनसें भासूं लागलें आहे. त्यांत नवल तें कोणतें? एक राजा पांच लक्ष शिपाई राखितो तर दुसरा दहा लक्ष. हे कशाला, एकमेकांचे मानेस बसावयालाच ना? शिव शिव! मनुष्यांनो, तुमची करणी थड नाहीं, देवावर कां रुसतां" ?

पुष्कळदा वाइटांतून बरें निपजतांना आपण पाहतों. कोणाहि व्यक्तीची स्वातंत्र्यहानि हा मोठाच अनर्थ खरा; तथापि, इतिहास पहावा, तों कांहीं कांहीं अलौकिक ग्रंथ त्यांचे लेखक कारागृहांत असतांना, किंबहुना पडल्यामुळेंच, लिहिले गेले. अर्थात्, एथें हा अनर्थच उपकारक झाला.

कित्येक वेळा मुळावर कांहीं नसतां मनुष्य काल्पनिक दुःखानेंच गांगरून जातात. प्रत्येक वाचकाला अशा मासल्याचा थोडा तरी अनुभव असेल. 'अमुक गोष्ट अशीच नसेलना?' अशी मनच उत्प्रेक्षा घेऊन आपल्याशींच खिन्न बसतें; व अखेर पहावें तों कशास कांहीं ठिकाण नसतें. कित्येक माणसांचा स्वभावच असा असतो कीं, इवल्या तिवल्या गोष्टीला तीं असें बाळसें आणून दाखवितात कीं, राईचा केवळ डोंगर करून सोडितात, व दुसऱ्याला घाबरून टाकितात. शिवाय, एकादी वस्तु न्याहाळीत जावें तों तों अधिकच भ्यासूर दिसूं लागते. तसाच प्रकार दुःखांचा होतो; त्यांचा विचार करावा तों तों तीं अधि-

काधिकच भिववितात. याकरितां त्यांकडे ढळतीच नजर ठेवावी, हें बरें. नूरजहानसारखीचा गोंडस हात आपण जर दुर्बिणीनें पहिला तर कासवाचे पाठीसारखा खरबरीत व हिडिस दिसेल. तेव्हां तो दुरून पाहून नेत्र निवविणें हेंच शहाणपण.

मृत्यु म्हणजे दुःखाची कमाल बेरीज असें मानितात, पण आपला प्रियकर देवासन्निध गेला असल्यास त्यांत खेदावह तें काय ? आमचे गांवीं एका ऐशी वर्षांचे वृद्धांची अर्धांगी देवलोक झाली, तेव्हां ते अत्यंत विलाप करूं लागले. आह्मीं म्हटलें, लखु दादा, काकूंचें सोनें झालें, मग रडतां कां ? ते म्हणाले, तें खरें रे, पण मला......अपस्वार्थी जगांतल्याच माणसाचें उत्तर तें, तसेंच असावयाचें. लबक म्हणतो,

मी ज्याचे त्याचे जात-मृत्युबद्दल बोलतों. इष्टमित्रांचे मृत्यूबद्दल बोलत नाहीं. जीवित जर दुःखमय असेल तर मृत्यु ही इष्टापत्तीच आहे. बरें, मृत्यु जर अनर्थावह असेल तर जीवित सुखावह म्हटलें पाहिजे. आणि माझें मतें जीवित बहुधा सुखावहच असतें. आपणच नाश केला तर गोष्ट निराळी.

मनुष्याचा स्वभाव असा आहे कीं, वस्तु जोंपर्यंत प्राप्त आहे तोंपर्यंत तिची तो अवगणना करितो आणि ती नष्ट झाली म्हणजे मग दीर्घ विलाप

मांडितो. एकादा गृहस्थ आपल्या साध्वी पत्नीला छळून छळून घेतो; आणि ती मेल्यास अश्रू ढाळीत सुटतो. असे मासले अश्रुत नाहींत. भर्तृहरि म्हणतातः—

(श्लोकचरण)

कुत्स्याः स्युः कुपरिक्षका न मणयो यैरर्घ्यतः पातिताः ।

भावार्थः—रत्नाला गारगोटी म्हणणारे कुत्सित; रत्न कुत्सित नव्हे.

जीवित वाईट नव्हे; त्याचे निंदक तेच अपात्र.

सेंट पॉल म्हणतो, "मला दारिद्र्याची खंतच नाहीं. कारण, प्राप्त असेल त्यांत तृप्त राहण्याची खुबी मला साधली आहे. पदार्थांची प्रथम इच्छा धरून नंतर तिच्या पूर्तीनें तृप्ति साधण्यापेक्षां इच्छाच नसणें हें अधिक सुखावह नव्हे काय ? कारण, इच्छेची पूर्ति त्रिभुवनाचे प्राप्तीनें देखील होणारी नाहीं". त्यापेक्षां कवीनें म्हटलें आहे कीं, "सर्वाः संपत्तयस्तस्य । संतुष्टं यस्य मानसं ॥" म्हणजे ज्याचें मन संतुष्ट त्याला सर्वच संपत्ति आहे, तेंच खरें. मनुष्य संतोष न ठेवील, तर जन्मपर्यंत त्याची ददात मिळून संपावयाची नाहीं. मेरिआ थेरिसा मरतां मरतां म्हणाली, "आज काय ती मी सुखी आहें"!

उद्योगाची खरी रीत म्हणजे अशी कीं, कोणत्याहि कामीं आपले यत्नाची शिकस्त करून

सोडावी, आणि मग शांतपणें फलाची प्रतीक्षा करीत रहावें. उतावीळ करूं नये; त्यापासून कांहीं फायदा नसतो. म्हण आहे, "बरें करावें आणि वाटेवर ठेवावें". त्याप्रमाणें आपलें कर्तव्य करून स्वस्थ असावें. फल होणें तें यथा-काल आपेंआप होईलच. भगवंतानीं जसें म्हटलें आहे कीं, "नहि कल्याणकृत् कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥" म्हणजे "बाबारे, बरें काम करणारा कधीं दुर्गतीला पोंचणार नाहीं". त्याच-प्रमाणें जशी कृति तसें फल होतेंच होतें. त्याची चिंता करणें वृथा आहे. प्रत्येक उद्योगी मनुष्य लक्षाधीशच होईल असें जरी नाहीं, तरी उपाशीं खास मरणार नाहीं. सेंट पॉल म्हणतो:-"अन्न आणि आच्छादन असलें म्हणजे आणखी काय पाहिजे"? संतोष असला म्हणजे त्यांतच श्रीमंती आहे. भर्तृहरींनीं म्हटलें आहेः—

(श्लोकार्ध)

स तु भवति दरिद्रो यस्य तृष्णा विशाला ।
मनसिच परितुष्टे कोऽर्थवान् को दरिद्रः ॥

भावार्थः—ज्याची धांव अनावर तो दरिद्री; मन सं-तुष्ट असल्यावर दरिदी आणि श्रीमंत सारखाच.

सिनेका म्हणतो, "निर्वाहाला अत्यावश्य म्हणून पहातां फारच थोड्या गोष्टी असतात". शिकंदर बादशहानें एक साधु पाहिला तो एका

लांकडी टिपांत निजून होता. तेंच त्याचें घरदार. बादशहा त्याला कांहीं देऊं लागला; पण तो म्हणाला, मला तुझेसारख्याची जरूर नाहीं. मला सर्व अनुकूल आहे. मीहि राजविलासांत आहें. भर्तृहरि म्हणतातः—

( श्लोक )

मही रम्या शय्या विपुलमुपधानं भुजलता ।
वितानंचाकाशं व्यजनमनुकूलोयमनिलः ॥
स्फुरद्दीपश्चंद्रो विरतिवनितासंगमुदितः ।
सुखं शांतः शेते मुनिरतनुभूतिर्नृप इव ॥ १

भावार्थः–धरणी ही रम्य शय्या आहे. हात ही नरम उशी. आकाशाचें वर छत ताणलें आहे. वायूचा पंखा आयताच फिरतो आहे. चांदोबा हा विजेचा दिवा लखलखतो आहे. आणि उपरति हीच सुंदरी बरोबर घेऊन मुनि हा वैभवशाली राजाप्रमाणें चैनींत झोंपीं जातो.

केवळ निर्वाह पाहिला तर त्याला लागणाऱ्या गोष्टी अन्न, वस्त्र, पाणी व छाया एवढ्याच आहेत. व ह्या थोड्या श्रमानें सर्वत्र प्राप्त असतात. परंतु, मनुष्याच्या चवाढवा अतोनात वाढल्यानें, ताप वाढला आहे. खाण्यांत त्याला चुरचुरीत फुरफुरीत पाहिजे; अंगावर दागदागिना, तलम कपडा; बसण्याला गाडी पाहिजे, घोडा पाहिजे; छानछोक, हातरुमाल, सुरंगी अत्तर, एकनी दोन; पूर्ति मिळून नाहीं. आणि या कारणानेंच ददात संपत नाहीं व तिडका थांबत नाहींत. आपले येथें गेले

पिढीचा कपड्यांचा खर्च व चालू पिढीचा खर्च पाहिला म्हणजे आमचे म्हणण्याची सत्यता ध्यानांत येईल. ज्या ठिकाणीं पूर्वीं एक शिंपी होता, तेथें आतां एकवीस शिंपी आहेत, असें आह्मी पाहतों. बरें, एवढे कपडे घालून राखलेलें शरीर पहावें तों दुघडी धोतर पांघरणाऱ्या आमच्या आजोबांचे चतुर्थांश देखील नाहीं. मग इतके खर्चानें कपडे करून केलें काय? तर जिनगरी बाहुल्या सजविल्या, आणि आयुष्याची भगभग मात्र वाढविली! याहून मूढत्व तें कोणतें?

पूर्व वयांत काटकसरीनें राहून उत्तर वयासाठीं द्रव्यसंग्रह करून ठेवणें हें मनुष्याचें उचित कर्तव्य आहे. म्हटलेंच आहे:—"पूर्वे वयसि तत्कुर्यात् येन वृद्धः सुखं वसेत्।". पण द्रव्यसंग्रहापेक्षांहि सुविचारसंग्रह करणें हें अधिक अगत्याचें आहे. सुविचारानें शांति येते. व वृत्ति शांत व समाधानी असली म्हणजे आनंदाला तोटा नसतो. जॉन टॅब म्हणतो:——

( आर्या )

**संतोष** मित्र माझा, भार्या **शांती**, उदंड सुखदाती ॥<br>
**आनंद** पुत्र तैसा, मज वाटे स्वर्ग यापुढें कमती ॥ १

कसाहि प्रसंग येवो, मनुष्यानें खेद करूं नये; प्रसंगाशीं कंबर बांधून झुंजावें. कंबर खचून बसलें कीं तो अधिकच उरावर बसतो. प्रसंगाला भिऊन

जाण्यांत कांहीं फायदा नाहीं. म्हण आहे—' भित्या पाठी ब्रह्मराक्षस '. म्हणून, प्रसंगाला धैर्यानें तोंड द्यावें; म्हणजे परमात्मा साह्य होऊन संकट दूर होतें. " हिंमत मर्दा, तो मदत खुदा " ही म्हण लक्षांत वागवून धैर्यानें वागावें, म्हणजे संकटाचा परिहार होऊन शांति मिळेल.

( श्लोक )

स एव धन्यो विपदि । स्वरूपं यो न मुञ्चति ॥
त्यजत्यर्ककरैस्तप्तं । हिमं देहं न शीततां ॥ १

—सुभाषित

**भावार्थः**—जो आपत्कालींहि आपलेपणा सोडीत नाहीं, तोच धन्य. पहा बरें, सूर्य किरणांचा ताप झाला असतां बर्फ मुळींच देहत्याग करितें, पण आपला शीतपणा सोडून कधीहि वेगळें रहात नाहीं.

( आर्या )

आपत्स्वेवहि महतां शक्तिरभिव्यज्यते न संपत्सु ॥
अगुरोस्तथा न गन्धः प्रागस्ति यथाग्निपतितस्य ॥ १

—सुभाषित

**भावार्थः**—महात्म्याचें खरें सामर्थ्य आपत्कालींच प्रकटत होतें, संपत्कालीं तसें होत नाहीं. मलयागुरूचा विस्तवांत टाकिल्यावर जसा सुगंध उठतो, तसा एरव्ही उठत नाहीं.

# प्रकरण ६

## आपत्ति

( श्लोक )

संपत्सु महतां चित्तं । भवत्युत्पलकोमलं ॥
आपत्सुच महाशैलशिलासंघातकर्कशं ॥ १

—भर्तृहरि

भावार्थः—थोरांचें चित्त संपत्कालीं कमलाप्रमाणें कोमल असतें. पण, आपत्कालीं तें गिरिशिलेप्रमाणें कठीण होतें.

संसार हा असला कांहीं विचित्र आहे, त्यांत हमेष नसत्या नसत्या भानगडी व उलाढाली इतक्या उत्पन्न होत असतात, कीं, त्यांत स्थित्यंतरें किंवा दुर्दैवाचे घाले आपण मुळींच येऊं देणार नाहीं, असें कोणी म्हणेल तर तें शक्यच नाहीं. संसार म्हटला म्हणजे संकटेंहि ठरलेलींच. आतां, संकटांत मात्र जाती आहेतः—( १ ) कांहीं खरीं असतात, व ( २ ) कांहीं तशीं भासतात मात्र. या दुसरे प्रकारचे संकटांचे पुढील प्रमाणें सहा पोटवर्ग आहेतः—( १ ) सूचनार्थक ( २ ) परीक्षार्थक ( ३ ) काल्पनिक किंवा क्षुद्र ( ४ ) स्वकृत अथवा आत्मनिर्मित ( ५ ) दंडार्थक ( ६ ) आच्छन्न.

### १. सूचनार्थक संकटें

बहुधा जगांत दुःख येतें तें कृतकर्मांचे दण्डार्थ असतें किंवा आगामि संकटांचें परिहारसूचक असतें. 'पुढल्यास ठेंच, मागला शहाणा'; अर्थात् एकाचें दुःख दुसऱ्याचे सुखाला कारण झालें. लवक म्हणतो, दुःखांनीं व संकटांनींच आह्मांला इतकें शहाणें केलें आहे. हीं संकटें नसतीं तर, आह्मी मूढ व गैरसावध राहून केव्हांच नामशेष झालों असतों. पण हीं संकटें आह्मांला टक्कर देऊन घट्टमुट करितात आणि त्यामुळेंच आह्मांला असल्या अनर्थप्रचुर जगतांत टिकाव धरून राहतां येतें. त्यांचे पायींच आह्मी आत्मरक्षणाचे अनंत उपाय शोधून काढितों व दक्ष राहतों. * व्यापारांत अल्पस्वल्प फसगत झाली असतां, व्यापारी लोक म्हणतात, जाऊं द्या कीं, थोडक्यांत अक्कलच विकत घेतली. हें म्हणणें अक्षरशः खरें आहे.

## २ परीक्षार्थक संकटें

संकटांचा दुसरा वर्ग म्हणजे परीक्षार्थ आलेलीं संकटें होत. परमेश्वर पुष्कळ वेळा मनुष्याचें सत्त्व पाहण्यासाठींच संकटें पाठवीत असतो. प्रल्हाद, ध्रुव, हरिश्चंद्र, नळ वगैरे पुरुषांवर संकटें न येतीं तर त्यांची खरी किंमत दुनियेपुढें कधीं

* इंग्लंड सर्वोत्कृष्ट दर्यावर्दी झालें, याचें कारण त्याचे दाराशींच आ पसरणारा महाकाळ–दर्या आहे हेंच होय.

न येती. अर्थात् संकटांनींच अशांना अन्नूस चढविलें हें निर्विवाद. व अशीं संकटें धाडण्यांत परमेश्वराचा हेतु सदयच असतो हें उघड आहे. 'दारिद्र्यं परमांजनं' म्हणून एक म्हण आहे, ती खोटी नाहीं. सत्ता व वैभव मनुष्याला उन्मत्त व अंध करितात. लवक म्हणतो, रोमचे गादीवर जे अतिदुष्ट राजे बसले, त्यांचे डोळ्यांत जर दारिद्र्यांजन पडतें तर ते खचित भले झाले असते. फ्रेंच भाषेंत म्हण आहे कीं, " आपत्ती सुमनुष्य करिते व संपत्ती राक्षस करिते ".

आपत्तीचा दुसरा फायदा म्हणजे मित्राची परीक्षा.म्हटलें आहे–"आपत्सु मित्रं जानीयात् भार्यांच विभवक्षये ॥" म्हणजे मित्राची खरी परीक्षा आपत्कालीं व स्त्रीची परीक्षा गरीबी आली असतां होते. फ्रेंच म्हण आहे कीं, " संपत्ती मित्र मिळवी । आपत्ती पारखी तयां ॥ " ती खरी आहे. आपत्तीनें कधीं कधीं खरेखरे स्नेही असतील तेच एकत्र रहातात; व ढोंगी झाडले जातात. ज्यांच्या अंगांत खरी लायकी असेल असे मित्र आपत्ती आपले निदर्शनास आणिते. आपत्तीचे मुशींत हीण कोणतें व स्वर्ण कोणतें हें तेव्हांच वेगळें दिसतें. राष्ट्रीय कामांत देखील आपत्तीनें सजातीय प्रवृत्तीचे लोक वेंचके पुढें येऊन एकदील होतात. हा आपत्तीचा उपकारच आहे.

रात्रीचा अंधार जसा जसा अधिक गडद होत जातो तसतशीं नक्षत्रें ज्यास्तीच झळकूं लागतात. घनपटलानें आकाशाला शोभा चढते. मोठमोठ्या उद्योगी शहरांत धुकें * व धूर यांनीं दिवसभर वांबाळ पडते; आणि ज्यांना कोणत्याहि स्थितींत वृत्ति आनंदित ठेवण्याची मख्खी साधली नसेल, अशांना उदासीनता येते. परंतु दिवसास जेथें असें हवामान असतें, तेथें सूर्यास्तसमय फारच रमणीय असतो; व जे अवलोकनशील आहेत अशांना तो पाहून फारच सुख होतें.

सैतानानें एकदां जॉबची छळणा मांडिली; व त्याचा परिवार व संपत्ती हीं हरण केलीं. जॉबला पुष्कळसे मुलगे व मुली होत्या. त्याजपाशीं सात हजार बकऱ्या, तीन हजार उंट, पांचशें बैल-जोड्या, पांचशें गद्ध्या, व अनेक नोकरचाकर असा परिवार होता. सैतानानें हा सर्व हरण केला. परंतु जॉबनें न डगमगतां, लंगोटी फाडून व डोकें मुंडून, गुडघे टेंकून देवाची प्रार्थना केली कीं "देवा मी उघडा नागवा या जगांत आलों; आणि आतां तसाच परत जाणार. त्यांत खेद तो काय ? आजपर्यंतचें वैभव तूंच दिलें होतेंस, आतां तुझें तूंच नेलेंस. तुझी मर्जी! माझी कांहीं फिर्याद नाहीं. तुझा जयजयकार असो, एवढी

---

* ही गोष्ट विलायतेसारख्या थंड प्रदेशांतली आहे.

माझी इच्छा आहे ". अखेर त्याचें वैभव त्याला परत मिळालें. किंबहुना पहिल्याहूनहि अधिकच मिळालें. पण त्याचेंहि त्याला काय ?

( श्लोक )

उदये सविता रक्तो । रक्तश्चास्तमने रविः ॥
संपत्तौच विपत्तौच । महतामेकरूपता ॥ १

—सुभाषितसंग्रह

भावार्थः—सूर्य जसा उदयकालीं तसाच अस्तसमयींहि रक्तवर्णच असतो. ठीकच; जे खरे थोर असतात, ते संपत्तींत व विपत्तींत एकरूपच असतात.

हें जग असें आहे कीं, त्यांत एवढ्या येवढ्या अपयशानें खट्टू होऊन जो खालीं बसला, तो साफ बुडाला. अत्यंत दिव्यवक्ता जो प्रो० हक्स्ले याची आरंभीं आरंभीं कोण फजिती ! त्याचें रॉयल इन्स्टिटयूशन (राजभवना)मध्यें पहिलें व्याख्यान झाल्यावर त्याला एक निनांवी खासगी पत्र आलें कीं, ' मेहेरबान, आपण विद्वान् असाल; पण व्याख्यानाचें साहस करूं नका. आपण त्या कामीं फुकट आहां '. पुनः त्यानें ' प्राणी व वनस्पति यांचा अन्योन्य संबंध ' या विषयावर व्याख्यान दिलें; तेंव्हांहि अशीच टर उडाली. परंतु गाजीनें निश्चय सोडला नाहीं. त्यामुळेंच तो अखेर सोज्वळ वक्ता झाला. डिझ्रायली यानें हौस आफ कामन्स ( लोकसभे ) मध्यें जें पहिलें भा-

षण केलें त्याचा असाच बोऱ्या उडाला. परंतु, अभ्यासानें तोच अमोघवक्ता झाला. म्हणच आहेः–" अभ्यासः कर्मणां सम्यक्। उत्पादयति कौशलम्॥ "–म्हणजे अभ्यासानें कोणत्याहि कामीं कुशलता येते. यास्तव फजीती झाली तरी पाठ सोडूं नये. विघ्नें आलीं तर त्यांना न भितां, त्यांचे डोईवरून वाट करीत राहिलें पाहिजे; म्हणजे तींच भिऊं लागतात.

### ३. काल्पनिक किंवा क्षुद्र संकटें

कांहीं लोकांना सापसाप म्हणून दोरी धोपटण्याची संवयच असते. एवढ्यातेवढ्यावरून त्यांचा जीव जसा उडून जातो. पहावें तों ठिकाणीं कांहीं नसतें. फुसक्या कारणानें ते बेजार होतात. नजरेस कोळी पडला असला तर पुरापूर न पाहतां, ' विंचू विंचू ' म्हणून घर दणाणवून सोडतात. असे बेवकूब कांहीं लोक आहेत. मिसेस ब्रौनिंग म्हणते:—

( श्लोक )

नसे कीर्तिहानी नसे प्रेमभंग।<br>
फुका अश्रु कां गाळितोशी सवंग॥<br>
म्हणे चाललों बोललों आज फार।<br>
हवा सूटली झोंवते थंडगार॥ १

अशा नमुन्याचे शेंदाड शिपाई दुनियेंत खरोखरच आढळतात. अशांनीं काय करावें? मनुष्य रेंख्या पाहिजे! संकटापायीं कार्याची चिकाटी

सोडणें वेडेपण आहे. लिओनार्डो डी. व्हिन्सी म्हणतो, " संकटाला भिऊन मनुष्यें आपणास अधिकच विपत्तींत पाडितात ". एक इंग्रज कवि म्हणतो:--

( श्लोक )

सौख्याभावे न दुःखी; परि अवगणिती लोक गर्वे सुखाला ।
ज्यातें संतोष संज्ञा असुनि रुचतसे वेष साधा जयाला ॥
तो वाटे तुच्छ त्यांतें; म्हणुनि त्यजुनि या दीर्घ यत्ना करीती।
तेणें सौख्या मुकोनी उलट अबुध ते क्लेशतापा वरीती ॥१

पुष्कळदां संकटाचे भयानेंच संकट दुणावतें. एक बाई साप पाहून जी पळत सुटली ती मागच्या मागें विहिरींत पडून मेली! याचप्रमाणें आपलीं अर्धीं अधिक दुःखें स्वकृतच असतात. कांहीं लोकांना दमडीचें औषध सांगितलें असतां तें अल्प किमतीचे एवढ्यास्तवच त्याचा ते अनादर करितात. मग अशा मूर्खांना जेव्हां एकादें बहुमोल नांव सांगावें तेव्हां त्यांचा संतोष होतो. हाच मासला सुखाचे निवडणुकींत आहे. सुख सुलभ आहे एवढ्याचसाठीं कोणी कोणी त्याचा अव्हेर करितात. काशींत कोणी सहा सहा महिने गंगास्नान करीत नाहींत; आणि रामेश्वरापासूनचे लोक जीव टाकीत काशीला जातात. असा या जगाचा चमत्कार आहे.

## ४. स्वकृत संकटें

आपणांवर येणारीं बरींचशीं संकटें आपणच

निर्माण करितों. रूसो म्हणे, "मृगजळाचे मागें धांवत जातांना आपण खऱ्या डोहांत मात्र पडून कधीं-कधीं प्राणास मुकतों". व्याधी, प्रियजनवियोग, अपघात, उत्पात इत्यादिक जे आयुष्यांतील अ-परिहार्य संकटविषय आहेत, ते विरळागतच असतात. पण, आपण बहुधा स्वतःचा अत्या-चार, अधीरता किंवा अविचार यांच्या योगानें मात्र सदासर्वदा आपणावर दुःखें ओढून आणीत असतों, याला कोण काय करील?

आपणास परमात्मानें जन्मास घातलें तें केवळ खावें, प्यावें, व चैन करावी, एवढ्यासाठींच घातलें, असें पुष्कळ लोक मानितात; एथेंच त्यांची चूक आहे.

(श्लोकार्ध)

परोपकारार्थ शरीर हें दिलें।
न सौख्यभोगार्थ सदैव योजिलें।

—टॉमस आ केंपिस

म्हण आहे, 'काट्याचा नायटा करणें', त्या-चप्रमाणें मनुष्यें स्वदोषानें पशाचें पायलीवर नेतात. डिसिआर्कस यानें मागेंच एक स्वतंत्र ग्रंथ लिहून असें सिद्ध केलें आहे कीं, जगतांत जळप्रळय, सांथी, जनपदविध्वंसन, ईती, इत्यादि अनर्थांनीं जी कांहीं प्राणहानि झाली आहे, तिज-पेक्षां बहुत पटीनें अधिक प्राणहानि राजद्रोह, ल-

ढाया, मारामाऱ्या इत्यादि मनुष्यकृत अनर्थांनीं झाली आहे!

संकटें वाढविण्याचा दुसरा एक प्रकार जगांत आहे. तो प्रकार म्हणजे 'नसत्या उठाठेवी' किंवा 'अव्यापारेषु व्यापार' हा होय. बायका म्हणत असतात, 'कांग बाई रोड ?— तिला गांवाची ओढ' तशांतलाच मासला पुष्कळांचा असतो. आपला धंदा सोडून ते लष्कराच्या भाकरी भाजीत बसतील आणि मग त्रास झाला म्हणून शंख वाजवतील! बेगेहाट म्हणे:— "अमक्याचा धंदा बसला, याचें कारण तो आपलेच दुकानांत बसून राहिला नाहीं, हेंच होय".

सालोमन म्हणे, "कलहपराङ्मुख असणें हें मनुष्यास भूषण आहे; पण मूर्खांना विकत श्राद्ध घेतल्याशिवाय चैनच पडत नाहीं. पदरांत विस्तव घेऊन भांडणारीं कांहीं माणसें जगांत आहेत, हें पाहून हंसू येतें". थॉमस आ केंपिस म्हणतो, "आपण कोणाचे वाटेस गेलें नाहीं, म्हणजे आपलेहि वाटेस दुसरा कोणी जात नाहीं". बाकी हें सर्वथाच खरें नव्हे. भल्यावरहि अकारण भुंकणारे नीच श्वान जगांत आहेत. तथापि, अशांचेहि नादीं न लागल्यास तेहि अखेर गप्प होतात.

### ९. दंडार्थक संकटें (प्रायश्चित्तें)

स्वकृत दोष किंवा पातकें यांबद्दल दंड

म्हणून कांहीं दुःखें प्रत्येकास भोगावीं लागतात. पण, हीं न्यायागत समजून आनंदानें भोगणें हेंच भलेपण आहे. त्यांबद्दल वाईट वाटून घेणें बरोबर नाहीं. शिवाय, दारिद्र्य, अनारोग्य, विपत्ति यांनीं आयुष्य इतकें कष्टप्रद होत नाहीं; पण अहंकार, हावरेपणा, आपमतलब, दुराचार यांनीं मात्र तें दुःसह होतें, हें खास. आणि हे सर्व स्वदोषच आहेत, त्या अर्थीं ते टाळणें आपलें काम आहे.

### ६. आच्छन्न संकटें ( सुखें )

कांहीं गोष्टी वरकांतीं पहातां क्लेशावह भासतात; परंतु, वास्तविकपणें अंतर्यामीं त्या कल्याणकारक असतात. संकटांस धैर्यानें तोंड दिल्यानें व तीं धिमेपणें सोसल्यानें आपली तितिक्षा वाढते. हिमकालांतील थंडीचा कडाका जीवांना बाह्यात्कारीं हूहू करावयास लावतो, व यामुळें दुःखद वाटतो; परंतु, उभ्या वर्षांत शक्तिसंचयाला अनुकूल असा काल हाच असतो. याच कालांत अग्नि सहज दीप्त असतो; व म्हणूनच चमचमीत तूपाखिचडी अंगीं लागते. म्हटलेंच आहे, " हिंवाळा भोगी, पावसाळा रोगी आणि उन्हाळा जोगी ".

बेकन म्हणतो, " संपत्ती ही देवाची शिळी देणगी आहे; पण विपत्ती ही त्याची ताजी दे-

णगी आहे ". संपत्तीनें मनुष्य शिळा किंवा ढिला पडतो; विपत्तीनें ताजा तरतरीत रहातो. म्हणूनच धर्मराजानें 'आह्मांस सदैव विपत्तीच असो ( विपदः संन्तु नः शश्वत् )' हें मागणें मागितलें. सिनेका म्हणतो, " प्रथम ज्याला संपत्तीनें नाजूक बनविलें नाहीं, तो मनुष्य विपत्तीला दाद देणार नाहीं ". विपत्तीरूप हिमाच्या कडाक्यानें अशा मनुष्याचें पाणी फारतर वरकांतीं थिजलेंसें दिसेल; परंतु अंतर्यामीं तें अधिकच प्रसन्न व निर्मळ होऊन राहील, हें खास. समृद्धीनें या जगांत जितका खराबा केला आहे, तितका विपत्तीनें केला नाहीं. आणि म्हणूनच सदय परमेश्वर कधींकधीं आमच्या इच्छा पूर्ण करीत नाहीं. ज्यांना खायला प्यायला नाहीं, अशीं पोरकीं पोरेंच, लक्ष्मीपुत्रांपेक्षां अधिक उदयास येतात. एक म्हण आहेः—' अल्ला जो बूरा करता है वो भलेके वास्ते करता है ' हिचें खरेपण पुष्कळदां अनुभवास येतें. यासाठीं भाविकांनीं परमेश्वराची नित्य प्रार्थना करितांना 'तुला रुचेल तें कर' असेंच म्हणत रहावें, म्हणजे " तोचि कृपानिधि वारील सांकडें " ।

चीनचा तत्त्ववेत्ता लोझे म्हणेः—" प्रभंजन झाला तरी सकाळापुढें बंद पडतो, शुंडाधार पर्जन्य असला तरी अस्तमानीं खळतो. ही जर म-

हांभूतांच्या करणीची अशाश्वती आहे, तर मनुष्यकृतींची किती तरी अधिक असेल हें उघडच आहे ". म्हणूनच शहाण्यानें कसेंहि संकट आलें तरी निराश होण्याचें कारण नाहीं.

( आर्या )

छिन्नोऽपिरोहति तरुर्भूयः क्षीणोऽपि वर्धते चंद्रः ॥
इति विमृशंतः संतः संतप्यन्ते न लोकेऽस्मिन् ॥ १

—भर्तृहरि

भावार्थः—तोडलेला वृक्ष पुनः वाढतो; क्षीण चंद्र पुनरपि पूर्ण होतो. हा जगतांतील प्रकार पाहून, शहाणे लोक संकटांत क्लेश मानीत नाहींत.

हाच कवि अन्यत्र म्हणतोः—

( श्लोक )

पातितोऽपि कराघातैरुत्पतत्येव कंदुकः ॥
प्रायेण साधुवृत्तानामस्थायिन्यो विपत्तयः ॥ १

भावार्थः—चेंडू हातानें आपटावा तों अधिकच उशी घेऊन उठतो. एवंच, गुंड मनुष्य संकटांत पडून रहावयाचा नाहीं.

प्रसंगवशात् पाऊल पुढें पडतच नाहीं, असा प्रसंग आल्यास कालापेक्षा करून असावें पण दुःख करूं नये; हतधैर्य होऊं नये.

जेरमी टेलर म्हणेः—" आशा आणि उपवास हे उपासनेचे दोन पंख आहेत. यांपैकीं उपवास हा पंख साध्या पांखराचा आहे; परंतु आशा हा पंख देवदूताचा आहे. त्याची गति थेट परमे-

श्वरापर्यंत असल्यानें आपली विनंति देवापर्यंत पोंचते. ईश्वराचे कृपालुतेचा विश्वास नसेल तर त्याची उपासनाच शक्य नाहीं. तोच विश्वास असला म्हणजे आपली उपासना समंजस, उत्कट, व भाविक अशी होते. देवावर जसा विश्वास अधिक, तशी त्याची उपासना अधिक प्रेमळ व बळकट होते". याकरितां संकटकालीं निराश न होतां ईश्वराचे सदयेतवर विश्वास धरून आशापूर्वक त्याची उपासना करावी. तुकोबा म्हणतात:—

( अभंग )

कांहीं पडतां जडभारी । दासें आठवावा हरी ।।

* * * *

आलिया भोगासि असावें सादर ।
देवावरि भार घालूनियां ।।
तोचि कृपानिधि वारील सांकडें ।
येर तें बापुडें काय रंक ।। १

तोच विघ्नकर्ता, तोच विघ्नहर्ता, अशा भावनेनें त्यावर विश्वासून निघोर असावें म्हणजे तोच संकट निवारण करितो.

आतां, ईशकृपेची आशा धरून निघोर असावें असें जरी म्हटलें, तरी ती आशा हिशोबी पाहिजे. कारण, ' जे स्वावलंबी असतील अशांसच देव साह्य देतो ' ही म्हण कोणी विसरून आशा करील तर ती विफल होईल. आशेला देखील हिशोब पाहिजे. आशा म्हणजे निवळ

शेखमहंमदी-केवळ मनोराज्य-उपयोगीं नाहीं. अशा तऱ्हेची आशा करणारे सफई बुडतात, असें व्यापारी मंडळींत तर हमेष दिसून येतें. यासाठीं आशा देखील आपल्या साधनांच्या व पात्रतेच्या प्रमाणांत असावी; म्हणजे ती बहुधा पूर्ण होते. शिवाय, ' आज उपाशीं, पण उद्यां तुपाशीं ' अशी स्थिति ही ' आज चैन, पण उद्यां दैन्य ' या स्थितीपेक्षां अधिक स्पृहणी-य आहे; व पहिलीला बहुतेक सुज्ञ मनुष्य राजी असतात. आतां, ज्याप्रमाणें फाजील आशा प-स्तावीं पाडिते, त्याचप्रमाणें भीरुताहि तोच प-रिणाम करिते. म्हणून संकटकालीं भिऊंहि नये व अत्याशहि असूं नये. संकटकाल आला अस-तां कधीं छाती ठोकून उडी टाकणें इष्ट असतें; कधीं केवळ सावध राहणेंच हितावह असतें. या-पैकीं कोणतें केव्हां हितकर होईल, हें जाणणें अकलेचें काम आहे. याचा उलगडा ज्याचे म-तींत नसेल, अशानें नसतें साहस करण्यापेक्षां, गप्प बसावें हेंच बरें. कारण, नसतें साहस केलें असतां त्याचे जे अनिष्ट परिणाम होतील, ते तरी गप्प बसण्यानें प्राप्त होणार नाहींत. हा फायदा कांहीं लहान नव्हे.

सर टी. ब्रौन म्हणतो, " लक्ष्मी अंधळी आहे, असा कविप्रवाद आहे; पण माझे मतें,

लक्ष्मी अंधळी नसून आपण अंधळे आहों. कारण, या चपलेचें चरित्र किती गहन आहे हें न पहातां आह्मी तिला दृढालिंगन देतों, हें आमचें अंधळेपण नव्हे काय "? एका संस्कृत कवीची कोटी निराळीच आहे:—

( श्लोक )

लक्ष्मी क्षमस्व वचनीयमिदं दुरुक्तं ।
अंधी भवंति पुरुषास्त्वदुपासनेन ॥
नोचेत्कथं कमलपत्रविशालनेत्रो ।
नारायणः स्वपिति पन्नगभोगतल्पे ॥ १

तो म्हणतो:—" लक्ष्मिबाई, मी एक आपले संबंधी रोख ठोक बोली बोलणार आहें, याबद्दल माफी असावी. बोली एवढीच कीं, आपल्या सहवासानें पुरुष अंध होतात. कारण, असें नसतें तर कमलपत्राइतके विशाल डोळे असतांना समुद्राच्या खड्ड्यांत सर्पाच्या वळवटीवर आपले प्राणवल्लभ छपरपलंग सोडून लवंडते ना ! पण हा आपल्या संगतीचा प्रभाव, हें स्पष्ट झालें ". रुशेफोकल्ट म्हणतो, " लक्ष्मी प्राप्त झाली असतां, ती आपल्या शरीरप्रकृतीप्रमाणें युक्तीनेंच वापरली पाहिजे. पूर्ण भरांत असेल तेव्हां यथेच्छ भोगावी; मंद असेल तेव्हां शांतपणें बेताबातानें वापरावी. आणि खडतर अंमल निर्वाणीची वेळ येई तोंपर्यंत केव्हांच करूं नये ". खरें पहातां, विपत्तीपेक्षां संपत्ती संभाळणें अधिक अ-

वघड. विपत्तींत सहिष्णुता किंवा तितिक्षा हा एकच सद्गुण अंगीं असला म्हणजे काम होतें; परंतु संपत्तींत दक्षता, दीर्घदृष्टि, नेमस्तपणा, परार्थपरता, सौजन्य इत्यादि अनेक गुण लागतात; तरच संपत्ति सुखावह होते व टिकते. हे गुण नसल्यास, लक्ष्मी अत्यंत बाधक होते.

संकटसमयीं वृत्ति कशा प्रकारची ठेवावी याचें उत्कृष्ट उदाहरण मिल्टन कवीचें होय. या कविरत्नाचे जेव्हां नेत्र साफ जाऊन ज्ञानग्रहणाचें एक मोठेंच द्वार नष्ट झालें, व जीवित हें भारभूत होण्याची वेळ आली, त्या वेळीं त्यानें उद्गार काढिले कीं,

(अभंग)

देवाजीच्या मना आलें । तेंचि मातें मानवलें ॥
नच होईन निराश । मार्ग चालें सावकाश ॥ १
देव मतिपता दयाळू । शासनार्थ करी खेळू ॥
जाणोनि हें, शांतचित्त । देवापायीं मी विश्वस्त ॥ २

हे उद्गार प्रत्येक विचारी मनुष्यानें संकटसमयीं ध्यानांत वागविण्याजोगे आहेत. हें भाविकपण कोणाचे अंगीं नसेल तर त्यानें एवढें तरी लक्षांत ठेवावें कीं,

(श्लोक–चरण)

विघ्नांशीं झगडा करोनि उरणें शूरत्व हें आगळें।

—लांगफेलो

जॉब म्हणतो:—

(श्लोक)

निराश व्हावें नच दुःख येतां ।
होईल सूर्योदय रात्र जातां ॥
हें सत्य ध्यानीं धरुनी विचारें ।
करूं नये साहस दुःखभारें ॥ १

आपल्यांत एक म्हण आहे:—" शिक्याचे तुटलें आणि बोक्याचे पिकलें "; त्याप्रमाणें जगांत पहावें तों एकाची हानि तो दुसऱ्याचा लाभ, असाहि प्रकार पुष्कळदां आढळतो. बाकी ज्याचें साक्षात् नुकसान होतें त्याला हें तत्त्वज्ञान गोड वाटणार नाहीं हें उघडच आहे. तथापि, एकंदरींत स्थूल दृष्टीनें एकूण जगाचा विचार केला असतां, ज्यांत कोणाचाच कसला फायदा नाहीं, असे निव्वळ अनर्थ या सृष्टींत फारच थोडे होतात. जलप्रलय हें मोठें अरिष्ट खरें; पण जळप्रळय होऊन गेल्यावर पुढील सालीं तो प्रांत सुपीक होतो असा अनुभव आहे. ज्वालामुखी पर्वत हें एक महत्संकटच; तथापि त्याचे परिणामानें आसपासचे प्रांतचे प्रांत समृद्ध झाल्याचीं उदाहरणें आहेत. लंडन शहरांत जो १६६६ सालीं भयंकर अग्निप्रळय झाला त्यानें देखील सर्वथा लोकांची हानीच केली असें म्हणवत नाहीं. तेव्हांपासून शहराची घाण नाहींशी होऊन आरोग्य वाढलें. प्राचीन काळीं सुप्रसिद्ध पाँपी शहराचा नाश झाला, त्याचीं हृदयद्रावक वर्णनें आहेत.

पण लबकचें म्हणणें तो नाश नसून शहराचे समृद्धीचें रक्षणच असें मी समजतों. गेटी म्हणतो, " जगतांत आजपर्यंत असंख्य अरिष्टें कोसळलीं; तथापि या पॉंपी शहराच्या नाशासारखें मनोरंजक अरिष्ट दुसरें कोणतेंच नसेल; त्याचें वर्णन म्हणजे तरुण पिढीला एक मोठीच करमणूक आहे ". तोच ग्रंथकार अन्यत्र म्हणतो कीं, "मळणीचे दिवशीं शेतकरी ज्याप्रमाणें धान्याची पेंढी आयंड्यावर झोडपीत असतो, त्याप्रमाणें कधींकधीं घरींदारीं दुर्दैव आपणास झोडपीत असतें; पण, आपण हें ध्यानांत धरावें कीं, सारी झोडपणी पेंढ्याला किंवा सरमाडाला बसते, आणि पुढील दाणा तसाच अखंड राहतो ". त्याप्रमाणेंच जे निःसत्व असतील ते दुर्दैवानें चिरडून जातात; पण, खरे सत्वसंपन्न असतील ते अभंग आनंदांत असतात.

( श्लोकार्ध )

कदर्थितस्याऽपि हि धैर्यवृत्तेर्न शक्यते सत्वगुणः प्रमार्ष्टुम् ॥

—भर्तृहरि

भावार्थः----जो खरा धैर्यशील आहे त्याला दुर्दैव कसेंहि छळो, त्याचा दमदारपणा हटत नाहीं.

पुष्कळदां मनुष्य विपत्तीच्या आटणींत सांपडल्यानें त्यांतील हीण झाडलें जाऊन शुद्ध बावनकशी असेल तें निदर्शनास येतें. अर्थात्, या

दृष्टीनें पहातां, विपत्ती त्याला किमतीला चढविते; व म्हणून ती उपकारकच आहे.

सेंट मॅथ्यू सांगतो, " उद्यां कसें होईल ही नसती चिंता सोडून चालू दिवसावर नजर दे; व सर्वांआधीं परमात्मप्राप्तीची खटपट कर; म्हणजे त्यांत सारें आलें. तो सर्वज्ञ व सर्वांतर्यामी आहे, तो तुझे अन्नाच्छादनाची फिकीर ठेवील. तूं स्वस्थ अस ". भगवद्भक्त तुकाराम सांगतातः—

( अभंग )

अंतरीचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळा जगताचा॥

पांडवगीतेंतहि म्हटलें आहेः—

( श्लोक )

भोजनाच्छादने चिंतां । वृथा कुर्वंति वैष्णवाः ॥
योऽसौ विश्वंभरो देवः । सभक्तान्किमुपेक्षते ॥ १

—शौनक

भावार्थः—भगवद्भक्तांनीं अन्नवस्त्राची चिंता करणें व्यर्थ आहे. त्यांचा वाली जर **विश्वंभर** आहे तर तो आपल्या भक्तांना उपाशीं उघडे कसे ठेवील; हें त्यांनीं लक्षांत घेऊन निश्चित असावें.

( श्लोक )

निर्गुणेष्वपि सत्त्वेषु । **दयां** कुर्वंति साधवः ॥
नहि संहरते ज्योत्स्नां । चंद्रश्चाण्डालवेश्मनि ॥ १

--सुभाषित

**भावार्थः**—सज्जन हे गुणहीनावर देखील दया करितात. चाण्डालाचे झोंपडीवर आपली सुखदायक चंद्रिका पाडण्यास चंद्रमा आळस करीत नाहीं.

( अभंग )

**दया** करी जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥
तुका म्हणे सांगों किती । तोचि भगवंताची मूर्ति ॥ १

**भावार्थः**—जो स्वपुत्राप्रमाणेंच दासदासीवर दया करितो, तो प्रत्यक्ष भगवानच समजावा. **तु**काराम म्हणतो याहून काय सांगूं ?

# प्रकरण ७

## सदयता

(श्लोक)

को धर्मो ?–भूतदया ।

--शंकराचार्य

( अभंग )

भूतदया ठेवा मग काय उणें । प्रथम साधन हेंचि असो ॥

--तुकाराम

आपण अर्भकांवर रागावत नाहीं, रोगपीडितांना त्रास देत नाहीं, आणि 'न हि सतामुचितं मृतमारणं' ( मेलेल्यास मारणें योग्य नव्हे, किंवा मृताची निंदा करूं नये ) या विहित वचनांची योग्यता मनांत वागवितों; मग याच उदार व सदय वृत्तीचा उपयोग व्यवहारांत आपण सर्वत्रच कां करीत नाहीं बरें ? ज्या वेळीं आपण एकाद्याचे हातून चूक झाली म्हणून त्यावर रागवतों, त्या वेळीं आपण त्याचे कृतीपुरतेंच लक्ष पोंचवितों; परंतु तशी कृति त्यानें आपसुखें केली किंवा कांहीं प्रसंगामुळें निरुपायास्तव केली, याचा विचार करीत नाहीं. गर्दींत रेटारेटी चालते तेव्हां आपल्या अंगाशीं येणारावर कोणी लोक कातावतात; पण ते असा विचार

करीत नाहींत कीं, त्यालाहि दुसरे मागून रेटीत आहेत; त्या दडप्यानें तो आपले अंगावर पडतो, यांत त्याचा अपराध नाहीं. अगगाडींत हा नित्य देखावा आहे. पण हा अविचाराचा प्रकार समजावा. कोणत्याहि विशिष्ट कृतीबद्दल कोणावर रागावणें तर तत्पूर्वीं त्या कृतीला कारणें काय झालीं असावीं त्यांचा पूर्ण विचार करावा, म्हणजे बहुधा रागावण्याची पाळी येणार नाहीं. मॅडम डी. स्टील म्हणे: "कोणाचेहि कृतीचा सर्वांगीं विचार झाला म्हणजे ती बहुधा क्षम्य वाटतेच".

सेनेका म्हणे: "अर्भकें अज्ञान म्हणून त्यांची गय करणें उचित आहे, त्याचप्रमाणें स्त्रिया अबला म्हणून; राजेलोक बहुकार्यसमाकुल म्हणून; सज्जन सद्धेतुप्रेरित म्हणून आणि दुर्जन हे परिणामीं ईश्वरास दण्डच अतएव आपणास अनुकंप्य म्हणून त्यांच्याहि अपराधाबद्दल क्षमा करणें हेंच न्याय्य आहे". एतावता, विचारी माणसाला दुसऱ्यावर रागास येण्याला स्थलें फार थोडीं आहेत.

थेलसला एकानें विचारिलें कीं, सर्वांत अवघड गोष्ट कोणती व अत्यंत सोपी गोष्ट कोणती? तेव्हां त्यानें उत्तर केलें कीं, दुसऱ्याचे कृतींतील दोष काढणें ही अत्यंत सोपी गोष्ट; व आत्मदोषांचा विचार करणें ही सर्वांत अवघड गोष्ट आहे.

( श्लोक )

नरः सर्षपमात्राणि । परच्छिद्राणि पश्यति ॥
आत्मनो बिल्वमात्राणि । पश्यन्नपि न पश्यति ॥ १

--हितोपदेश

भावार्थः—मोहरी एवढा क्षुद्र दोष दुसऱ्यांत असला तरी मनुष्य तो बाहेर काढितो. आणि स्वतःचे ठिकाणीं बेलफळाएवढा मोठा असला तरी तिकडे पाहूनहि दुर्लक्ष करितो.

विद्यारण्यानीं म्हटलें आहे कीं, मनुष्य परदोषान्वेषणीं जितका दक्ष असतो तितकाच जर स्वदोषदर्शनीं असेल तर तो दुःखमुक्तच होईल.

न्याय म्हटला म्हणजे प्रत्येकानें लक्षपूर्वक स्वकर्तव्य करीत रहावें; दुसऱ्याच्या चौकशा करीत बसूं नये. तसेंच, परदोषांविषयीं सौम्य दृष्टि ठेवावी आणि स्वदोषांवर मात्र कडक नजर राखावी; यांत कल्याण आहे. आपल्या स्नेह्यांचे दोष काढीत बसण्यापेक्षां एक वेळ आपल्या शत्रूंचे गुण घेणें बरें. प्रत्येकानें मनाशीं असा विचार करावा कीं, आपले मनाप्रमाणें आपले स्वतःचे हातूनच जर वर्तन होत नाहीं, तर इतरांचे हातून तें कसें व्हावें? आणि आपल्या मनाप्रमाणें लोकांनीं चालावें अशी ज्याची इच्छा असेल त्यानें स्वतःहि लोकांचे मनाप्रमाणें चालण्यास तयार असलें पाहिजे; तरच जुळेल व समेट राहील. थॉमस ए. केम्पिस म्हणतो:

( श्लोकार्थ )
त्वदिच्छानुरोधें असावें जनांहीं ।
जरी वांछिसी, तूं तसा कैंवि नाहीं ? ॥

आपण ऊठ पाय दुसऱ्याचे दोष काढीत असतों; पण स्वदोषांनीं आपली हानि किती तरी अधिक होते, इकडे लक्ष पुरवीत नाहीं. खरें पहातां परदोषांपेक्षां स्वदोषच आमचा घात करितात; परंतु, चमत्कार हा आहे कीं, स्वदोषांचे ठायीं आमची दोषदृष्टि नसून उलट प्रेम असतें. तें इतकें कीं, ते टाकण्याविषयीं जों जों कोणी उपदेश करील तों तों आह्मी ते अधिकाधिक उराशीं धरितों. व कोणीं त्यांचा निषेध केला कीं आह्मी त्यांचें मंडन करीत सुटतों. व्यसनी लोकांची या कामीं भाषा पहावी. तमाखू खाणाराचा तुम्ही निषेध करा; म्हणजे तो तत्काल म्हणेल, 'छेः तमाखूवांचून शौचास साफ होत नाहीं'. हें म्हणणें कितपत खरें आहे तें दिसतेंच आहे.

लबक म्हणतो, इतर कारणें दूर राहोत, पण आपण स्वतःचें चित्त शांत व स्वस्थ रहावें एवढ्याखातरच परपैशून्यमनन व परोपकारबुद्धि हीं सोडून देऊन आपले भोंवतालचे माणसांचे दोषांविषयीं उपेक्षाबुद्धि ठेवावी. त्यांच्या कृतीचा व उक्तीचा, बनेल तों, विपरीतार्थ करूं नये. त्यांचीं संकटें काय आहेत इकडे ध्यान द्यावें. त्यांचे अ-

पराधांना देववेल तितकें सौम्य स्वरूप देत असावें व त्यांचे गुणांचें कौतुक करावें. आपण असा विचार करावा कीं, या जगांत सर्वगुणसंपन्न कोण आहे ? आपण तरी आहों का ? मग दुसऱ्यांत दोष असले तर तेच आह्मांस कां जाचावे ? दुसऱ्याचे दोष किंवा लहरीपणा याबद्दल रागें भरणें हें, वादळ कां उठलें किंवा हवा वाईट कां पडली ह्मणून आकाशावर डोळे फाडण्याइतकेंच अविचाराचें आहे. आकाशावर रागावून आकाश थोडेंच सुधारतें आहे. त्यापेक्षां स्वस्थ राहणें बरें. एक वेळ आत्मापकार पुरवेल, पण परापकार बरा नव्हे. भांडखोराचे तोंडांत भडकावण्यापेक्षां आपलें तोंड मिटणें अधिक शहाणपणाचें. शिवाय दुसऱ्याला शासन करण्यांत कधीं कधीं अशी फजिती होते कीं, आपला त्याच्या कृतीविषयीं मूळ गैरसमज झालेला असतो आणि आपणच विनाकारण नसती कुरापत काढिली असें अखेर निपजतें. आतां कधीं कधीं असेंहि होतें कीं आपल्या संगतीची माणसें खरोखरच त्रासदायक असतात; तथापि, अशांशीं जपून वागणें आपले हातीं असतें. वाऱ्याशीं भांडणारीं माणसें आढळतात हें खरें; पण, खडकावर अग्नि काय जाळील ? त्याप्रमाणें आपण उत्तरच केलें नाहीं तर तो काय भांडेल ? ‘ मौनिनः कलहो नास्ति ’. प्रसिद्ध साधु तुकाराम व

सॉक्रेटिस यांना संगतीला जातीवंत कुत्या मिळाल्या होत्या. दुसरीनें तर एक दिवस प्रथम नवऱ्यावर यथेच्छ तोंड सोडून अखेर त्याचे डोक्यावर शेणखळ्याचें गाडगें ओतलें. तथापि त्या शांतिब्रह्माला ढळ आला नाहीं, ठीकच आहे, 'महावात सूटला म्हणुनि का कंप येत भूधरा'? प्रसंगीं दुसरा मनुष्य खराखुराच अपराधी, अतएव शासनार्ह आहे, असें असूनहि आपण त्यास क्षमा केली म्हणून कांहीं वावगें नाहीं. त्यांत आपला फायदाच आहे. आपल्या मनःसंयमाची ती एक कसोटीच आहे. कालिदासानें म्हटलें आहे:—

( श्लोकार्ध )

विकारहेतौ सति विक्रियंते ।
येषां न चेतांसि त एव धीराः ॥

—कुमारसंभव

भावार्थः—मन विकृत होण्याला प्रत्यक्ष कारण असतांहि तें शांत ठेवूं शकतील तेच खरे धीर.

खेरीज, अपराध्याला क्षमा केली असतां, तो कृतज्ञतापूर्वक आपला स्नेही झाल्याचीं उदाहरणें जगांत आहेत. त्या अर्थीं शासन करून शत्रुत्व वाढविण्यापेक्षां क्षमा करून मित्रत्व जोडणें हें अधिक बरें.

दुसऱ्याची ज्याला वेदना नाहीं, त्याची दुसऱ्याला तरी कशी असावी? देवच बोलला आहे कीं,

( श्लोकार्ध )

ये यथा मां प्रपद्यंते । तां स्तथैव भजाम्यहम् ॥

—**श्रीमद्भगवद्गीता**

'जशाशीं तसें' हा लौकिकी न्यायच आहे. जो दुसऱ्यांवर प्रेम करीत नाहीं, त्यावर दुसरेहि करणार नाहींत हें उघडच आहे; व त्यांनीं एक वेळ केलें, तरी तें व्यर्थ आहे. कारण, प्रेमाचा स्वभाव असा आहे कीं, तें सदा परस्परनिबद्ध लागतें; एकतर्फी प्रेम सुखावह होत नाहीं. म्हणच आहे, 'प्रेम द्यावें आणि प्रेम घ्यावें'. जो अरसिक किंवा प्रेमहीन मनुष्य असतो अशाला कोणीं प्रेम केल्यास सुख न होतां, त्रास होतो. दुसऱ्याच्या प्रेमाचें कौतुक करण्यास स्वतः प्रेमी असावें लागतें. पण जगांत कधीं कधीं असे अरसिक जीव आढळतात कीं त्यांचे ठिकाणीं प्रेमाचा कसा तो ओलावा नसतो. ते केवळ माणूसघाण्ये असतात. अर्थातच लोकांनाहि अशांची घाणच वाटते. असले एकलकोंड्ये प्राणी धरणीला क्लेशावहच म्हणावयाचे. कारण, त्यांना दुसऱ्याचा वागारा मिळून सोसत नाहीं. 'मी आणि माझें' एवढेंच त्यांचे पहाणें. आगगाडींत पहावें तों इतर माणसें खेंचून उभीं असतात; पण एकादा पाय पसरून निजलेला असतो. तो हालावयाचा नाहीं कीं पाय आंवरावयाचा नाहीं.

कोण अनौदार्य हें ! कोण माणूसतोडेपणा हा ! म्हटलें आहे:--‘ पंचभि:सह भोक्तव्यं ।’— एक तीळ सात जणांनीं वांटून खावा. याला म्हणतात माणुसकी. कवि म्हणतो:–“ काकोऽपि किं न कुरुते । चंच्वा स्वोदरपूरणं ॥” स्वत:चें पोट कावळाहि भरतो. तेव्हां ‘स्वत:पुरतें’ हा क्षुद्र विचार सोडून परार्थ देह झिजविणें हेंच जीविताचें सार्थक आहे.

( श्लोकार्ध )

क्षुद्राः सन्ति सहस्रशः स्वभरणव्यापारमात्रोद्यताः ।
स्वार्थो यस्य परार्थ एव स पुमानेकः सतामग्रणीः ॥

—भर्तृहरि

भावार्थः—स्वत:चे पोटासाठीं खपणारे क्षुद्र जीव हजारों आहेत; पण परार्थालाच स्वार्थ समजून झटेल तो सत्पुरुष खरा.

परार्थ झटणें हें केवळ चांगलें किंवा स्तुत्य आहे एवढेंच नव्हे, तर, हें मनुष्यमात्राचें कर्तव्यच आहे. कारण, असा कोण आहे कीं जो दुसऱ्याचा ऋणी नाहीं ? आपला देह देखील पंचमहाभूतांचे कृपेचें फल आहे. याच दृष्टीनें पहातां, प्रत्येक मनुष्य प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें तरी-कुटुंबाचा, समाजाचा, देशाचा, जगताचा ऋणी आहे; व त्या ऋणाचें यथाशक्ति निर्यातन करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. आपण या जगांतूनच ज्ञान मिळविलें; त्याअर्थीं तें याच

जगाचे कल्याणासाठीं खर्चीं घालणें आपलें कर्तव्य नव्हे काय? जो ज्ञानाचा दृष्टांत, तोच सर्वत्र. यासाठीं प्रत्येकानें यथाशक्ति परोपकार करीत असावें. परोपकाराला सदा द्रव्यच लागतें असें नाहीं. 'तुका म्हणे उपकार एका वचनाचा फार' इतका तो सुखसाध्य आहे; मात्र इच्छा पाहिजे. थोरांकडे पहावें तों ते स्वार्थ विसरून परार्थच करीत असतात. 'परोपकाराय फलंति वृक्षाः।'— वृक्ष स्वतः फळ खात नाहींत; परंतु, परार्थ फलभार वाहतात. हाच सज्जनांचा पंथ आहे. क्षुद्र जीवांना वाटतें कीं, परार्थच करीत सुटावें तर स्वार्थाची काय वाट? पण त्यांना समजत नाहीं कीं " साधितसे परकीय हिता परि साधन आत्महितींच करी तो " अशी ही उलटी खूण आहे. परोपकारासारखें सुख नाहीं; असला विशुद्ध आनंद दुसरा नाहीं; हें अनुभवी जाणतात. एकादा तानेला मनुष्य ऐन दुपारीं 'पाणी द्या हो' म्हणून दारीं यावा आणि अशा वेळीं त्याला आपण थंडगार पाणी पाजावें; तर जसजसा त्याचा तृषोपशम होतो तसतसा त्याचे सुखानें आपला अंतरात्मा थंडगार होत जातो, असा अनुभव कोणा सहृदयाला नाहीं बरें? आणि याहून अधिक सुखावह तें काय? हें सुख जे जाणतात ते सर्वदा परार्थोद्यत असतात. रणांगणीं स्वतः तृ-

षाक्रांत असतांहि सर सिड्ने स्मिथ हा शेजारचे शिपायाला म्हणाला, 'हें तूंच पी; तुला जरूर अधिक आहे'. धन्य त्या महात्म्याची !

( श्लोक )

व्यग्रा येच परोपकारकरणे हृष्यान्ति ये याचिताः ।
तैस्तंभैरिव सुस्थिरैश्चिरभरक्रांता धरा धार्यते ॥

—भर्तृहरि

भावार्थः--जे परोपकारांत सर्वदा गुंतले असून, मागण्यानें ज्यांना आनंद होतो, असले पुरुष या भारावलेले पृथ्वीचे आधारस्तंभच होत.

परोपकार या शब्दांतील खरें रहस्य जर मनुष्यांना कळेल, तर त्यांना त्याची गोडी अधिक लागेल. पण तें नीटसें कुठे सांगितलेलें नाहीं. परोपकार या शब्दांतील नाजूक अर्थ 'पर' म्हणजे दुसऱ्याला, 'उप' म्हणजे जवळ, 'कार' म्हणजे करणें असा आहे. अर्थात्, परोपकार म्हणजे दुसऱ्याला आपले जवळ करणें किंवा ओढणें, म्हणजे आपलेंसें करणें किंवा आपल्यांत मिळवून घेणें, असा प्रकार आहे. या अर्थाहूनहि खोल अर्थ या शब्दांत आहे. पर म्हणजे परमात्मा, याला जवळ करणें; आणि परमात्माला आपलासा करण्याचा सर्वांत सुलभ उपाय म्हणजे परोपकार किंवा भूतदया हाच होय. म्हटलें आहे: " नम्र झाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥". पण, हें वर्म समजलें पाहिजे.

आतां, परोपकार करणें, दयाधर्म करणें, दीनास साह्य करणें हें जरी श्लाघ्य असलें तरी त्यांत देखील विचार पाहिजे. साह्य करणें किंवा दान देणें तें अपात्रीं झाल्यास सर्पास दूध पाजण्यासारखें अपकारक होईल; याकरितां दान देणें तें देखील पात्रापात्र पाहूनच दिलें पाहिजे. म्हणूनच, " दान देणें तें देश, काल व पात्र पाहून द्यावें, व त्यालाच सात्त्विक दान म्हणतात" असें भगवंतानीं अर्जुनाला बजावलें आहे.

लबक म्हणतो, दरिद्र्यांना जें साह्य करणें तें, त्या योगानें ते स्वावलंबी बनावे म्हणून केलें पाहिजे. आपले साह्यानें आळस वाढून ते जर अधिक परावलंबी होतील तर अशांना साह्य करूं नये. आचार्यांनीं गीताभाष्यांत 'मूर्खास दान देऊं नये, तें तामस होय' असें स्पष्ट सांगितलें आहे. विद्यार्थ्याला मधुकरी घालणें ती लवकरच त्याची मधुकरी सुटावी म्हणून घालावयाची. पोराला आपण पांगुळगाडा देतों तो त्याचें पांगळेपण दूर व्हावें म्हणून देतों; कायम रहावें म्हणून देत नाहीं. आपले साह्यानें दुसरा केवळ सुखांत राहिला म्हणजे सार्थक झालें नाहीं; तर तो सन्मार्गी बनला पाहिजे तरच त्या साह्याचें चीज. अपात्रीं साह्य करणें म्हणजे समाजाचा अपकार करणेंच आहे. गांवावर जेवून गांजा-

तमाखू फुंकणारे टोळ शहरांत आढळतात. अशांना अन्न घालणें म्हणजे समाजांत दुर्गुण वाढविणें नव्हे काय ? याकरितां दान देणें हें जरी स्तुत्य असलें तरी सत्पात्रीं दान देतां येणें हें मोठें अवघड आहे. लबक म्हणतो, दुसऱ्यास साह्य करणें तर त्याची प्रथम आपणास लायकी समजली पाहिजे; व दान देणें तें मात्र प्रेमानें व कळवळ्यानें दिलें पाहिजे; जुलमाच्या रामरामांत कांहीं हंशील नाहीं.

एकादा मनुष्य स्वभावतःच हाताचा सढळ असतो आणि मागत्याला तत्काळ देतो. पण बेकन म्हणतो, "साह्य करण्यांत आपला हेतु दुसऱ्याची केवळ गरज भागविण्यापुरता नसून त्याला स्वावलंबी बनविण्याचा असला पाहिजे". तो सोडून आपण जर आपले साह्यामुळें दुसऱ्यास अधिक ऐदी बनवूं, तर आपण उपकर्ते नसून अपकर्तेच होऊं. आम्ही अशा कृतीनें समाजाची अवनति करितों, असें समजावें. म्हणून द्रव्यादि दान विचारपूर्वकच करावें. कोरडें प्रेमदानच असेल तर मात्र टंचाईचें कारण नाहीं. कारण त्याचा दुकाळ कधींच नाहीं, व त्यापासून इतका तीव्र अपकारहि होत नाहीं. द्रव्याची गोष्ट निराळी आहे. कोणापाशीं झालें तरी तें मर्यादितच असणार. अर्थातच तें अविचारानें अपात्रांना दिलें

गेल्यास सत्पात्र उघडे पडतील. भलाईच्यापोटीं आपण नालायक मनुष्य अन्नाला लाविल्यास लायक मनुष्य उपाशीं मरेल. छाकट्याला साह्य केल्यानें दुर्गुण चेतविण्याचेंच पाप मात्र जोडेल. यासाठीं द्रव्यदान तरी सावधपणानेंच केलें पाहिजे. नुसतें सरस्वतीदान वाटेल तसें करावें. बाकी उपदेश किंवा ज्ञानदान देखील पात्रींच करणें अधिक बरें.

एकानें काटकसरीनें पैसा सांठवावा आणि दुसऱ्या आयतोजीनें तो उधळावा, हा प्रकार जसा डोळ्यांत सलणारा आहे, तसाच, सत्पात्र उघडे टाकून अपात्रांना झांकणें हा आहे. या करणीनें लायक तेवढा उघडा पडला, आणि नालायक तो नालायक ठरलेलाच आहे. स्पिनोझाचें या कामीं असें म्हणणें आहे कीं, आपले समाजाचा यापुढें उत्कर्ष व्हावा असा जर आपला हेतु असेल तर आपणहि ईश्वराचाच कायदा पाळला पाहिजे. तो कायदा म्हणजे ' कृति तसें फळ '. अर्थात् जो वर्तनानें अपात्र आहे तो दयेलाहि अपात्र आहे. अशाची कींव न करावी हेंच न्याय्य. तुकाराम अपात्र लोकांविषयीं म्हणतातः—

( अभंग )

भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥
ऐशियासि भगवानें । उपेक्षिजे सर्वथा ॥ १

एक गृहस्थ आपल्या पुत्रास म्हणतो, " द-

या करण्याचें फळ पुष्कळदा ‘ कृतघ्नता ’ हेंच जरी अनुभवास येतें तरी देखील तूं दया करण्याचें सोडूं नको. जे तुजशीं कृतघ्न होतील, त्यांचा न्याय देव करील असें मानून तूं आपला दया करीतच जा ”. लेखक म्हणतो, हें म्हणणें थोरपणाचें आहे व आम्हीं स्वीकारिलेंहि असतें; परंतु अपात्रीं उपकार करण्याचा परिणाम उपकर्त्याशीं कृतघ्नता एवढाच न होतां उपकृतांचे ठिकाणीं दुर्गुणांची वाढ हा होतो, व हा परिणाम अनिष्ट आहे, म्हणून वरील गृहस्थाचा उपदेश अंमळ जपूनच ऐकिला पाहिजे.

मनुष्य हा स्वभावतः सुखलोलुप असतो. पडल्या ठिकाणीं कोणी तोंडांत जांभूळ ढकलील तर बापड्याला कबूलच आहे. किंचित् साह्य मिळालें कीं तो लगेच सुखावतो. याकरितां, जेणेंकरून मनुष्याचें स्वावलंबित्व व उद्यमपरत्व वाढेल अशा खुबीनें त्यास साह्य केलें पाहिजे. म्हणन द्रव्यसाह्य करणें तें नीट पाहूनच करीत जावें. बाकी, सल्लामसलत देणें, वेळ खर्चणें, कळवळा बाळगणें ह्या गोष्टींत इतकी बारकाई न केली तरी चालेल. द्रव्यदानाला विशेष विचार पाहिजे; पण क्षमादानाला नको, तें सर्वत्र करावें. क्षमादानापेक्षांहि उपकाराची स्मृतीच न धरणें हें अधिक थोरपणाचें होय.

अल्फ्रेड दि ग्रेट राजाचा अखेरचा उपदेश असा आहे कीं, " दुःखितांस सुखी करा; निराश्रितांस आश्रय द्या; उघड्यांवर पांघरूण घाला. आणि जें कांहीं चुकीचें दिसेल तें यत्नपूर्वक दुरुस्त करा. अशा कृतीनें देव तुम्हांवर प्रसन्न होईल—नव्हे,—देव तुम्हांस प्राप्त होईल ". तुकोबाहि म्हणतातः—

( अभंग )

जे कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ १

सारांश, कोणाचेहि मतें पाहिलें तरी परोपकारासारखी उंची गोष्ट नाहीं. उलटपक्षीं, स्वार्थासारखी वाईट गोष्टहि कोणची नाहीं. कारण, स्वार्थाची पूर्तताहि कधीं होतच नाहीं व यामुळें मनुष्याला त्या बाबतींत सुख असें वाटतच नाहीं. पण, मनुष्यानें स्वस्थितीचा विचार करणें तो नेहमीं आपल्याहून हीन स्थितींत असतील त्यांजकडे पाहून करावा म्हणजे त्याला आपलीच स्थिति बरी आहेसें वाटून तींतच सुख होत जाईल. म्हणच आहेः—' जोडा घालणारानें अनवाणी चालणाराकडे पहावें; घोड्यावर बसणाराकडे पाहूं नये '.

दयेच्या सदरांत प्रेम याचाहि अंतर्भाव करणें जरूर आहे. शिलरला ही गोष्ट मान्य नाहीं. तो

म्हणतो, प्रेम हें मनुष्याला उपकारक नाहीं; तें त्याला नेभळें करतें. पण लबकचें म्हणणें कीं, प्रेमाचा प्रसंगविशेषीं दुरुपयोग झालेला आढळला म्हणून तेवढ्यावरून प्रेम हा विकार त्याज्य किंवा तुच्छ समजणें न्याय्य नाहीं. आतां एवढें खरें कीं, मुग्ध प्रेमाचा फारसा उपयोग होत नाहीं. तें व्यक्त झालें पाहिजे. मग मात्र त्यासारखें बिनमोल काहीं नाहीं. आपल्या मातेची काळजी, उत्तेजन, व सर्वांत अधिक तिचें प्रेम, यांपासून आपलें किती तरी कल्याण झालें आहे, त्याची ओळख प्रत्येकास आहेच. रॉयल अकॅडेमीचा अध्यक्ष सर बेंजामिन वेस्ट याला एकदां कोणीं विचारिलें कीं, आपण इतके निपुण चित्रकार कशानें झालां ? त्यावर त्यानें उत्तर दिलें, ‘ माझ्या मातेचे सप्रेमचुंबनामुळें ’.

रुबेन्स नामक चित्रकारानें आपल्या तूलिकेच्या एका फटकाऱ्यानें हंसरा चेहरा रडका करून दाखविला अशी आख्यायिका आहे. पण लबक म्हणतो, हंसत्या माणसाला रडूं लावण्यास किंवा रडत्यास हंसविण्यास कुशल कारागिराची किंवा त्याच्या कलमाच्या फटकाऱ्याची जरूर नाहीं. तो सारा एका शब्दाचा खेळ आहे. ममतेचा, कळवळ्याचा, एक शब्द रडत्याला प्रसन्न करून हंसवील. त्याचेच उलट मर्मकृंतक, नि-

ष्ठुर असा एक शब्द हंसत्यास रडविण्यास पुरे. कारण, मानवी हृदय पाषाणाचें नाहीं; आणि नसावें हेंच ठीक. तें फार कोमल आहे, व यामुळें तें प्रसन्न किंवा अप्रसन्न करणें हें थोड्या युक्तीचें काम आहे. मागेंच म्हटलें आहे, "तुका म्हणे उपकार। एका वचनाचा फार॥" त्याप्रमाणें प्रेमाच्या एका शब्दानें जन्माचा मित्र होतो. आणि हा इतका स्वल्प उपाय जर आहे, तर त्याची दुर्लभता कां ठेवावी ? एका कवीनें म्हटलें आहेः—

( श्लोक )

बाङ्माधुर्यात्सर्वलोक-प्रियत्वं ।
वाक्यारुष्यात्सर्वलोकाऽप्रियत्वं ॥
किंवा लोके कोकिलेनोपनीतं ।
किंवा लोके गर्दभस्यापराधः ॥ १

**भावार्थः**—मधुरवाणीनें सर्व आपलेसे होतात. कठोर वाणीनें सर्व आपला कंटाळा करितात. यास दृष्टांत कोकिल व गर्दभ.

वडिलांचें सांगणें आहेः—' गूळ नाहीं, पण गुळासारखी वाचा तरी असावी ' तें घेण्यासारखें आहे. प्रेमाचे, कळवळ्याचे शब्दांनीं देखील दुखिताचें दुःख हलकें होतें.

स्निग्धजनसंविभक्तं हि दुःखं सह्यवेदनं भवति ।

—कालिदास

व दुसऱ्याचे दुःख हलकावणें हीं कांहीं ह-

लकी गोष्ट नाहीं. परदुःखहरणाहून अधिक पुण्य कोणतें ?

वडिलांची एक म्हण आहे, 'शुभ बोलत असावें'. ॲनी बेझांट बाईनीं आपल्या एका ग्रंथांत सांगितलें आहे कीं, " विचारपूर्वक उच्चारलेला प्रत्येक शब्द सजीव व मूर्तिमान् असून त्याचे बरे-वाईट प्रकृतीप्रमाणें दुनियेंत कामगिरी करितो. ही अतिशयोक्ति नव्हे. बरेच मंडळीनें एकदिलानें जर विचार केला कीं शेजारच्या एका खेड्यांत कलह माजवावयाचा, तर त्यांनीं केवळ या कामीं दृढेच्छा केली तर समक्ष न जातांहि तेथें कली माजेल ". अर्थात् केवळ अशुभचिंतनानें देखील दुसऱ्याचें अकल्याण होऊं शकतें, आणि त्याचेच उलटपक्षीं, शुभचिंतनानें दुसऱ्याचें शुभ होऊं शकतें. हाहि शास्त्रमान्य सिद्धांत आहे. याचकरितां प्राणिमात्राचे कल्याणाची इच्छा करावी, सर्वदा शुभचिंतन करावें व शुभच बोलावें. समर्थांनीं म्हटलें आहे, " सर्वांमुखीं मंगल बोलवावें " तें उगाच नव्हे. ख्रिस्ती लोकांत अशी एक आख्यायिका आहे कीं, ग्रेगरी नामक धर्मगुरूनें ईश्वरापाशीं प्रार्थना करून ट्रेजन नामक बादशहाला नरकांतून उद्धरिलें. लबक म्हणतो, हें कसेंहि असो, तरी सर्वांनीं शुभ चिंता करावी व शुभ व प्रेमळ बो-

लावें. अशानें मानवी सुखाची निःसंशय वृद्धि होते. अंगीं बळ असल्यास त्याचा विनियोग दुर्बलांचे परित्राणाकडे करणें हाहि मानवी सुखवृद्धीचाच उपाय आहे.

( दिंडी )

दुर्बलाशीं वागुनी स्नेहभावें । तद्गुणासी कौतुकें आदरावें ।
जरी दिसती तत्कृतीमाजि दोष । उपेक्षावे ते सांडुनिया रोष.

—प्रायर

प्रेमपात्र होण्यापेक्षां प्रेमकर्ते होणें अधिक चांगलें आहे. प्रेमाचें सामर्थ्य अगाध आहे. मुलें-लेंकरें तर प्रेमानें जेवढीं स्वाधीन होतात तेवढीं कडक शिक्षेनें होत नाहींत. पोरांचें राहो; एवढा सर्वशक्ति परमेश्वर, पण प्रेमापुढें तो देखील हार खातो. **मोरोपंत** म्हणतातः—

( आर्याचरण )

सत्यप्रेमा दावुनि तैसा तो विश्वपाळ कवळावा ॥

प्रेमानें विश्वचालक जर मुठींत येतो, तर पामरांची काय कथा? यासाठीं प्रेमानेंच जगत् जिंकावें व सुखीहि करावें.

एक वेळ आपला अपकार कोणीं केला तरी सोसावा; पण आपण कोणाचा अपकार करूं नये. आणि काम खासगी असो वा सार्वजनिक असो, त्यांत सर्वदा भलाईनें वागावें. आपलें कोणी वैर करीत असेल, तर प्रायः त्याचें कारण

आपले वर्तनांतच आहे, असें समजावें. धर्मराजाला ' अजात–शत्रु ' नांव होतें तें त्यानें आपल्या वर्तनानें मिळविलें होतें. स्वभाव संशयी नसावा. संशयी मनुष्याला चांगला कोणीच दिसत नाहीं व यामुळें त्याला सहजच मित्र जोडत नाहींत; शत्रु मात्र सुकाळाचे होतात. म्हणून दक्ष असावें पण संशयी नसावें. भगवंतानीं गीतेंत म्हटलें आहे:–" संशयात्मा विनश्यति ". अकारण शत्रु जगतांत आढळतात; पण असें क्वचित्. बहुधा " कारणेनहि जायंते । मित्राणि रिपवस्तथा " ॥ हेंच म्हणणें खरें आहे.

येशुख्रिस्त म्हणे कीं, " देवानें मला जे अनेक अधिकार दिले आहेत त्या सर्वांत पृथ्वीवरील लोकांचे ' पापांची किंवा अपराधांची **क्षमा** करण्याचा ' जो अधिकार दिला आहे तो अत्यंत दिव्य आहे ". हा क्षमा करण्याचा दिव्य-अधिकार आपल्या शक्तीप्रमाणें आपणाहि प्रत्येकास आहे. क्षमा करण्याची शक्ति आपणा सर्वांस आहे; इच्छा मात्र पाहिजे. आपणाशीं एकादा मनुष्य कठोरपणानें किंवा निर्दयतेनें वागून आपलें एका बाजूनें मन दुखवितो, हें खरें; पण दुसऱ्या बाजूनें तो आपला अपराधी होऊन त्याच्या अपराधाची थोर मनानें क्षमा करण्याची अमूल्य संधि आयतीच आपणास आणून देतो;

आणि यासाठीं आपण त्याचा अपकार न मानितां उपकारच मानावा.

कृतापराधाबद्दल सूड उगविणें हें पामरांचें लक्षण आहे. क्षमा करणें हें साधुत्व, किंबहुना देवत्व आहे. "अपकारिषु यः साधुः। स साधुः सद्भिरुच्यते".–उत्तम पुरुष म्हणावा जो करितो शत्रुवरिहि उपकार ॥ आपण जर नित्य परमात्मापाशीं स्वापराधांची क्षमा मागतों, तर मग त्याच न्यायानें पहातां, आपणहि दुसऱ्यास क्षमा करण्यास तत्पर असणें उचित नव्हे काय?

( श्लोकार्ध )

आत्मौपम्येन भूतेषु । दयां कुर्वंति साधवः ।

—हितोपदेश

भावार्थः—भले लोक आपल्याप्रमाणेंच भूतमात्रावर दया करितात.

आह्मी जर इतरांस क्षमा न करूं, तर देवानें तरी आह्मांस कां करावी? हा विचार प्रत्येकानें मनांत बाळगावा. कोणी आपणावर रागावला असतां नम्रपणानें व मृदुशब्दानें उत्तर द्यावें म्हणजे त्याचे रागाची तीव्रता तेव्हांच बोथटते; तेंच उलट त्वेषानें किंवा कुभावानें उत्तर दिलें म्हणजे तीच अधिक जोरावते, व कायमचा प्रेमभंग करिते. यासाठीं क्रुद्धास हात जोडून उत्तर द्यावें. फ्लॉरेन्सचा ड्यूक कास्मो म्हणे कीं, "ईश्वरानें 'वैऱ्याला क्षमा कर' (मित्राला नव्हे) अशी आज्ञा

केली आहे, यांत त्याची विशेष खुबी आहे. ती अशी आहे कीं, वैऱ्याचा आपण सूड घेतला किंवा त्याच्या हडक्या मोडल्या तर, फार झालें तर तो बाह्यतः नरम येईल किंवा सरळ होईल;परंतु क्षमा केल्यानें बहुधा तो द्वेषभाव अजीबात सोडून कायमचा मित्र होईल. अर्थात् ही गोष्ट अधिक किमतीची आहे. दुसरी गोष्ट, सूड घेण्याचा विचार आपले मनांत धुमसत ठेविला म्हणजे तो वैऱ्याचे पूर्वीं प्रथम आपणासच जाळतो; आपल्यास सुखस्वास्थ्य कसें तें उरूं देत नाहीं. त्यापेक्षां, क्षमा केल्यानें वैरीहि लज्जेनें तरी द्वेषभाव सोडतो व आपल्याला रुखरुखीचें कारणच न उरल्यानें आपलाहि अंतरात्मा शांत असतो. पण कित्येक माणसें अपकाराची स्मृति सदैव आपले उराशीं बाळगितात ".

क्षमेनें शत्रु वाटेवर आणणें हें शूरत्व खड्गधारेनें त्याची मान तोडण्यापेक्षांहि अधिक धन्यतेचें आहे. क्षमेनें शत्रूला शरमविल्यानें तो मनचे मनांतच मरून जातो व अनुतापानें शुद्ध होऊन आपला मित्र बनतो. शक्तीचे जोरावर आपण खोड जिरविली तर तो असामर्थ्यास्तव जरी बाह्यतः गप्प बसला तरी मनांतला डंक सोडीत नाहीं, व संधि आली असतां पुनः उरफाटून छातीवर बसतो. एकादा पक्का लुच्च्या

असतो, तो पराभूत होतांच अनुताप दाखवून वरपांगीं सरळ झाल्याचें भासवितो परंतु डाव सोडीत नाहीं. यापेक्षां भर्तृहरीनें म्हटल्याप्रमाणें—

(श्लोकचरण)

क्षान्त्यैवाक्षेपरूक्षान् खरमुखरमुखान्दुर्मुखान् दूषयन्तः ।

ही पद्धत चांगली. लबक म्हणतो, शत्रूवर दया करण्याइतकें औदार्य तुमचे अंगीं नसलें तरी निदान स्वतःविषयीं तरी निर्दय होऊं नका. आणि शत्रूचा सूड घेण्याची बुद्धि मनांत बाळगणें म्हणजे स्वतःला एक जबरदस्त हृद्रोग आपण होऊन लावून घेणें आहे. हा सूड घेण्याचा ससेमिरा एकदां पाठीं लागला कीं त्या पुरुषाला खाल्लें अन्न अंगीं लागत नाहीं, निद्रा नाहीं, विश्रांति नाहीं; त्याला शरशय्येवर निजल्यासारखें किंवा विंचवाचे तळ्यांत पडल्यासारखें होतें व सुखशांतीला तो मुळींच अंतरतो. एवढा अनर्थ या सूड घेण्याच्या बुद्धीनें जर होत आहे, तर तिजपेक्षां उभयपक्षांना सुखदात्री जी ‘क्षमा’ तिचा अवलंब करणें शहाणपण नव्हे काय?

आधीं मुळीं आपण दुसऱ्याचे दोष न्याहाळावेच कां, व न्याहाळून ते उगाळीत बसावें कां किंवा त्यांचा राईचा पर्वत करण्याची खटपट करावी कां? त्यांत काय प्राप्ती? त्यापेक्षां त्याचे दोष टाकून गुणच कां न शोधले? कारण, प्रत्ये-

क मनुष्यांत जसे दोष आहेत तसे गुणहि असणारच. शोधले मात्र पाहिजेत. दोष टाकून गुण घेणें हें भल्याचें लक्षण. गुण टाकून दोष घेणें हें दुर्जनाचें लक्षण.

( श्लोक )

त्यजन्ति शूर्पवद्दोषान् । गुणान् गृह्णन्ति साधवः ॥
दोषग्राही गुणत्यागी । पल्लोलीवाहि दुर्जनः ॥ १

—सुभाषित

भावार्थः—सज्जन हे सुपाप्रमाणें दोषरूपी खडे टाकून गुणरूपी धान्यकण घेतात; दुर्जन चाळणीप्रमाणें गुणकण गाळून दोषपाषाण संगृहीत करितात.

दुसरा कवि म्हणतोः—

( आर्या )

त्यजतिच गुणान् सुदूरं तनुमपि दोषं निरीक्ष्य गृह्णाति ॥
मुक्तालंकृतकेशान्यूकामिव वानरः पिशुनः ॥ १

भावार्थः--दुर्जन हा ढोबळ गुण सोडून सूक्ष्म दोष तेवढा घेईल. सुंदरीच्या केशांत मौक्तिक गुंफलें असलें तरी माकड तें सोडून उवा तेवढ्या टिपीत बसेल.

गोचीड दूध टाकून गाईच्या कासेंतून रक्त ओढतो,हाच मासला दुर्जनांचा आहे.याकरितां आपण दोषदृष्टि सोडून गुणग्राही बनावें. या गुणग्राहितेमुळें पुष्कळदां दुसऱ्याचे दोष देखील गुणरूप वाटतात व प्रेमास्पद होतात. म्हटलेंच आहेः- ‘ जसें खारें पाणी पिऊनि घन तें गोड करिती ’.

आपल्या अपराधांची दुसऱ्यानें गय केली नाहीं

म्हणजे आपणांस अणकर वाटतें हें जर खरें आहे, तर आपले वर्तनानेंहि इतरांस तसेंच वाईट वाटेल हें ध्यानीं वागवून क्षमाशील असावें. पेस्टालोजी हा म्हणे कीं, परकार्यरत मनुष्य विरळा. हें म्हणणें सर्वथाच खरें नाहीं. विनास्वार्थ परोपकार करणारेहि थोर पृथ्वीवर आहेत व म्हणूनच पृथ्वी चालली आहे. शिवाय, दुसऱ्याचें लक्ष ओढून घेणें ही हिकमत पुष्कळशी आपले हातीं आहे. आपण दुसऱ्याचें बरें करीत गेलें म्हणजे तोहि करितोच करितो. शेक्सिपअरनें म्हटलें आहे

( श्लोकार्ध )

बरें कृत्य संगेंचि मातींत जाई ।
बुरें तेवढें मृत्युलोकांत राही ॥

हें जरी कधीं कधीं अनुभवास येत असलें, तरी बहुधा बऱ्याची बरी आणि वाईटाची वाईट कीर्ति मागें रहातेच रहाते. तैत्तिरीय उपनिषदांत म्हटलें आहे: "यथा वृक्षस्य संपुष्पितस्य दूराद्गंधो वाति एवं पुण्यस्य कर्मणो दूराद्गंधो वाति।" म्हणजे पुष्पित वृक्षाप्रमाणें सत्कृत्यांचा सुगंध दूरवर जातो.

सोनें-रुपें जवळ असल्यास जीविताला अवश्य असें अन्नपाणी, कपडालत्ता, घरदार, वगैरे त्याचे साह्यानें संपादितां येईल; परंतु, प्रियजनाच्या सस्नेह प्रेमकटाक्षापासून होणारें जें

कांहीं अनिर्वाच्या सुख आहे, तें कांहीं सोन्या-रुप्याला देतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें दारिद्य जरी जहराप्रमाणें दुःखद असलें तरीहि कठोर शब्दाइतकें तें मर्मकृंतक असूं शकणार नाहीं. विदुरनीतींत म्हटलें आहेः—

( श्लोक )

मर्माण्यस्थीनि हृदयं तथासून् ।
रूक्षावाचो निर्दहन्तीह पुंसां ॥
तस्माद्वाचं रूषतीं रूक्षरूपां ।
धर्मारामो नित्यशो वर्जयीत ॥ १
अरुंतुदं परुषं रूक्षवाचं ।
वाक्कण्टकैर्वितुदन्तं मनुष्यान् ॥
विद्यादलक्ष्मीकतमं जनानां ।
मुखे निबद्धां निर्ऋतिं वैवीहन्तम् ॥ २

—महाभारत, उद्योगपर्व

भावार्थः—कठोर भाषणें पुरुषांचीं मर्में, अस्थि, हृदय व प्राण दग्ध करीत असतात. तस्मात् धर्माचें अवलंबन करणाऱ्या पुरुषानें कधींहि दाह करणारें कठोर भाषण उच्चारूं नये. मर्मावर प्रहार करणारा, क्रूर, कठोर भाषण करणारा, आणि शब्दरूप कांट्यांनीं मनुष्यांना टोंचणारा जो पुरुष तो सर्व लोकांमध्यें अत्यंत दुर्दैवी असून मुखामध्यें जखडलेल्या मृत्यूलाच तो एकसारखा आपले बरोबर वागवीत असतो, असें समजावें.

याचेच उलट सामर्थ्य मधुर शब्दाचें आहे. एका मधुर शब्दानें एकादें हताश हृदय तत्काळ संजीवित होतें. म्हणून सदैव मधुर बोलत अ-

सावें. बाकी हें केवळ सोंपें नाही. तथापि यत्न ठेवावा. निदान कठोर तरी न बोलावें. द्रव्यदानानेंहि दुःखित हृदयें सुखी होतात, तरी त्याचें सामर्थ्य मधुर शब्दाहून कमीच. शिवाय, द्रव्यसाह्यानें प्रसंगीं अपकारहि होतो. मधुर शब्दाचें तसें नाहीं. अभ्यागताचें मधुरवाणीनें स्वागत केलें असतां त्याला जें सुख होतें तें केवळ अवर्णनीय आहे.

( श्लोक )

घर्मार्तं न तथा सुशीतलजलैः स्नानं न मुक्तावलि ।
र्न श्रीखंण्डविलेपनं सुखयति प्रत्यंगमप्यर्पितम् ॥
प्रीत्या सज्जनभाषितं प्रभवति प्रायो यथा चेतसि ।
सद्युक्त्याच पुरस्कृतं सुकृतिनामाकृष्टिमंत्रोपमं ॥ १

—हितोपदेश

**भावार्थः**—सज्जनांच्या सप्रेम स्वागतानें जें सुख व चित्ताकर्षण होतें तें घर्मार्ताला थंडगार पाण्याचें स्नान, चंदनलेप किंवा मुक्ताहार घातल्यानेंहि होत नाहीं. अर्थात्, मधुर शब्दाची योग्यता अगाध आहे. परंतु पुष्कळांचे मुखांत त्यांची वाण असते. कित्येक माणसें सहज बोलणें तें देखील उपरोधिक बोलतात; आणि कधीं कधीं, मग पस्तावतात पण त्यांना असें कळलें पाहिजे कीं, शब्द हा एकदां मुखाबाहेर गेला कीं कायमचा गेला. कांहींकेल्या तो परतणार नाहीं. तुम्ही वाटेल तितका पश्चात्ताप करा, क्षमा मागा, 'बुंदसे गई वो हौदसे नही आती' असा तो प्रकार आहे. म्हणून मुखावाटे दुर्वचन कधींच काढूं नये.

एका सुज्ञ मनुष्यानें स्वर्ग व नरक यांचें लक्षण दिलें आहे तें असें:--जेथें प्रत्येक मनुष्य परोपकाररत असेल तें स्थानच स्वर्ग; व जेथें मनुष्य परापहारनिरत असतील तोच नरक. हें म्हणणें बरेंचसें सार्थ आहे. तुम्ही कितीहि संपन्न व समर्थ असा; प्रेम, दया, व समाधान हीं जर नाहींत, तर तुम्हांला सुख मिळणार नाहीं. लबक म्हणतो, या तीन गोष्टींवांचून स्वर्गदेखील क्लेशावह होईल. आणि या तीन नांदल्यास, चंद्रमौळी झोंपडींत स्वर्गाचा आराम मिळेल.

सेंट सेलस हा प्रेमाच्या ठळक मोठ्या गोष्टींना साखरेची, व किरकोळ गोष्टींना मिठाची उपमा देतो. त्याचें म्हणणें, साखर अधिक मधुर खरी, पण तिचा वापर कमी. परंतु मीठ, ज्याला ' सबरस ' हें यथार्थ नांव आहे, हें प्रत्येक पदार्थांत पडतें व प्रत्येकास तें रुचीस चढवितें. इतकेंच नव्हे पण, एकवेळ साखरेची रुची देखील मिठानें सुधारते. असो. सारांश गरीबगुरीबाला जरी साखर नसली तरी मिठाची तर वाण नाहीं. त्याचप्रमाणें दयेचीं महत्कृत्यें जरी सर्वांस शक्य नसलीं तरी लहानसहान तरी खचीत साधतील. आणि तेवढीं करीत गेलें तरी जगत् कितीतरी सुखी होईल.

आपलें सत्तेचें घर म्हणजे ' सुखनिवास ' अशी

भावना असते; व म्हणूनच पांचशें कोसांवरून उड्या टाकीत मनुष्य घरीं जातो. पण घराला 'सुखनिवासत्व' कशानें बरें येतें? संपत्तीनें किंवा कडेकोट बंदोबस्तानें येत नाहीं. आपलें घर झों- पडें असेना, पण तेथें जर शुद्धप्रेम व शांति हीं नांदत आहेत, तर स्वर्गहि त्यापुढें ठेंगणा होतो हें त्यांतील रहस्य आहे. नुसती आमटीभाकरीच, पण ती जिवाच्या माणसानें वाढली असतां अमृततुल्य लागते; नावडत्या माणसानें जिलबी वाढून द्या तरी ती कडू लागते. सारांश, प्रेम गोड आहे; प्रेम हेंच सुखनिधान आहे; प्रेम हाच स्वर्ग आहे. प्रेमाचा अस्त होऊन जेथें अशांति, अप्रेम, मत्सर, अदेखाई, हीं सुरू झालीं तेथील माणसें एका छपराखालीं असलीं—नव्हे, एका बिछान्यांत निजत असलीं, तरी तेथून सुखाचा मुक्काम उठ- ला असें समजावें. यासाठीं मनुष्यांनीं असें वागूं- च नये. अशानें सर्वांनाच सुखाचा उन्हाळा होतो. मत्सरी मनुष्य तर लहरी सापाहून वाईट. अशा संगतींत कोणालाच सुख होत नाहीं. सुख पाहिजे असेल—आणि तें नको असणार कोणाला?— तर आपण सर्वांनीं परस्परांचे दोषांविषयीं उपेक्षा करून, अन्योन्यसाह्यास तत्पर असावें; परस्परां- शीं सस्नेह व सादरबुद्धीनें वागावें, आणि एक- मेकांविषयीं जीव तोडावा, म्हणजे हें जगत्

किती तरी सुखी होईल. येशूख्रिस्तानें आपल्या शिष्यांस सांगितलें कीं, "शत्रूवर प्रेम करा, शाप देईल त्याला परत आशीर्वाद द्या, अपकर्त्यांवर उपकार करा, आणि तुमचे द्वेष्टे असतील त्यांचे तारणार्थ ईश्वराची प्रार्थना करीत जा, म्हणजे जगतांत सुखसमृद्धि अक्षय्य नांदेल".

( श्लोक )

न हि ज्ञानेन सदृशं । पवित्रमिह विद्यते ।
*  *  *  * ॥ १
श्रद्धावाँल्लभते ज्ञानं । तत्परः संयतेंद्रियः ॥
ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ २

**—श्रीमद्भगवद्गीता**

**भावार्थः**—एथें ज्ञानासारखें शुद्धिकर अन्य कांहीं नाहीं. हें ज्ञान जो श्रद्धालु, तत्पर, व जितेंद्रिय असेल अशालाच मिळतें. एकदा ज्ञान मिळालें कीं लौकरच उत्कृष्ट शांति प्राप्त होते.

( श्लोक )

न पण्डिताः साहसिका भवंति ।
श्रुत्वाऽपि ते संतुलयंति तत्त्वम् ॥
तत्त्वं समादाय समाचरंति ।
स्वार्थं प्रकुर्वंति परस्य चार्थम् ॥ १

**—सुभाषित**

**भावार्थः**—शिकलेसंवरलेले लोक कोणतीहि गोष्ट एकदम करीत नाहींत. एकादी गोष्ट कानीं येतांच ते पूर्ण विचार करून तींतील तत्त्व काय तें हुडकून काढितात, आणि मग त्या तत्त्वावर दृष्टि ठेवून वागतात व तेणेंकरून स्वार्थ साधून परार्थहि साधितात.

( श्लोकार्ध )

गाढं गुणवती विद्या । न मुदे विनयं विना ॥

**—सुभाषित**

**भावार्थः**—कितीहि गाढ गुणयुक्त विद्या असली तरी अंगीं विनय नसेल तर ती आनंदायक होत नाहीं.

# प्रकरण ८

## शिक्षण ( विनयन )

द्वे विद्ये वेदितव्ये। परा चैवापराचेति।

—मुण्डकोपनिषद्

( पद )

चित्ता शांति नादे ऐशी विद्या काशाला ?

—हरिकवि

( श्लोक )

विद्या ददाति विनयं। विनयाद्याति पात्रतां॥
पात्रत्वाद्धनमाप्नोति। धनाद्धर्मं ततः सुखम्॥ १

—हितोपदेश

भावार्थः—विद्येनें विनय येतो; विनयानें अंगीं पात्रता येते; पात्रतेनें धनप्राप्ति होते; धनानें धर्मसंग्रह होतो, व धर्मानें सुख होतें.

मनुष्य हा उपजतांच केवळ पशु असतो, आणि ज्या संस्कारांनीं त्याला पशूचा मनुष्य करितां येतो त्या संस्कारांस 'शिक्षण' किंवा 'विनयन' असें म्हणतात. पशु शब्दाचा मूळ अर्थ- 'सर्वं अविशेषेण पश्यति असौ।' म्हणजे जो सामान्यतः पाहतो, किंवा केवळ चर्मचक्षूचा व्यापार करण्यास समर्थ असतो, तो. आणि मनुष्य शब्दाचा अर्थ—'मननात् मनुष्यत्वः।' म्हणजे विचार करण्याचें सामर्थ्य किंवा सारसार ज्ञान ज्याला

उत्पन्न झालें तो, असा होतो. अर्थात् उपजतांच केवळ चक्षुरादींद्रियांचे मुग्ध व्यापार सृष्टीवर चालू असतात ती स्थिति जाऊन त्या व्यापारांपासून बोध घेण्याचें व भिन्नसंवेदनांची तुलना करून त्यांपासून सामान्यसिद्धांत करण्याचें सामर्थ्य अंगीं येणें म्हणजे पशुस्थितींतून मनुष्यस्थितींत येणें, असें ढोबळ मानानें म्हणतां येईल. हें स्थित्यंतर करणारे जे अनेक संस्कार त्यांचे समुच्चयास शिक्षण हें सामान्य नांव आहे.

ही सृष्टि विचित्र व अनन्त असल्यानें तिचें ज्ञानहि अनन्त व मनोहर आहे; आणि तें प्राप्त करून घेण्यास संस्कारहि असंख्य लागतात. म्हणूनच, खरें पाहतां, आमरण शिकलें तरी शिक्षण पुरें होतच नाहीं. परंतु, शिक्षणाचा हा व्यापक अर्थ फारच थोड्यांचे लक्षांत वागतो. आजकाल तर शिक्षण शब्दाचा अर्थ शाळांत काय पढविलें जातें तें, इतका संकुचित झाल्यासारखा आहे. आणि हा प्रकार मोठा घातक आहे. कारण प्राथमिक शाळांत पहावें तों लेखन, वाचन, हिशोब-ठिशोब, थोडें भाषाज्ञान, व व्याकरण; म्हणजे झालें. ज्या या अफाट व चमत्कृतिपूर्ण सृष्टींत मनुष्याला सर्व आयुष्य कंठावयाचें तिच्या धर्मांचें व तद्गत विविध कुतूहलांचें ज्ञान याकडे मुळींच पाठ केलेली असते.

वरिष्ठ प्रतीचीं किंवा उदार शिक्षणाचीं जी विद्यापीठें आहेत त्यांत तरी बहुतेक हाच मासला. काव्य, इतिहास, पुराण भाषा, व एकाद्या विशिष्ट शास्त्राचा अनामा म्हणजे आटपली कथा. आमचे शिक्षणपद्धतींत जबर दोष हा आहे कीं तिच्या योगानें विद्यार्थ्यांची जिज्ञासा, शोधकबुद्धि किंवा ज्ञानतृष्णा ही उत्तरोत्तर वृद्धिंगत होत न जातां उलटी मंदावत जाते. विद्यालयीन क्रम केव्हां संपतो आणि या ग्रंथांना केव्हां रामराम ठोकूं, असें विद्यार्थ्याला होऊन जातें. क्षुधादीपीचें चूर्ण घेऊन त्यानें जर अच्छेराचें अन्न पावशेरावर आलें, तर काय म्हणावें? अग्नीवर तूप ओतावें तों तों तो अधिक चेततो, त्याप्रमाणें शिक्षण वाढेल तों तों ज्ञानलिप्सा अधिकाधिक विजृम्भित होत जावी, तर तें शिक्षण.

लबक म्हणतो, विश्वविद्यालयाचा शिक्का मिरविणारांत मला असे विद्वान् आढळले आहेत कीं त्यांना चंद्राला क्षयवृद्धि कां असते हें माहीत नाहीं; व पोवळीं हे किडे आहेत, व्हेल हा मासा आहे, आणि वाघुळ हा पक्षी आहे, असें तें समजतात. इंग्लंड हें आजपर्यंत अनेकवेळा जलमग्न झालें आहे हें त्यांना खरें वाटत नाहीं. आणि हें जग होऊन कायतीं ६००० वर्षेंच झालीं असें ते मानतात. असलया खुळयांना विद्वान् कोणीं

म्हणावें? बरें व्यवहारज्ञान तेंहि भोंपळ्याएवढें! मंडईत भाजीवाली माळीण चट्‌दिशीं गंडे जुळवील, यांना पाटी-लेखणी पाहिजे.

लबकचें म्हणणें कीं हा दोष आमचे शिक्षणपद्धतीचा होय. ती पद्धती फारच संकुचित व नीरस आहे. ठरीव पुस्तकें व घोकंपट्टी यापायीं विद्यार्थ्यांचे ठिकाणीं हरभासपणा येत नाहीं; त्याचा दील खुलत नाहीं. यामुळें शाळा संपण्यापूर्वींच मुलाला विद्येचे अवढणें पडत येतें व ती संपली कीं तो तिकडे पुनः तोंडच करीत नाहीं.

इंग्लंडसारख्या स्वतंत्र, साधनसमृद्ध, व प्रगतिपर देशांत ही रड; मग आमच्या दरिद्री, परतंत्र, व निकृष्टदशापन्न देशाचें तर पुसूंच नका. एक तर उंची शिक्षण पडलें आहे नियंत्यांच्या भाषेंत. हें भाषेचें साधन प्रथम तयार होईल, नंतर तद्गत ज्ञान हातीं लागावयाचें. परंतु ही भाषा स्वभाषेशीं अत्यंत विसदृश असल्यानें तिचें समर्पक ज्ञान संपादण्यांतच अर्धी ज्वानी उतरते. इतकें करून चार ओळी इंग्रजीच्या खरडतां आल्या म्हणजे विद्यार्थ्याला वाटतें कीं आपण झालों विद्वान्. पण खरें पहातां विद्या किंवा ज्ञान जें आहे तें पुढेंच आहे. एवढा वेळ तें न्याहाळण्याचा चष्मा संपादण्यांतच गेला. परंतु हा चष्माच काय तें दृश्यसर्वस्व असें भ्रमानें

समजून बिचारा त्याच्याच झोकांत असतो. हरहर! ही स्थिति मोठी शोचनीय आहे. त्याला हें कळलें पाहिजे कीं ह्या चष्म्याचे साह्यानें जें पारखून घ्यावयाचें तें रत्न वेगळेंच आहे; पण हें त्याला कळत नाहीं. प्रसंगीं, कळूनहि उपयोग नसतो. कारण हा उंची चष्मा खरेदी करण्यांतच बहुतेक भांडवल उडालें असतें, पुढें रत्नें कसलीं नी काय कसलें ?

दुसरा दोष: मेकालेनें त्याच्या देशबांधवासंबंधें म्हटलें आहे कीं, त्यांना स्पेननें अमेरिकेंत केलेले पराक्रम मुखोद्गत आहेत परंतु ज्या युद्धामुळें हिंदुस्थानासारखा कोहिनुर इंग्लंडला मिळाला त्याचें नांवहि श्रुत नाहीं. तोच मासला इकडे आहे. शेफील्ड किंवा मँचेस्टर येथें काय वस्तु होतात तें आमचे मुलांना मुखपाठ आहे; परंतु या शहरांत खडकावर लुगडीं निघतात याची वार्ताहि नाही.

तिसरा दोष, मर्यादित धांव. म्हण आहे, ' देणावळ तशी धुणावळ '. बी. ए. झालेला आणि न झालेला मामलेदारीला एकाच रस्त्यानें जाणार, मग एवढे उरीं डोंगर तरी कशाला घ्या. व 'अर्थकरीच विद्या' कीं 'जीपासून दोन दिडक्या मिळतील, तीच विद्या ' असें विद्येचें व्यावहारिक लक्षण ठरल्यामुळें, जी विद्या पोटाला देईल तीच, व तितक्याच दर्जाची विद्या कम-

विण्याकडे लक्ष असतें. या कारणानें ज्ञानाचें लालन कोणासच सुचत नाहीं.

ईश्वरी योजनेनेंच लहान मुलांचे ठिकाणीं चौकसपणा फार असतो. तीं अक्षयीं ‘ हें काय, तें काय ’ म्हणून विचारून पुरेसें करितात. त्यांचे प्रश्नहि पुष्कळदां इतके बिकट असतात कीं, मी मी म्हणणाऱ्या शहाण्यांना गुंग करतील. आमचे पुतण्यानें मारुतीचे देवळांत घांट वाजवितांना विचारिलें कीं घरांत भांड्याला धक्का लागून नाद उठला तर तो धरावयास सांगतां आणि येथें घंटा मुद्दाम जोरानें वाजवितां हें कसें ? त्याला उत्तर मिळालें ही गोष्ट वेगळी; परंतु, प्रश्न मख्खीदारच. लवक म्हणतो, याप्रमाणेंच बहुतेक बालकांची बुद्धि सहजच तेजस्वी, उत्कट, चौकस, व ज्ञानाविषयीं सतृष्ण असते. आणि अशा अवस्थेंत आह्मी त्यांना शाळांत पाठवितों. पण तेथें गेल्यानें होतें काय म्हणाल तर, त्यांची बुद्धि मठ्ठ होते; जिज्ञासा मंदावते; इतकेंच नव्हे, तर ज्ञानार्जनाची कधीं कधीं त्यांना कायमची शिसारी बसते. एतावता, मुलांची सहजबुद्धि अधिक उद्दीप्त किंवा पल्लवित व्हावी या हेतूनें त्यांस शाळांत पाठवावें तों, समयीं ती कायमचीच खुंटते. आणि सर्व तरतरी मावळून त्यांची जिज्ञासा दरिद्र्याचे मनोरथा-

प्रमाणें ठिकाणींच जिरते. म्हणजे कधीं कधीं आमची * विद्यामंदिरें हीं मुलांची नैसर्गिक स्फूर्ति वाढण्याचे ऐवजीं ती गाडण्याचीं स्थानें होत, असें म्हणावें लागतें.

शाळांतून किंवा कालेजांतून जें शिक्षण दिलें जातें तें पुष्कळसें निरुपयोगी असतें, असें विद्या संपवून पुढें मनुष्य व्यवहारांत आला म्हणजे त्याला कळूं लागतें. व शाळांतून किंवा कालेजांतून जे शिक्षक आहेत त्यांस ही गोष्ट विचारिली असतां तेहि प्रांजलपणें कबूल करितात. परंतु ते म्हणतात, 'येथें आमचा उपाय नाहीं. युनिव्हर्सिटी ज्या प्रकारचे विद्यार्थी मागते तसे आह्मी तयार करितों. आह्मीं काय करावें'? अर्थात् तरुणांच्या कालाचा, श्रमाचा, व द्रव्याचा हा अपव्यय करण्याचें अपयश युनिव्हर्सिट्यांचे माथीं आहे. यास्तव त्यांनींच याचा सदयतेनें विचार करावा; व मुलाला पुढें या विचित्र सृष्टींत आपली लोकयात्रा ज्या ज्ञानाचे योगानें सुखकर करितां येईल असें ज्ञान त्यांस शिकवावें. अर्थात् या ज्ञानांत सृष्टिज्ञानाचा अंतर्भाव प्रामुख्यानें केला पाहिजे; आणि बहुतेक भौतिकशास्त्रांचीं मूलतत्त्वें तरी विद्यार्थ्यांस समजलीं पाहिजेत. ज्यो-

* The School is Sometimes the grave of originality. Lord Avobury. on Peace & Happiness Page 171.

तिष, सृष्टपदार्थविज्ञान, भूगर्भशास्त्र, प्राणी-जीवनशास्त्र, इत्यादि शास्त्रें परस्परविभिन्न आहेत असें पुष्कळ लोक समजतात; पण ही चूक आहे. हीं सर्व एका सृष्टिशास्त्राचींच अंगें आहेत. आणि याचमुळें, आपले शरीरांतील एका अवयवाचें स्वास्थ्य जसें इतरांचे अनामयत्वास अवश्य आहे, तसेंच यांपैकीं एकाचें ज्ञान इतरांचे ज्ञानास पोषक, अतएव आवश्यक, आहे. लॉर्ड ब्रूमचें म्हणणें असे कीं, आपण मुलांस प्रथम सर्व विषयांचें सामान्य ज्ञान देऊन, नंतर कोणत्या तरी विशिष्ट विषयाचे समग्र ज्ञान द्यावें. या विशिष्ट ज्ञानाचा आरंभ वयाचे सोळावे वर्षापूर्वीं नसावा.

कांहींचें म्हणणें एकच विषय सांगोपांग शिकावा. उगाच, यांतलें थोडें त्यांतलें थोडें असें हजार ठिकाणीं तोंड बाटविण्यांत काय चव. एक कवि म्हणतोः—

( श्लोक )

बहूनामिह विद्यानां । मुखं कैःकैर्न चुंवितं ॥
हृदयग्राहिणस्तांसां । द्विलाः संति न संति वा ॥ १

भावार्थः—निरनिराळ्या विद्यांचें केवळ चुंबन करून येणारे शेंकडों; परंतु त्यांचें हृदय गांठणारा एकाद दुसराच.

हें खरें दिसतें; व आहेहि. परंतु आह्मी जे हर विषयाची चव घेण्याचें सांगतों हें सांगणें निराळ्या दृष्टीचें आहे. या सापेक्ष जगतांत असा एकहि विषय नाहीं कीं ज्याचें पूर्ण ज्ञान अन्य विष-

यांचे साह्यावांचून होऊं शकेल. आमचें जुनें यज्ञ-याग प्रकरण वाचूं लागलें तर भूमिती, ज्योतिः-शास्त्र इत्यादि शास्त्रें यासाठींच निर्माण करावीं लागलीं असें दिसतें. अर्थात् बाह्यदृष्ट्या जरी हीं शास्त्रें भिन्न दिसलीं तरी खरें पाहतां तीं याज्ञिकाचीं उपांगेंच, अतएव अवश्य संग्राह्य आहेत, अशी खातरी होते. पूजेंत आपण शिव-पंचायतन, विष्णु-पंचायतन इत्यादि स्वस्तिकें मांडतों, त्यांत मुख्य नांवाचा देव मध्यें मांडतों आणि बाकीचे बाजूला, इतकेंच; बाकी पांचां-शिवाय स्वस्तिक पूर्ण होत नाहीं. त्याचप्रमाणें जें विशिष्ट म्हणून आपण अभ्यासूं त्या शास्त्राचें नांव पुढें करून त्याला साह्यकारी म्हणून उप-शास्त्रांचें अध्ययन करावेंच लागतें. आमचा वेद म्हटला तरी नुसती संहिता घोकल्यानें वेदा-ध्ययन झालें नाहीं. शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष हे सहा विषय जेव्हां पढावे तेव्हां त्याची सामग्री होते. देवळांत देवाची मूर्ति कितीहि सुंदर असली तरी तिच्या मागें प्रभावळ असल्याशिवाय तिच्या रूपास खुलावट येत नाहीं. स्त्रियांचें कुंकू हेंच मुख्य सौभाग्य-चिन्ह खरें; तरी नथ, बुगड्या, केशपाश इत्या-दिकांवांचून सौभाग्याचा सुभगपणा डोळ्यांत भरत नाहीं. रानावनांत अरडी दरडी एकादा

महावृक्ष दिसतो, परंतु त्याच्या मुळ्या शोधीत जावें तों किती दूरवर पोंचलया असतात; कारण तशावांचून त्या वृक्षाचें जीवन किंवा पोषणच अशक्य आहे. हाच न्याय कोणत्याहि एका विशिष्ट शास्त्राचे अभ्यासाला लागू आहे. आपण मुलाला भूगोल शिकवायला निघालों आणि फक्त स्वदेशाचें वर्णन दिलें, आणि इतर देश व भू-खंडें टाळलीं, तर तें भूगोल शिकविणें म्हणावें काय? इतिहास शिकवितांना केवळ चालू शतक शिकवून गत शतकें गाळलीं तर कसें होईल? याचप्रमाणें इतर उपचारक शास्त्रें सोडून कोण-तेंहि एकच विशिष्ट शास्त्र शिकवण्याचा प्रकार हास्यास्पद होणार आहे. म्हणून एक शास्त्र पूर्ण व इतर अनेक संबंधी शास्त्रांची सामान्य ओळख तरी देणें अत्यावश्य—नव्हे, न्याय्य आहे.

लेखक म्हणतो, मुलाला कोणत्याहि विशिष्ट विषयांत अधिष्ठित करण्यापूर्वी त्याला या सृष्टी-संबंधें सामान्यतः पुढील गोष्टी तरी कळविल्या पाहिजेतः—पृथ्वी हा सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या ग्रहमालेंतील एक ग्रह आहे; सूर्य हा स्वतः एक तारा आहे; ह्या ग्रहमालेसारख्या ग्रहमाला या अनंत आकाशांत शेंकडों, हजारों तरी आहेत. इ० इ०. या ज्ञानानें ईश्वराचें कर्तृत्व किती अगाध आहे, सृष्टि किती अनंत आहे, व मनुष्य तींत

किती किमतीचा आहे, हें त्याला समजल्यानें त्याचे ठिकाणीं विनय, सृष्टिप्रेम, ईशभक्ति, इत्यादि कल्याणकारक सद्गुण आरूढ होतील. त्याचप्रमाणें त्याला या पृथ्वीवरील जल-स्थल-विभाग, स्वतःच्या देशाचें व प्रांताचें ज्ञान, रसायनशास्त्र, सृष्टपदार्थविज्ञान, भूगर्भ, प्राणिजीवन, गणित, व्याकरण, लेखन, रेखन, आणि साधल्यास गायनशास्त्र, यांचें देखील थोडथोडें ज्ञान दिलें पाहिजे. म्हणजे एक तर मुलाचे मतीला चतुरस्रता येऊन त्याचे ज्ञानाला चवदारपणा येतो. एरव्हीं एकच एक विषय मुलाला केव्हांहि कंटाळवाणा होतो. शिवाय, या अवांतर विषयांचे ज्ञानानें त्याचें विशिष्टविषयज्ञानहि दृढमूल होतें. याकरितां शिक्षणांत अशी योजना असावी. विशिष्ट विषयाची निवड मात्र होतां होईल तों मुलाच्या सहज प्रवृत्तीचा रोंख पाहून करावी. कारण, पूर्वजन्मसंस्कारांमुळें म्हणा किंवा अन्य कारणांनीं म्हणा, बहुतेक मुलांची उपजतच कोणत्या तरी विशिष्ट विषयाकडे प्रवणता असते. आणि या विषयांचा अभ्यास त्यांकडून करविल्यास, त्यांत ते स्वल्पायासानें तरबेज होतात. एक कवि म्हणतोः—

( श्लोक )

कस्यापि कोऽप्यतिशयोऽस्ति स तेन लोके ।<br>
ख्यातिं प्रयाति न हि सर्वविदस्तु सर्वे ॥

किं मल्लिका फलति, किं पनसः सपुष्पः ।
किं नागवल्यपिच पुष्पफलैरुपेता ॥ १

भावार्थः—कोणाची कोणत्यातरी एका विशिष्ट विषयांत अधिक मति चालते व त्यानेंच तो प्रसिद्धीस येतो. कारण सर्वांसच सर्व गोष्टींचें ज्ञान होत नाहीं. मोगरीला फळ नाहीं, पण तिचे फुलाचीच तारीफ. फणसाला फूल नाहीं, त्याचे फळाचीच वहावा. नागवेलीला फळ न फूल, पण तिचे पानांवरच खाणारांच्या उड्या.

लॅटीन, ग्रीक वगैरे पुराण भाषांच्या अभ्यासाला इंग्लंडांत फारच मान दिला जातो; व त्यांत मुलांचा फार वेळ जातो. ही गोष्ट लबकला पसंत नाहीं. शिवाय तो म्हणतो, ह्या भाषांचा अभ्यास केला तरी चालेल; पण तो केवळ भाषा या दृष्टीनें केला गेल्यामुळें मुलांस फार तर शब्दच्छल करण्याची अक्कल येते, त्यापासून विचाराला उदात्तत्व यावें तें येत नाहीं. म्हणून असल्या श्रमांत फायदा नाहीं. शिकंदर बादशहा होमरचे ' इलियड ' काव्य उशाखालीं ठेवून त्यावर निजे. एवढा त्याला त्याचा नाद असे. आमचे विद्यार्थिगणहि आज पिढ्यानपिढ्या, दुसऱ्या अर्थानें, होमरवर निजतच आले म्हणावयाचे; कारण, त्याचे अभ्यासानें जें ज्ञान होणें इष्ट, तें त्यांस केव्हांच झालें नाहीं.

चित्ररेखन घ्या. यांत तरी नमुना पाहून रेघोट्या ओढल्यानें सार्थक होत नाहीं. प्रत्यक्ष सृ-

ष्टीचें अत्यंत सूक्ष्म व वारंवार निरीक्षण पाहिजे पण आजकाल तें नसल्यानें, रेखनविद्या इतकी पसरली असून व पद्धतवार शिकविली जात असूनहि, पुरातन काळचे लोकांनीं कोरींव लेणीं वगैरेठिकाणीं जें कांहीं चित्ररेखननैपुण्य दाखविलें आहे, त्याची बरोबरी होत नाहीं. लबक म्हणतो, याचें कारण त्या लोकांनीं जें सिंहाचें चित्र काढिलें तें रानांत मृगराजाशीं प्रत्यक्ष परिचित होऊन काढिलें, त्यामुळें तें इतकें हुबेहुब आलें. आह्मी वनाचा सीमांत ओलांडून केसरीचा शब्दहि ऐकिला नसून खोलींत बसून त्याची प्रतिमा काढणार; ती कशी उतरावी? अर्थात् चित्रकला म्हटली तरी सृष्टीचें सूक्ष्म निरीक्षण पाहिजे. कोणाहि प्राण्याचे अवयव सप्रमाण काढणें म्हणजे शारीरशास्त्राची देखील माहिती पाहिजेच.

पुराणकाळीं युरोपांत विद्या मुख्यतः धर्मगुरूंचे हातींच असे. मोठमोठे श्रीमान् किंवा सभ्य गृहस्थ हे अक्षरशून्यच असत. इकडेहि विद्या विशेषतः ब्राह्मणांचे हातीं असे. परंतु, प्रस्तुत हा बंध सुटून तिचा उभयत्र अप्रतिबंध प्रचार सुरू झाला आहे. हल्लीं गरीबगुरीबांचे मुलांना देखील विद्यार्जनाचीं जीं साधनें आहेत तीं पूर्वीं मोठ्या धनाढ्यांनाहि नव्हतीं. लबक म्हणतो, या प्रकारें शिक्षण सर्वगामी करणें हे मोठें खर्चाचें काम

आहे यांत संशय नाहीं. परंतु, ज्ञानप्रसाराचे कामीं कितीहि खर्च लागला तरी कोणत्याहि शहाण्या राज्यकर्त्यानें कुरकुरूं नये. कारण, त्यानें असें खूप समजावें कीं, लोक अज्ञान राहिल्यानें त्याची जी हानि आहे तिजपुढें, ते सज्ञान करण्यांत होणारी द्रव्यहानि ( बाकी ती हानी नव्हेच; तो केवळ व्यय आहे. ) कांहींच नव्हे. यासाठीं त्यानें लोक सज्ञान करण्यांत शक्य तेवढा द्रव्यव्यय करावाच करावा. लोकांनींहि शरीर शृंगारण्यांत पैसे नासण्यापेक्षां आपलें मन विद्यालंकृत करण्यांत ते घालणें फार फायदेशीर. कारण, ते अनेक रूपांनीं घसघशीत सव्याज परत येतील. शिवाय, शारीरिक शृंगारानें होणाऱ्या निवळ नेत्रानंदापेक्षां मनःसंस्कृतीनें होणाऱ्या ज्ञानानंदाची योग्यता कांहीं वेगळीच आहे. ज्ञानी मनुष्य हा आनंदरूपच असतो.

सांप्रत जरी शिक्षणाचा प्रसार, व त्या बरोबर आपली प्रगति, जारी चालू आहे असें पुष्कळदां आपल्यास ऐकविण्यांत येतें, तरी खरी स्थिति उलट आहे. लंडनचा बिशप डॉ० क्रेटन ह्याचे शब्द शिक्षण विषयांत प्रमाण मानितात. तो म्हणतो, "आज १८७० सालापासून, आमचें शिक्षण प्रगतिपर चाललें आहे अशा घमेंडींत आह्मी आहों. परंतु, एवढ्या काळांत आमची

खरी प्रगति तर तिळमात्र झालीच नाहीं; पण उलट कांहींशी पिच्छेहाटच झालीसें मला तरी वाटतें"! आजकाल आह्मांला गुरुस्थानभूत देशाबद्दल हा शेरा आहे; यावरून हिंदुस्थानचे प्रगतीचे घमेंडींत किती हंशील असेल याचा शिक्षणाच्या फुशारक्या मारणारांनींच विचार करावा.

याच विद्वद्वर्य डॉ॰ क्रेटनचें अन्यत्र असें म्हणणें आहे कीं, "व्यावहारिक शिक्षणांत तुम्हाला जर खरी खरी प्रगति पाहिजे असेल तर मूळारंभीं तुम्हीं मुलांस **धार्मिक शिक्षण** दिलें पाहिजे तरच पुढली कामगिरी सुयंत्र होईल". डॉक्टरसाहेबांचें हें म्हणणें सर्वथा खरें आहे. परंतु खेदाची गोष्ट ही कीं, याला अंतःकरणापासून मान देणारीं माणसें उभय देशांत थोडींच आहेत. आमचे देशांत तर धर्माचें नांव काढिलें कीं मनापासून हंसणारे आङ्ग्ल-विद्यालंकृतांत किती तरी आहेत. धर्म म्हणजे एक खूळ आहे असें ते समजतात व त्याची विटंबना करितात.

'व्यक्तिस्वातंत्र्य' व 'मतस्वातंत्र्य' ह्या गुलजार शब्दांनीं आजकाल तरुणांचीं डोकीं अशीं कांहीं भरून गेलीं आहेत, कीं त्यांपुढें त्यांचें बहुतेक भान सुटलें आहे. पण त्यांना हें समजलें पाहिजे कीं, स्वातंत्र्य याचा मोघम शब्दार्थ 'मोकळीक' असा वाटला तरी त्याचा शास्त्रीय अर्थ

समर्यादच आहे. आणि आपल्या घरकुसाचे आंत ज्याप्रमाणें आपण राजे, त्याचप्रमाणें स्वातंत्र्याचा अंमलहि नियमित हद्दींतच पाहिजे. आगगाडीस वेळ पडल्यास ताशीं ६० मैल धावण्याचें सामर्थ्य असलें तरी, तें अमलांत आणण्याची परवानगी नाहीं; आणि तीहि मिळाली तरी रूळ सोडून केंसभरहि जाऊन उपयोग नाहीं. त्याचप्रमाणें व्यक्तिस्वातंत्र्य वापरणें झालें तरी धर्म व नीति यांचे रुळांबाहेर जाईलसें तें वापरणें धोक्याचें आहे, हें या तरुणांचे ध्यानांत वागेल तर बरें होईल.

कोणी कांहीं म्हणो, आमचें असें ठाम मत आहे कीं, आपण काया, वाचा किंवा मन यांचे द्वारें जें जें बरें किंवा वाईट कृत्य उघड किंवा गुप्तपणें कोणत्याहि कालीं किंवा कोणत्याहि स्थलीं करूं त्या कृत्याचें बिनचूक साक्षित्व ठेवून त्या कृत्याच्या बरेवाईटपणाप्रमाणें आपल्याला पारितोषिक किंवा शासन देणारा सर्वज्ञ, सर्वगामी, व सर्वशक्ति परमात्मा सर्वत्र, व सर्वदा आपले शिरावर जागा आहे, आणि त्याचें प्रेम आपण आपल्या सत्क्रियेनें संपादिल्याशिवाय आपली अखेर घडगत नाहीं, अशी दृढभावना मनुष्याचे मनांत अखंड उभी असल्याखेरीज तो सद्वृत्त निपजणें दुरापास्त आहे. किंबहुना ही

भावना असल्याशिवाय मनुष्याचे अंगीं मनुष्य-पणाच येणें कठीण आहे. आणि ती एक असली म्हणजे मनुष्यत्वाला कारक जे सत्य, सौहार्द, विनय, दया, गुरुपूजा, सदाचरण इत्यादि गुण ते अयत्नेंच मनुष्याचे अंगीं बाणतात आणि त्याच्या मनुष्यजन्माचें सार्थक होतें. यासाठीं **इतर सर्व प्रकारचे शिक्षणांच्या पायाला धार्मिक शिक्षण हें अत्यावश्यक आहे.** धर्मभयाचा दडपा किंवा ईशप्रीणनाचा ओढा मनुष्याचे ठायीं असल्याशिवाय तो सद्वृत्त होणें कठीण आहे. याकरितां या दोन गोष्टी ज्या शिक्षणानें त्याचे ठिकाणीं प्राप्त होतील तें शिक्षण त्याला सर्वांआधीं दिलें पाहिजे. मग तुम्ही त्याला कोणतेंहि नांव द्या, आणि तें कोणत्याहि प्रणालीनें शिकवा.

शिक्षणासंबंधी बोलणें म्हणजे त्यांत शिक्षकासंबंधी दोन शब्द तरी सांगणें भाग आहे. लेखक म्हणतो, खरोखर शिक्षकाचा धंदा फारच महत्त्वाचा आहे. एक विद्वान् इंग्रज गृहस्थ म्हणाले, “एकादी शाळा वीस वर्षेंपर्यंत माझे हवालीं करा, म्हणजे मी तेवढ्यानें वीस पिढ्यांचें कल्याण करून दाखवीन”. या शब्दांची उंचीखोली जर प्रत्येक शिक्षक म्हणवून घेणाराचे ध्यानीं वागेल, तर शिक्षणाचा उदय किती तरी झपाट्यानें होईल. परंतु वस्तुस्थिति इतपत नाहीं.

असो. शिक्षकाचें ज्ञान जितकें पोक्त असेल तितकें शिष्याचे पथ्यावर अधिक पडेल, हें लक्षांत ठेवून शिक्षकाचा धंदा करणारांनीं स्वतःचे ज्ञानाला अक्षयीं भर घालीत राहिलें पाहिजे. शिवाय, शिक्षक ज्ञानानें वरिष्ठ असला तरीहि त्याला "बालादपि सुभाषितं ग्राह्यं" हा न्याय मान्य असावा. कारण, ज्यांनीं अंगीं शिक्षकाचा धंदा केला असेल, ते अशी साक्ष देतील कीं, कधीं कधीं एकाद्या विद्यार्थ्याची कल्पना विशिष्ट विषयांत शिक्षकापेक्षांहि सरशी चालते. अशा वेळीं अभिमानी शिक्षक अपमानभयास्तव त्या कल्पनेचा अंकुर चिरडूं पाहतात, परंतु हें अक्षम्य अनौदार्य आहे. लबक म्हणतो, कधीं कधीं आपण आपली अक्कल दुसऱ्यावर लादणें मूर्खपणाचें असतें; म्हणून रास्त असेल तें विद्यार्थ्याचेंहि ऐकावें. निदान आपल्याला येत नसेल तें शिकविण्याचा आव आणूं नये; व संधी आल्यास तें कोणापासूनहि उचलण्यास लाजूं नये. दुसरी गोष्टः मुलांना शिकविणें म्हणजे शिक्षकानें आपलें ज्ञान विद्यार्थ्याचे घशांत सारखें ओतीत राहणें हें नसून, त्याचे अंगीं असलेल्या नैसर्गिक धीशक्तींस पाणी घालून विकसित करणें व विद्यार्थ्याचे ज्ञानाचा त्याचे वर्तनावर परिणाम होईल असा यत्न करणें, याचें नांव शिकविणें. बेकन म्हणतो,

"शिक्षणाचा उद्देश मनुष्याचे अंगीं भांडखोरपणा, आळशीपणा किंवा वाचाळपणा आणणें हा नसून, प्रत्येक गोष्टीबद्दल सारासारविचारशक्ति उत्पन्न करणें हा असावा".

एकदां एका बड्या शाळा-गुरूनें आपल्या विद्यार्थ्यांस सक्तीची ताकीद दिली कीं, तुम्ही परस्परांवर प्रेम न केल्यास फटके मिळतील! लबक्र म्हणतां, असल्या गोष्टी धाकदपटशानें कशा व्हाव्या? अशा कामीं शिक्षकानें स्वतःचें वर्तन सर्वथा उदाहरणीय व अनुकरणीय ठेविलें पाहिजे. त्याची स्वतःची प्रेमळ वाणी, उदार विचार, व सदय वर्तन यांनीं जो सुपरिणाम विद्यार्थ्यांचे मनावर होईल तो चवदावे रत्नाचा होणार नाहीं. कोणत्याहि रोपड्याची वाढ उफाड्यानें होण्यास ज्याप्रमाणें त्याचे बुडाशीं पाण्याचा थंडावा व डोईवर सूर्याचा कडाका, हीं दोन्ही पाहिजेत, त्याचप्रमाणें विद्यार्थ्यांची योग्य निपज होणें तर शिक्षकाचे अंगीं दयार्द्रता व न्यायकार्कश्य हे दोन्हीहि गुण यथाप्रमाण पाहिजेत. केवळ झोड्या मास्तरहि उपयोगी नाहीं आणि मेण्याहि फुकटच समजावा. कालिदासानें जसें म्हटलें आहे: "न खरो नच भूयसामृदुः" कठोरहि नव्हे किंवा नरमहि नव्हे, असा प्रकार पाहिजे.

लहान मुलांच्या शिक्षणाचें काम त्यांना शा-

ळांत घालून शिक्षकांचे राखणेस घातल्यानें झालें असें कित्येक आईबापें तोंडानें कबूल करीत नसलीं तरी वर्तनानें दाखवितात. पण ही त्यांची मोठी चूक आहे. विद्यालयीन शिक्षक मुलाचें पुष्कळसें कल्याण करूं शकतात, ही गोष्ट जरी निर्विवाद आहे, तरी मातापितरांचे शिकवणीचा परिणाम शिक्षकाचे शब्दापेक्षांहि अधिक होतो. फेनेलॉनला एका मित्रानें विचारिलें कीं, मी आपली मुलगी एका धार्मिक विद्यागृहाचे अध्यापिकेचे स्वाधीन करणार आहें, हें तुला पसंत आहेना? फेनेलाननें उत्तर केलें, "त्यापेक्षां तूं माझें ऐकशील तर मुलीचे आईलाच ही कामगिरी सांग". हें त्या विद्वानाचें म्हणणें आईबापांनीं विचार करण्याजोगें आहे. आमचा एक पदवीधर मित्र आह्मास ह्या लेखाचा पूर्व भाग वाचीत असतां म्हणाला, जी सहिष्णुता व संतोषवृत्ति माझे सहचारिणीचे अंगीं आढळते, ती, मी इतका थोरला विद्वान् होऊनहि माझे अंगीं नाहीं. आणि मनाशीं शोध करितां मला असें दिसलें कीं, आमचे बायकोचे मनावर हा परिणाम आमचे सासूबाईचे गृहशिक्षणानेंच झाला आहे. या उदाहरणाचें महत्त्व प्रत्येक आईबापानें मनांत वागवून चाललें असतां मुलांचें अधिक कल्याण होईल.

बहुधा मनुष्यें प्रत्येक गोष्टीचा न्याय स्वतःचे

प्रियाप्रियतेप्रमाणें करीत असतात. जो मद्य-द्वेष्टा असतो तो मद्याचे नांवाबरोबर रोमांचित होऊन मागें सरतो; जो मद्यपी असतो, तो म्हणतो कीं, खिशांत पैसे आहेत तर अगोदर डोज चढविलाच पाहिजे. जो अळसडा किंवा सूर्यवंशी असतो त्याला उद्योगी किंवा लौकर उठणारीं माणसें मूर्ख वाटतात. जो उद्योगी असतो त्याला रिकामटेंकडा मनुष्य दिसल्यानें क्लेश होतात. ज्या मनुष्याचा एकदां असा समज भरला कीं, समरसाहस करणें हाच खरा पुरुषार्थ आहे, तो आपलें शीर रणभूमीवर निःशंक अर्पण करील.

एतावता, प्रत्येक मनुष्य कोणत्याहि कामीं आपल्या भावनेप्रमाणें किंवा कल्पनेप्रमाणें पाऊल टाकीत असतो. यासाठीं बाळपणींच मुलांचे मनांत उदात्त विचार पेरून दिले पाहिजेत. आपणांपैकीं प्रत्येकाला थोड्यानें, बहुतानें मानवी ज्ञानाला व सुखाला भर घालतां येणें सुसाध्य आहे, हा विचार मोठा उत्साहवर्धक आहे. मनुष्याचे शिक्षणाचा आरंभ मातेचे अंकावर होऊन त्याचा क्रम देहपातापर्यंत चाललाच पाहिजे; तरच तें शिक्षण. म्हणून शाळांतून किंवा विश्वविद्यालयांतून सुटलों म्हणजे शिक्षण संपलें, असें कोणीहि समजणें चुकीचें आहे. त्याचप्रमाणें शि-

क्षणाचे योगानें मनुष्याचे ठिकाणीं सच्छील, सदभिरुचि, महात्मता, भूतदया, इत्यादि गुण जर बाणले नाहींत, आणि ज्या ह्या निरातिशय सुंदर व चमत्कृतिपूर्ण जगतांत मनुष्य रहातो त्या जगताबद्दल कौतुक व त्याचे कर्त्याबद्दल प्रेम व आदरबुद्धि हीं जर त्याचे हृदयांत उत्पन्न झालीं नाहींत, तर तें शिकणें आणि शिकविणें, " बोलणें फोल झालें, डोलणें वायां गेलें " या म्हणीप्रमाणें व्यर्थ होय !

( श्लोकार्ध )

समोऽहं सर्व भूतेषु । न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ॥

**—श्रीमद्भगवद्गीता**

**भावार्थः**—भगवान् म्हणतातः मी सर्वांशींच सारखा. मला कोणी द्वेष्यहि नाहीं आणि प्रियहि नाहीं.

( श्लोक )

हिरण्यभूमिलाभेभ्यो । मित्रलब्धिर्वरा यतः ॥
अतो यतेत तत्प्राप्त्यै । रक्षेत्सत्यं समाहितः ॥ १

**—याज्ञवल्क्य स्मृति**

**भावार्थः**—ज्या अर्थी मित्रप्राप्तीचें महत्त्व सुवर्णलाभ किंवा भूमिलाभ यांपेक्षाहि अधिक आहे त्या अर्थी सन्मित्रसंपादनार्थ यत्न करावा; व स्वस्थचित्तें सत्य रक्षण करावें.

( श्लोक )

क्षीरेणात्मगतोदकाय हि गुणा दत्ताः पुरा तेऽखिलाः ।
क्षीरेतापमवेक्ष्य तेन पयसा ह्यात्माकृशानौ हुतः ॥
गंतुं पावकमुन्मनस्तदभवद्दृष्ट्वा तु मित्रापदं ।
युक्तं तेन जलेन शाम्यति सतां मैत्री पुनस्त्वीदृशी ॥ १

**—भर्तृहरि**

**भावार्थः**—दुधांत पाणी मिसळून चुलीवर ठेविलें तेव्हां दुधानें पाण्याशीं दोस्ती केली. हें पाहून पुढें दुधाला जेव्हां ताप ( आंच ) होऊं लागला तेव्हां पाण्याचा जीव ( त्याजसाठीं ) उडून चालला. पाण्याची ही दशा पाहतांच त्यासाठीं दूध पुनः आगींत उडी घेऊं लागलें. इतक्यांत पुनः जेव्हां त्याला पाणी भेटविलें तेव्हां तें ठिकाणीं बसलें. ( दूध तापतांना उतास जातें त्यावर हें रूपक आहे ). सज्जनांची मैत्री या प्रकारची आहे.

# प्रकरण ९

## शत्रु–मित्र

( श्लोक )

न कश्चित्कस्यचिन्मित्रं । न कश्चित्कस्यचिद्रिपुः ॥
कारणेन हि जायंते । मित्राणि रिपवस्तथा ॥ १

––हितोपदेश

गोव्याघ्र, अहिनकुल, इत्यादिक शाश्वतिक विरोधांची गोष्ट वेगळी; एरव्हीं मानवी व्यवहारांत उपजत कोणाचा कोणाशीं मित्रभाव किंवा शत्रुत्व यांतील ठरीव कांहींच नाहीं. शत्रु किंवा मित्र आपण आपल्या कृतीनें निर्माण करितों. कांहीं लोक यत्नपूर्वक लोकशत्रुत्व संपादतात. आणि शत्रुत्व संपादणें ही गोष्ट उघडच अल्पायासाची आहे. एका गैरशब्दानें जन्माचा मित्र वैरी झाल्याचीं उदाहरणें आहेत. बाकी, शत्रु तरी उदार आणि न्यायप्रिय असेल तर तो मूर्खमित्रापेक्षां एका अर्थीं बरा. कारण मित्र पुष्कळदां मुरवतीस्तव आपले दोषांवर पांघरूण घालतो; परंतु, वैरी आपले दोष बिनभाड आपले नजरेस आणून देतो. म्हणूनच तुकोबा म्हणतातः " निंदकाचें घर असावें शेजारीं ". आतां, हा एक शत्रूचा गुण जरी घेण्याजोगा असला तरी, शत्रु तो

शत्रुच, तो सुखदायक कधीं होणार नाहीं. कारण, 'यत्रास्ते विषसंसर्गोऽमृतं तदपि मृत्यवे'—जेथें विषाचा संपर्क आहे तेथील अमृतहि मृत्युकारक समजावें. याचप्रमाणें गुणहि झाला तरी शत्रूचा तो, आपल्या पथ्यावर कितीसा पडणार? तेव्हां, शत्रुत्व हें एकंदरींत अनिष्टच आहे. पण, उलटपक्षीं सन्मित्राचीहि जगतांत महागाईच आहे, व निवड फार कठीण आहे. पुष्कळदां आपणांस मित्र म्हणविणारे अंतर्यामीं आपले हितशत्रु असतात, असा अनुभव येतो. फ्रेंच राजा चौदावा लुई याची आज्ञा घेऊन मार्शल व्हिलर्स जेव्हां ससैन्य रणभूमीवर निघाला, तेव्हां त्यानें लुईला म्हटलें, " खाविंद, आपल्याला शत्रूंची फिकीर नको, त्यांना मी पाहून घेईन; पण आपण माझे मित्र म्हणविणारांवर मात्र सक्त नजर राखा; कारण, ते केव्हां फशीं पाडतील याचा नेम नाहीं". ठीकच आहे—

( श्लोक )

परोक्षे कार्यहंतारं । प्रत्यक्षे प्रियवादिनं ॥
वर्जयेत् तादृशं मित्रं । विषकुंभं पयोमुखं ॥ १

**भावार्थः**—मानकापू तोंडपुज्या मित्राचा, तोंडीं दूध आणि खालीं विष भरलेल्या घड्याप्रमाणें अव्हेर करावा.

वैद्यशास्त्रांत कांहीं रसायनें व आसवें तयार करण्यास सांगितलीं आहेत. या औषधांची खुबी अशी आहे कीं, तीं जुनीं होत जातील तों तों

रुचीस व गुणास चढत जातात. मित्राचीहि गोष्ट अशीच आहे. स्नेह जितका अधिक जुना, तितका अधिक हितावह. जगतांत चिरंतन सौहार्द हें पुरातन रसायणाप्रमाणेंच दुर्मिळ व बहुमोल आहे. म्हणून सुज्ञानें त्याचा अवश्य संग्रह करावा. पण, मैत्री प्रथमच पुराणी कशी व्हावी? एकदां केव्हां तरी ती नवी असणारच. तथापि, आपलें कर्तव्य इतकेंच कीं, जोडलेला स्नेह 'कामापुरता मामा' या न्यायाचा नसून तो शाश्वत राहील असें करावें. स्नेह वापरण्याला देखील अक्कल लागते. पुष्कळ लोक, पहावें तों, कांहीं काळ अगदीं एका तोंडानें पाणी पीत असतात, आणि पुढें फाटतात. त्यांस विचारावें 'कांहो, ते फलाणे आतांशा आपलेकडे येत नाहींत'? ते उत्तर करितात, 'आमचें त्यांचें बिनसलें आहे'. हें एकदां जुळतें कसें, आणि मग बिनसतें कसें? अर्थात् त्या दोन मित्रांपैकीं कोणीतरी एक मूर्ख अथवा दुर्जन असला पाहिजे. दोघे सज्जन असतील तर त्यांचा प्रणय एकदां जडला कीं आमरणांत राहिलाच पाहिजे. दुर्जनांचा स्नेह मृत्घटासारखा सुखभेद्य असतो, परंतु सज्जनांचा स्वर्णपात्रासारखा दुर्भेद्य असतो. ज्यांना मित्र राखतां येत नाहींत ते मनाचे खोटे असें समजावें. कारण, दृढसौहार्द हीच मनाचे चांगुलपणाची

निशाणी आहे. लबक म्हणतो, आयुष्यांत एकलकोंडेपणासारखी दुसरी शिक्षा नाहीं; आणि मित्रसंगमासारखा दुसरा आनंद नाहीं. कवि म्हणतो:

( श्लोक )

यस्य मित्रेण संभाषा । यस्य मित्रेण संस्थितिः ॥
यस्य मित्रेण संलापस्ततो नास्तीह पुण्यवान् ॥ १

—हितोपदेश

सन्मित्राचें एवढें माहात्म्य आहे. आणि खरेंच,—

( श्लोक )

न मातरि न दारेषु । न सोदर्ये न चात्मजे ॥
विश्वासस्तादृशः पुंसां । यावन्मित्रे स्वभावजे ॥ १

—किरात

म्हणजे मनुष्याचा सहज मित्रावर जो विश्वास असतो तो प्रत्यक्ष माता, स्त्री, बंधु, किंवा पुत्र यांवरहि नसतो. अस्सल स्नेहाचीं फारच हृदयद्रावक उदाहरणें इतिहासांत आढळतात. जोनॅथन याचें जें डेव्हिडविषयीं प्रेम होतें तें स्त्रीचे प्रेमाहूनहि आगळें होतें, असें वर्णन आहे.

( श्लोक )

अकिंचिदपि कुर्वाणः । सौख्यैर्दुःखान्यपोहति ॥
तत्तस्यकिमपिद्रव्यं । योहिं यस्य प्रियो जनः ॥ १

—उत्तररामचरितम्

भावार्थः—प्रिय मित्र म्हटला म्हणजे तो कांहीं न करीना, तरीहि सुख देऊन दुःख हरण करितो. कारण ज्याला जें प्रिय तें लाखमोल वाटतें.

भवभूतीनें सीता व रामचंद्र यांच्या स्नेहाचें

वर्णन रामचंद्राचे मुखानेंच केलें आहे, त्यांत म्हटलें आहे:—

( ओंव्या )

जें हृदयाचें विश्रांतिस्थान। जेथें प्रेमरसाचें मान।
कधींहि होईना न्यून। वयोभेद झाला तरी ॥१
मध्यें आलिया आवरण। काळें करूनि त्याचें निवारण।
होतां पहिल्यापरी पूर्ण। स्नेहसत्त्वीं राहिजे ॥ २

**—परशुरामपंत तात्या**

परंतु, याच गोड वर्णनाचे शेवटीं एक खेद-कारक शेरा आहे कीं, “ कथमप्येकं हि तत्प्राप्यते—असला स्नेह मोठ्या कष्टानें लाभतो ”. खरेंच, अस्सल स्नेही विरळागत आढळतो. आणि ज्याला सुदैवानें आढळेल, त्यानें तो सर्वात्मना राखावा. शेक्स्पिअर म्हणतो:—

( साकी )

सुपरीक्षित जो असे मित्र त्या, घट्टप्रेमरशनांहीं ॥
आंवळुनीयां हृदयीं ठेवीं; रत्न तयासम नाहीं ॥१

लबक म्हणतो, अशा मित्राला साता काळ-जांपलीकडे वागवा. असल्या मित्राचे योगानें समृद्धीला सौभाग्य चढतें, व आपत्ति सुसह्य होते. व असें त्यापासून उभयावस्थेंत हित आहे, म्हणून सन्मित्राचें अभिनंदन करा; त्याला साह्य करा; त्यासाठीं श्रम करा; संकटीं त्याचा बचाव करा; त्यावर कोणीं हल्ला केल्यास त्याचे खांद्याशीं खांदा देऊन उभे रहा; त्याचे सुखानें सु-

खी व दुःखानें दुःखी होत जा, आणि विपद्ग्रस्त तो दिसल्यास त्याचें सांत्वन करीत जा; तरच तुम्हीं आपलें कर्तव्य केलेसें होईल.

अरब लोकांत असा समज आहे कीं, ज्याचें आपण एकवार मीठ खाल्लें त्याशीं दगलबाजी करणें हा अक्षम्य विश्वासघात आहे. आपल्याकडेहि रामोशी लोक जरी एवढे कठोर हृदयाचे व घातुक आहेत तरी त्यांनीं ज्याचा एकदां दूधभात खाल्ला त्याचे वाटेस ते स्वतः जात नाहींत किंवा आपले जातभाईसहि जाऊं देत नाहींत, असा लौकिक आहे. रोमन लोकांचें म्हणणें वेगळें होतें. ते म्हणत, एकवार मीठ खाल्ल्यानें दोस्ती धरणें ठीक नाहीं. दहापांच मण मीठ खावें तेव्हां पक्का दोस्ताना करावा. ह्या म्हणण्यांत कावेबाजी अधिक आहे; तथापि सहृदयता कमी आहे. सबब हें म्हणणें सज्जनांना पटणारें नव्हे.

एक वेळ स्नेह्याचे ठिकाणीं नसते सद्गुण कल्पणें बरें, पण त्याचे असते गुणांची पायमल्ली करणें किंवा त्याचे दोष फुगवून दाखविणें हें सर्वथा अनुचित आहे. जोबर्ट ह्यानें बोमंटबाईला लिहिलें, ' तूं आजारी होतीस, तें प्रकृतिमान आतां बदललें असेल अशी मला आशा आहे. इतर गोष्टींत तुझे ठिकाणीं कधींच बदल

होणारा नाहीं अशी माझी खात्री आहे. कारण तूं स्थिरप्रेमी आहेस. तेव्हां त्याबद्दल कांहींच लिहिण्याचें कारण नाहीं'. याचें नांव स्नेह. याचें नांव विश्वास. आतां स्नेही झाला म्हणून त्याला भलतेंच गैर काम करावयास सांगूं नये; व त्यानेंहि दुष्कृत्यांत आपलें साह्य मागूं नये. कारण, स्नेह हा सद्गुणांचा आधार असावा, दुर्गुणांचा उत्तेजक नसावा.

आपण अत्यंत हीनस्थितींत असलों तरीहि सद्भावप्रेरित असल्यास दुसऱ्याला किती तरी सुखी करतां येणें शक्य आहे.

( श्लोकार्ध )

दीपाचे किरण जसे सुदूर जाती ।
सत्कृत्यें अधमजनींहि सार्थ होती ॥

—शेक्स्पिअर

स्पष्टवक्त्या स्नेह्याला कांहीं लोक अंमळ नाकें मुरडतात. पण ज्याचें स्पष्टवक्तृत्व असें अप्रिय होतें त्याचे ठिकाणीं कळकळीचा भाग कमी असून दोषाविष्करणाचाच भाग अधिक आहे, असें समजावें. खरा स्नेही आहे तो प्रसंग दिसल्यास आपली कानउघाडणी करण्यास चुकणार नाहीं, हें खरें; पण तो आपला फजिता किंवा बाजार करणार नाहीं. ग्लॅडस्टन म्हणे: "शत्रूला कोणीहि पुरा पडेल, पण मित्राला पुरा पडणारा बहाद्दर विरळा".

बाकी, स्पष्टोक्तीखालीं मित्राचा बाजार करणारां-
चा वर्ग सुदैवानें अल्प आहे, हें ठीक आहे.

आपल्याला अकस्मात् एकादी अजब नवीन कल्पना सुचली असतां चित्तास विलक्षण सुख होतें, असा अनुभव येतो. तथापि प्रेमरसायनाची गोडी त्याहूनहि विलक्षण आहे. स्नेह्यास्नेह्यांचें मनांत मन घालून जें सप्रेम संभाषण चालतें त्यासारखी दुसरी मिठाई नाहीं. पति-पत्नीभाव घटकाभर एकीकडे ठेवून केवळ प्रेमी या दृष्टीनें रामचंद्रानीं सीतेच्या भाषणाचें जें वर्णन केलें आहे, तें ज्याला अनुभवावयास सांपडेल त्याला स्वर्ग देखील ठेंगणा आहे, असें आह्मास वाटतें. प्रभु म्हणतातः—

( श्लोक )

जीं म्लानजीव कुसुमास विकासवीतीं ।
सर्वेंद्रियांस सुख देउनि मोहवीतीं ॥
सस्नेह तीं सुवचनें कमलेक्षणेचीं ।
कर्णामृतेंचि हृदयासि रसायनेंचि ॥ १

—भवभूति

प्रियमित्राशीं संभाषणाचें हें वर्णन केलें खरें; पण एथेंच एक गोष्ट सांगितली पाहिजे. ती ही कीं, हें संभाषणच असावें, विवाद किंवा वितण्डा असूं नये. पुष्कळदां असें होतें कीं, स्नेहीस्नेही प्रथम एकादे गोष्टीवरून सहजगति बोलूं लागतात. बोलतां बोलतां मजल विवादावर येते.

तसें झालें म्हणजे मनुष्य इरेस चढून नेटानें बोलूं लागतो. तो आग्रहानें बोलूं लागला म्हणजे प्रसंगीं त्याचे मित्रास तें विषम लागतें. मग तोहि अभिमानास पेटून उलट बिनकसूर हल्ला करूं लागतो. अखेर प्रकरण चिरडीवर जाऊन कायमची फाटाफाट होते. वादच आरंभला आणि त्यांत आपला पक्ष निर्बाध आहे अशी आपली खातरी असली म्हणजे हिशोबींच आपण प्रतिपक्षाच्या मताचा निषेध करितों. परंतु, तो मताचा निषेध स्वतःचा तिरस्कारसा त्यास भासून तो अपमानित होतो आणि मित्रभावाचें भान सुटून एकेरीवर येतो; आणि शेवटीं गोष्ट विकोपास जाऊन स्नेहच्छेद होतो, असे जगांत अनुभव आहेत. यःकश्चित् सोंगट्यागंजिफांच्या खेळावरून वाद जुंपून प्रेमभंग झाल्याचीं उदाहरणें आहेत. याकरितां ज्यांना आपली मैत्री अखंड नांदावी अशी इच्छा असेल, अशांनीं वादाचे भरीस पडूं नये. कवि म्हणतोः—

( श्लोक )

इच्छेच्चेद्विपुलां मैत्रीं । त्रीणि तत्र नकारयेत् ।
वाग्वादमर्थसंबंधं । तत्पत्नीपरिभाषणं ॥ १

भावार्थः—अखंड मैत्रीची इच्छा असल्यास स्नेह्याशीं वाद, पैशाचा*व्यवहार व त्याचे स्त्रीशीं गप्पा मारीत बसणें, हें वर्ज्य करावें.

---

* "Short reckonings make long friends" अशी इंग्रजींतहि म्हण आहे.

वरील उपदेश सर्वथा घेण्यासारखा आहे. वाद न करण्यांत दुसरा हेतु असा आहे कीं, एक तर मनुष्यस्वभावच असा आहे कीं वादानें पराजित झाला तरी मनुष्य आपला अंतर्यामचा ग्रह सोडीत नाहीं. फार झालें तर निरुत्तर होऊन तो तोंड मिटील; पण कृतीला चुकणार नाहीं. एतावता वाद विफलच. तिसरी गोष्ट पुष्कळदां वाद म्हणजे शब्दार्थाची विप्रतिपत्ति असते. **लॉक** म्हणतो, "तत्त्वज्ञानांतील पुष्कळ वाद पहावे तों एकाच शब्दाचे वेगवेगळे अर्थ केल्यानें उद्भवले आहेत. एकानें म्हणावें 'कर्त्यानें' हा शब्द याच अर्थी योजिला आहे, दुसऱ्यानें म्हणावें, नाहीं, अमक्या अर्थी योजिला आहे, कीं झालें भांडण सुरू. पण अखेर बघावें तों त्यांत अर्थ कांहीं नसतो". हा प्रकार केवळ तात्त्विक विषयांवरील वादांतच असतो असें नाहीं. जगतांतील बहुतेक वादांचें रहस्य हेंच असतें. कोणत्या तरी मुद्याच्या शब्दाबद्दल एका पक्षाचा गैरसमज झालेला असतो. किंवा एकानें बोललेलें असावें एक; मधल्यानें सांगावें भलतेंच, आणि तिसऱ्यानें तेंच जमेस धरून पहिल्याशीं भांडावयास उठावें आणि रणें पडावीं. किंवा, एकानें जावें विनोदानें बोलायला, तें दुसऱ्यानें धरावें खरेंखुरें, आणि म्हणतात तशी मस्करीची कुस्क-

री होऊन अंतीं विपट पडावें: असा चमत्कार होतो. अथवा आपण सद्भावानें एकाद्याला बरी गोष्ट सांगूं जावें आणि त्यानें मर्मोद्धाटन केलेंसें मानून उलटून पडावें, म्हणजे 'धर्म करावयास जावें तों कर्म उभें राहतें' किंवा 'निमाज पडावयास जावें तों मशीद गळ्यांत यावी', तसा प्रकार होऊन कायमचें वैमनस्य पडतें व उभयतांचे जीवाला जन्माचा रोग जडतो. असे मासले दुनियेंत हमेष होतात. यासाठीं शहाण्यानें स्नेह्याशीं वाद मांडूं नये.

गेटीच्या नाटकांतील एका पात्रानें आपल्या बहिणीसंबंधें म्हटलें आहे कीं, "माझा मेहुणा आणि माझी बहीण हीं दोघेंहि म्हटलें तर योग्य माणसें होतीं, पण त्यांच्यांत एक गोम असे. केव्हांहि नवरा बायको स्वस्थ एकत्र बसलीं म्हणजे दोघांनीं हशीखुशींत प्रेमळ गोष्टी कराव्या तें टाकून, तीं दोघेंहि शहाणीं असल्यानें, एकमेक आपलें मत दुसऱ्यावर लादूं पाहत; नवऱ्याला वाटे कीं बायकोला आपल्या मताची करून घेतली म्हणजे उभयतांचें मेथकूट चांगलें जमेल. तिला वाटे कीं नवऱ्याचा ग्रह आपल्याप्रमाणें झाला म्हणजे दूधसाखरेचा मिलाफ होईल. परंतु, उभयतांचा सदुद्देश असूनहि, परिणाम विपरीत होई, आणि अधिक गट्टी जमावयाचें बा-

जूस राहून तुट्टीची पाळी येई ". म्हणून वादापासून दूर असावें.

ही सूचना खासगी भाषणासंबंधें झाली. चारचौघांत किंवा समाजांत भाषण करण्यास तर अंगीं याहूनहि अधिक धूर्तता व सावधपणा पाहिजे. समाज म्हणजे भिन्नरुचि ठरलेलाच. एकाला इतिहास रुचला, तर दुसऱ्याला ललितकला प्रिय असतील. तिसऱ्याला रसायनशास्त्र आवडेल. यास्तव, समाजांत बोलणें तर सर्वांस करमणूक होईल अशा सामान्य विषयावर बोलावें.

या विचित्र जगांत प्रत्येकाची रुचि निराळी. मनुष्य हा संगतिप्रिय प्राणी खराच, पण त्यांतहि पुष्कळांना भरवस्तींत शहरांत राहणें आवडतें. म्हणच पडली आहे: " एकदा खावें, पण शहरांत रहावें". अशांना शहरांत प्रत्यहीं नव्या नव्या चेहऱ्यामोहऱ्यांचीं स्त्रीपुरुषें पाहण्यांतच सुख वाटतें. लग्नकार्यांत रस्त्यांनीं स्त्रीपुरुषांचा रंगीबेरंगी ताफा चालला असतां हातचें काम टाकून खिडक्यांत उभीं राहून नेत्रनिर्वाण साधणारीं शोकी माणसें कितीतरी आढळतात. अशांना खेड्यापाड्यांत राहून पशुपक्ष्यांची व वनस्पतींची संगती रुचत नाहीं. कदाचित् कोणाचे आग्रहावरून असले लोक खेड्यापाड्यांत गेलेच तर पुष्कळजण जमून जातात, आणि तेहि आडवा-

टेला जात नाहींत. पण त्यांना हें समजत नाहीं कीं सृष्टीचें खरें सौंदर्य अनुभवणें तर एका बाजूलाच गेलें पाहिजे, आणि बरोबर घोळका उपयोग नाहीं. फार तर जीवाचे एक दोन सोबती असले म्हणजे बस. नाहीं तर घोळक्यानें वन्यपशु, पक्षी भीत होऊन पळून जातात; फलपुष्पांचाहि उपमर्द होतो, आणि खरी मौज नाहींशी होते. स्पष्ट बोलणें म्हणजे, असल्या लोकांना जानपदलक्ष्मीचें सौंदर्य कळतच नसतें. मॅडम डी. स्टेल म्हणे, " माझे गांवचे नदीसारखी दुसरी नदीच मला दिसत नाहीं ".

दुसरीं कांहीं माणसें एकांतप्रिय असतात. अशांना भरवस्तींत आल्यानें कण्वशिष्य शार्ङ्गरवाप्रमाणें " हें गृह सर्वहि कां पेटे " असें होऊन जातें. अशांचा भर आमचे मुग्ध मुनिकन्येप्रमाणें हरिणबालकें, सहकार, वनज्योत्स्ना, कोकिलकूजित इत्यादिकांत असतो. आमच्या सीता माईलाहि बागबगीच्याचा फार नाद असे. भवभूति म्हणतो, " सर्वथा प्रियारामाहि वैदेह्यासीत् । "—मधुगन्धि वनांत रामचंद्रासह राहणें हें तिला अयोध्यावासाहून प्रियतर वाटे. जे तत्त्वजिज्ञासु असतात अशांना सद्ग्रंथांचा परिचय प्रिय असतो. यांतील बहुतेकजणांना ग्रंथभांडारें, वस्तुसंग्रहालयें व तात्त्विक विषयांवर संभाषण यां-

तच गोडी वाटते. आणि लबक म्हणतो, या तीनहि गोष्टी निर्मल व उदात्त सौख्य देणाऱ्या आहेत यांत शंकाच नाहीं. सिसिरो म्हणतो, यांतच समानविद्वत्तेच्या एकाद्या मित्राचे संगतीची भर असावी, म्हणजे मग हें सुख केवळ अवर्णनीय आहे. संपत्तीचीं सुखें यापुढें मूग गिळतील. आणि आजपर्यंत जे नामांकित ज्ञाते होऊन गेले त्यांनीं असल्या निर्मळ संगतीची ज्या अर्थीं प्रशंसाच केली त्या अर्थीं तिचा महिमा तसाच असला पाहिजे.

आपल्यांत एक म्हण आहे—दोन्ही डोळे शेजारीं, भेट नाहीं संसारीं. अशांतलाच प्रकार या जगांत कधीं कधीं आढळतो. दोन मनुष्यें आजन्म एकत्र असूनहि परक्यासारखीं असतात. एकाचे हृदयांतील सुखदुःखांचा ठाव त्याच्या सोबतीच्याला कसा तो नसतो. बरें, हा प्रकार केवळ तिऱ्हाईतांचाच नव्हे; ज्यांना जग एकजीव समजतें अशांतहि तो असतो, हें पाहून विस्मय वाटतो. लार्ड हूटन म्हणतोः—

( श्लोक )

विपत्संपत्कालीं बहुदिवस एकत्र वसलीं ।
तरी ना अन्योन्या वळख हृदयांतील दिसली ॥
कळेना, कां केली सहवसति त्यांनीं बहुदिन ।
जरी नाहीं केलें उभय मिळुनी प्रेमभरण ॥ १

केबल म्हणतोः—

( साकी )

निज सुखदुःखीं मग्न एकला राहुनि कोणी जीव ।
अन्याज्ञातची जाय निघूनी, वघुनि येतसे कींव ॥ १

बुल्वर लिटनचें हेंच म्हणणें पडतें. तो म्हणतोः—

( श्लोकार्ध )

एकस्थानीं उभय, परि ते भिन्न सारे विचार ।
प्रेमें गोष्टी वरुनि करिती, अंतरीं पूर्ण वैर ॥

ब्रौनिंगनें तर आजन्म एका घरांत राहिलेल्या जोडप्याचा मासला दिला आहेः—

( श्लोकार्ध )

मी धांवतों घरभरी मिळण्या प्रियेतें ।
ती ऐकतांचि मम पाउल, दूर जाते ॥

या चमत्कारांचें कारण असें आहे कीं, दोन माणसें केवळ एका घरांत कोंबल्यानें प्रेमी होत नसतात. सख्याला समानशीलत्व लागतें. पहा बरें, एका प्याल्यांत पाणी आणि खोबरेल टाका, आणि दुसऱ्यांत पाणी आणि दूध टाका. दुसऱ्यांतले दोन पदार्थ केव्हांच एकजीव होतात. आणि पहिल्यांतले तसेच्या तसेच अलग राहतात. हाच न्याय प्रेमाचा किंवा स्नेहाचा आहे. कवि म्हणतो, बेडूक कमळाचे खालींच असतो आणि भुंगा दुरून उड्या घेत येतो.

लबक म्हणतो, स्थलाचें एकलेपण पत्करतें; पण मनाचें पत्करत नाहीं. तेव्हां, ज्याला दुर्दै-

वानें समान दिलाचा स्नेही भेटत नसेल त्यानें वनश्रीशीं तरी प्रेम धरावें, म्हणजे त्याला उदास होण्याचें केव्हांच कारण नाहीं. वनश्री ही सुंदर व आवडत्या जिवलगेपेक्षांहि अधिक पित्तशामक व सुखदायक आहे. आणि तिच्या लीलेंत ज्याचें मन रंगलें त्याला आनंदाचा सुकाळच झाला. बुलिअन मॉरिस म्हणतो, "जिवाला कोणी तरी जोड पाहिजे तरच तें जगणें; एकटें एकटें जगणें तें मरणतुल्यच".

पण शब्दाचें अद्भुत सामर्थ्य शोधण्यास आपणाला जुन्या जादूच्या किंवा यक्षिणींच्या गोष्टींचें कारण नाहीं. त्याचा आपणाला व्यवहारांत नित्य अनुभव येतो. आपण एकाद्याला एकादेवेळे आनंदाचे भरांत आपली एकादी गोष्ट मोठ्या प्रेमानें व जिवाचे ओढीनें सांगावयास जावें आणि तो उत्कर्षासहिष्णु किंवा दुर्जन असला म्हणजे आपलें अभिनंदन न करितां एकादाच कुजका शब्द बोलतो. त्या वेळीं आपल्याला जहर झोंबल्यासारखें होऊन, आपला उचंबळलेला सर्व आनंद थिजून जातो व विंचवाचे दंशासारख्या आपले शिराशिरांतून वेदना चालतात; सौख्याला विरजण पडतें, व अशाचें तोंड पाहणें नको असें होतें. उलटपक्षीं, आपण अवचट दुःख, चिंता, किंवा शोक यांचे तावडींत

सांपडलों असतां एकादा सज्जन किंवा सुमित्र जिव्हाळ्याचा एकादाच शब्द बोलला, तरी ते-वढ्यानें दुःखभार हलकावतो; चिंतातिमिर दूर होतो, व शोकशंकू उद्धृत झालासें वाटतें. हा आपणा सर्वांचा अनुभव आहे. हें शब्दसामर्थ्याचेंच उदाहरण होय. यासाठीं सुज्ञानें प्रत्येक शब्द मुखांतून काढणें तो भगवंताचे आज्ञेप्रमाणें " अनुद्वेगकर, सत्य, प्रिय, आणि हितकर " असाच काढावा. गुळाची महागाई असो, पण गोड शब्दाची कां असावी?

दारूबाज लोक सबब सांगतात कीं, संसाराच्या कर्मकटकटीची अल्पकाल तरी विस्मृति होऊन विसावा पडावा म्हणून आह्मी द्राक्षारस सेवितों. परंतु त्यांना कळत नाहीं कीं सुभाषित-रसाचें सामर्थ्य द्राक्षारसाचेंहि पलीकडचें आहे.

( श्लोक )

द्राक्षाम्लानमुखी जाता । शर्कराचाश्मतांगता ॥
सुभाषितरसस्याग्रे । सुधा भीता दिवंगता ॥ १

भावार्थः—या सुभाषित रसापुढें द्राक्षा सुकून गेली; सुकीं द्राक्षें बेदाणा झाला; शर्करा दगड ( खडीसाखर ) होऊन पडली; आणि सुधा तर पळून स्वर्गास गेली.

ही जरी कव्युक्ति असली, तरी ही गोष्ट खरी कीं, बोलणारा तितका रसिक, बहुश्रुत आणि विनोदी असला तर ऐकणाराला चटकाच लावून सोडतो. लबक म्हणतो, आपले अंगीं तित-

पत विनोदीपणा नसलाच तर दुसरा कोणी स्नेही गांठावा. पण दारूचा घुटका, तमाखूचा तोबरा किंवा चिरूटचा झुरका यांपेक्षां असल्या चटकदार भाषणाची करमणूक शरीराला तशीच मनालाहि हितावह समजावी. तें कशाला ? तसा जर नकल्या बोलणारा मिळाला तर त्याचे बोलण्यानें सारा दिवसभर हंशाच्या उकळ्या येऊन मौज वाटत रहाते, असा अनुभव आहे.

स्नेही म्हटले म्हणजे त्यांना परस्परांचीं रहस्यें माहीत असावयाचींच. आपल्या स्वतःच्या गुप्त गोष्टी वाटल्यास गूढ ठेवाव्या, नाहींतर प्रकट कराव्या; ही ज्याची त्याचे खुषीची गोष्ट आहे. परंतु स्नेह्याचें रहस्य म्हटलें म्हणजे त्याचें गोपनच केलें पाहिजे; त्याचा स्फोट करण्याचा आपणास कांहीं हक्क नाहीं. बरें, एरव्हीं व्यवहारांत मनुष्यानें—विशेषतः स्नेह्याशीं—खुलास आणि मनमोकळें वागावें. पण कांहीं लोकांना क्षुद्र गोष्टींना नसतें बाळसें आणून दाखविण्याची लकब असते; हा त्यांचा दोष आहे. स्नेही म्हटला कीं त्याशीं पडदा कामाचा नाहीं. पण, दुसऱ्या पक्षीं, केवळ स्नेही झाला तरी त्याच्या विश्वासावर गुह्य गोष्ट सांगणें निर्भय नसतें. कारण, कधीं कधीं आपले स्नेही त्यांचे मनांत दुर्भावना किंवा कापट्य नसतांहि गाफी-

लपणानें आपली साता काळजांपलीकडे ठेवण्यासारखी गुप्त गोष्ट फट्कर चौघांत ओकतात. एव्हीं पाहिलें तर ते मोठे सज्जन, प्रेमळ व जिव्हाळ्याचे स्नेही असतात; पण स्वभावदोषानें त्यांचे तोंडांत तीळ मिळून भिजत नाहीं. त्यांचे कानीं कांहीं पडो, तें त्यांनीं नगाऱ्यावर घातलेंच. फ्रेंच भाषेंत एक म्हण आहे कीं, " रहस्यरक्षणाइतकी अवजड कामगिरी दुसरी नाहीं ". ती म्हण असल्या उतावळ्यांना अक्षरशः लागू पडते. यासाठीं कवि म्हणतोः—

( श्लोक )

दारेषु किंचित्स्वजनेषु किंचित् ।
किंचिद्वयस्येषु सुतेषु किंचित् ॥
युक्तं न वा युक्तमिदं विचिंत्य ।
वदेद्विपश्चिन्महतोऽनुरोधात् ॥ १

भावार्थः—शहाण्यानें ( योग्यायोग्यतेचा ) पूर्ण विचार करून मोठ्या धोरणानें कांहीं गोष्टी स्वस्त्रीला, कांहीं स्वजनांला, कांहीं मित्रांला आणि कांहीं पुत्रांना ( ज्याचे त्याचे मानानें ) सांगाव्या. स्नेही झाला तरी तो रहस्यरक्षणक्षम असेल तरच त्याला गुह्य सांगावें.

या रहस्यभेदाशिवाय आणखी एक गोष्ट स्नेहभंगाला कारण होत असते. आपला स्नेही बोलला असतो एक, आणि मधले रिकामटेकडे किंवा चोंबडे आपल्याला सांगतात दुसरेंच; कीं आलीच मनांत तेड. मग स्नेह्यानें जरी म्हटलें

कीं मी असें बोललों नाहीं; तरी आपणास तें खरें वाटत नाहीं आणि अढी उकलत नाहीं. पण ही चूक आहे. कारण, आपल्या समक्ष अशा अनेकदां गोष्टी घडतात कीं, मधले निरोप्ये, दुष्टपणानें नसल्यास मूर्खपणानें तरी, 'ध' चा 'मा' सांगून अनर्थ उत्पन्न करितात. एकत्र कुटुंबांत बहुधा अखेर वैमनस्यें येतात तीं अशाच रीतीनें. सईबाईनें झोंक पाहून हळूच कानाशीं लागावें कीं 'आज भावोजी अस्सें म्हणत होते, हें त्यांना शोभलेंना'? म्हणजे रावांनीं बांधलाच पीळ. पण यापेक्षां राव जर हंसतच सांगून टाकतील कीं तूं माझी लाडकी खरी, परंतु ज्याअर्थीं ब्रह्मदेवानें माझे कानडोळे तुला चिकटविले नाहींत त्याअर्थीं हा उद्योग तूं सोडून दे; तर एवढ्या मात्रेच्या एका वळशानें जन्माचा रोग जाईल. स्नेह्यांतहि हाच प्रकार पाहिजे. मध्यस्थाचे सांगण्यावर विश्वास मिळून ठेवूं नये, म्हणजे नसता कलह आणि स्नेहभंग मिटला.

स्नेह्यास्नेह्यांत नजरभेटी देण्याच्या चाली आहेत. पण त्यांचें मोल त्या वस्तूंचे बाजारभावावरून न करितां देणाराच्या प्रेम-सद्भावाकडे पाहूनच केलें पाहिजे. सुदामानें मागून आणलेले मूठभर पोहेच आपल्या लक्ष्मीपति मित्राला दिले. श्रीकृष्णानें उलट भेट स्वर्णनगरी दिली. म्हणून

काय? दोन्ही भेटींची किंमत एकच. कारण, मोल प्रेमाचें, वस्तूचें नव्हे.

एक गृहस्थ आपल्या दूरस्थ स्नेह्याला उद्देशून म्हणतो:—

( श्लोक )

सूर्यकिरणें पाहुनी अब्धिपृष्ठीं ।
चंद्रिका हि विंवतां निर्झरान्तीं ॥
समुद्रोर्मी उसळतां अद्रिपादीं ।
सख्या होतें मज स्मरण तुझें आधीं ॥ १

ह्या प्रकारचा अनुभव प्रत्येक सहृदय मनुष्यास असेलच. जिवाचा स्नेही हा एक अजब मेवा आहे. तो एक मोठा विसांवा आहे. विशेषतः ह्या मृत्युलोकची स्थिति क्षणभंगुर आहे, हें ध्यानांत आणिलें म्हणजे आपणावर प्रेम करणारा आणि आपणास प्रिय असा स्नेही पाहिजेच असें म्हणावें लागतें. कारण, मूर म्हणतो:

( गडे अक्रुर हा नेतो श्रीकृष्णाला–या चालीवर)

या शून्यजगीं कोण करिल रे वसती ।
जरि स्नेही सगळे जाती ॥
जरि प्रीतीचीं हृदयें नष्टचि होतीं ।
तरि काय असे या जगतीं ॥ १

स्नेहसंपादनाला किंवा प्रेमसंवर्धनाला विशेष अनुकूल असे वर्षाचे कांहीं विशिष्ट कालहि असतात. इंग्लंडांत हिमकालांतील संध्यासमय प्रेमपोषक असतो. कौपर कवि म्हणतो:—

( श्लोक )

आली हे रम्य संध्या, मिटवुनि झडपा चेतवा अग्निधानी।
ओढोनि कोंच भोतीं खुलउनि पडदे बैसुंया सन्निधानीं॥
उन्मादातें न दे जें रुचिर कढत तें, पेय घेऊं चहाचें।
तेणें अंगीं हुषारी भरुनि प्रतिमुखीं दिव्य आनंद नाचे॥१

आपले देशांत म्हटलें म्हणजे 'जाईजुईचे बहाराचा वसंत' किंवा—

शीत-उदकीं आंघोळ। करुं होइ उतावीळ॥
वृक्षछाया सोज्वळ। फार वेळ झोंप दे॥
अस्तमानीं आनंद। वायु सुटत संद मंद॥
कुसुमि-पाटल-सौगंध। घम्‌घमाट सूटति॥१

—संगीत शाकुंतल

या प्रकारचा ग्रीष्म हाहि प्रणयिजनसहाय आहे.

आतां, स्नेही एकच असावा अशी कांहीं कैद नाहीं. कारण, प्रेमाला कांहीं मर्यादा नाहीं. प्लेटो म्हणतो कीं, तें त्रैलोक्याला कवळूनहि शिल्लक राही इतकें विस्तीर्ण असूं शकेल. यासाठीं, ज्याचे प्रेमाला जितके सोसतील तितके स्नेही त्यानें करावे; पण करावे. कारण, प्रेमावांचून हें त्रि-चित्र जग म्हणजे निवळ उकिरडा आहे. आणि प्रेम आहे तर, तें जगच एक अजबखाना आहे. प्रेमानें सर्व सृष्टी वाढते—नव्हे काय? प्रेम सगळ्याला गोड करितें. लाडक्या पोराचा द्वाडपणा देखील आईबापांना स्वादिष्ट लागतो, तो कशापायीं? दुष्यंत राजा खोड्याळ सर्वदमनाला पा-

हून म्हणाला: " स्पृहयामि खलु दुर्ललितायास्मै।—हा खोडकर पोर मला फार आवडतो ". सारांश, या जगांत काय आणि पुढें काय, प्रेम आहे तर सारें आहे. परमेश्वर तरी प्रेमाचाच बंदा आहे. म्हणून मनुष्यानें प्रेमळ असावें.

लबक म्हणतो, स्त्रीप्रेम हें जरी हक्कानें मैत्रीचे सदरांत येत नसलें, तरी तें मला गाळवत नाहीं. कारण त्यावांचून जगत् केवळ जीर्णारण्य होईल. सर टी. ब्रौन म्हणतो, " संगीताचा आनंद दिव्यच खरा; परंतु सुंदरीच्या मुग्धविलासांत जें कांहीं एक संगीत भरलें असतें त्याचा ध्वनि कोणच्याही वाद्यध्वनीपेक्षां अधिक मधुर व चित्ताकर्षक आहे ". रंभेनें शुकांना सांगितलें कीं:—

( श्लोक )

समस्तशृंगारविनोदशीला । लीलावती कोमलकंठनाला ॥
विलासितानो नवयौवनेन । वृथागतं तस्य नरस्य जीवितम्

—शुकरंभासंवाद

आतां, आयुष्यांत कधीं कधीं असे प्रसंग येतात कीं, तेव्हां एकलेपणच अधिक सुखावह असतें. परंतु एकान्त हा जसा उपकारक आहे तसा तो अपकारकहि आहे. लबक म्हणतो, एकान्त हा कोणाला देव्हारा भासेल, कोणाला तुरुंग वाटेल; कोणाला विश्रामस्थान वाटेल, कोणाला शिक्षाच

वाटेल; एकाला स्वर्ग, तर दुसऱ्याला तोच नरक. सारांश, हें ज्याच्या त्याच्या वृत्तीवर अवलंबून आहे.

कधीं कधीं या खलकंटकमय जगाला त्रासलेल्या सरळवृत्तीच्या लोकांना एकान्त फारच प्यार वाटतो. कौपर म्हणतो:--

( श्लोकार्ध )

जिथें शाठ्य अन्याय ना युद्धवार्ता ।
धनीं त्या वनीं वास एकान्त आतां ॥

थॉमस आ. केंपिस म्हणतो:—

( श्लोकार्ध )

जों जों वाढे परिचय मशीं या जगीं दुर्जनांचा ।
तों तों वाटे अधिक बरवा वास एकान्त साचा ॥

लिस्ट म्हणतो, " या जगांत सच्चा मनुष्यास एकान्तच ठीक ". हें मत शिलरलाहि पसंत आहे.

लबकचें म्हणणें, " रित्या एकान्तापेक्षां एकादा तरी जिवाभावाचा तेथें सोबती असणें हें अधिक सुखावह; मात्र घोळका नसावा". बाकी, घोळका झाला तरी आपलें मन स्वाधीन असल्यावर तेथेंहि एकान्त साधेल. केबल म्हणतो:--

( श्लोक )

जो अंतरीं होउनि गर्क गेला ।
हाटीं वनीं भेद उरे न त्याला ॥
करी स्वकर्तव्य विशेष नेटें ।
कीं अंतरीं प्रेम पवित्र दाटे ॥ १

इमर्सन म्हणतो, " जनसंमर्दांत उभा असतांहि जो सुखानें विविक्तांतील मधुर शांतता अनुभवूं शकतो तोच खरा आत्मजयी असें समजावें".

संभाषण हेंहि सुखविश्रांतीचें एक साधन आहे. परंतु, असलें भाषण–सहज, साधें, प्रेमळ व मनमोकळें असावें लागतें. आणि आपलें भाषण चित्ताकर्षक करणें तर थोडी मेहनतमशागतहि लागते, व ती घेणें हें प्रत्येकाचें कर्तव्यच आहे. शिवाय, मनु म्हणतो, "भाषण सत्य असून प्रिय असावें ". एका कवीनें भाषणाचे सर्व गुण एका श्लोकांत दिले आहेत:—

( श्लोक )

तथ्यं पथ्यं सहेतु प्रियमितमृदुलं सारवद्दैन्यहीनं ।
साभिप्रायं दुरापं सविनयमशठं चित्रमल्पाक्षरंच ॥
बव्हर्थं कोपशून्यं स्मितयुतघनदाक्षिण्यसंदेहहीनं ।
वाक्यं ब्रूयाद्रसज्ञः परिषदि समये सप्रमेयाप्रमत्तम्॥१

भावार्थः––रसज्ञानें सभेंत समय पाहून भाषण करावें, व तें—सत्य, हितकर, सप्रमाण, प्रिय, मित, मृदु, सार्थ, धीट, साभिप्राय, दुर्लभ, विनीत, प्रांजल, मनोहर, स्वल्प, प्रौढ, शांत, सस्मित, दाक्षिण्ययुक्त, निःसंदेह, सप्रमेय व प्रमादरहित असावें.

अर्थात् भाषण म्हणजे 'मुखमस्तीति व्यक्तव्यं' अशांतला प्रकार नसून, एक स्वतंत्र कलाच आहे. व ती यत्नानें संपादन करावी लागते. असो. कांहीं जाडे विद्वानांना आपण होऊन बोलणें रु-

चत नाहीं; अशांची गांठ पडल्यास आपणच कशीबशी सुरुवात करावी. कारण, जसें भांडण दोघांवांचून नाहीं, तसेंच संभाषणहि नाहीं. एकदा सुरुवात केली म्हणजे मग त्याचा ज्ञानौघ वाहूं लागतो; त्यांत यथेच्छ अवगाह करावा. कांहीं माणसें अतिच वाचाळ किंवा बहुभाष्य असतात; अशीं माणसें थोडें कमी बोलतील तर अधिक मान्यतेस चढतील. अर्थात् भाषण तरी सारखी फटावळ नसावी. अस्खलितपणा हा भाषणांतील श्रेष्ठ गुण धरिला आहे खरा, परंतु अस्खलित भाषण म्हणजे नुसता तोफखाना किंवा भडिमार नव्हे. ओघ अखंड असावा तथापि, श्रोत्यांचे कानांत घुसलेलीं अक्षरें त्यांचे हृदयांत निविष्ट होण्यास अवकाश लागेल इतका तो धीमा असावा. नाहींतर, नुसती झोड—बोलण्याची केवळ वावटळ—उठवल्यानें इष्टकार्य कांहींच होत नाहीं. निदान, ही परिपाटी संभाषणाचे उपयोगीं नाहीं.

बहुसमाजांत सर्वांनाच एकदम बोलतां येणें शक्य नाहीं. यासाठीं, आपण बोलण्याची उत्कंठा न ठेवितां, दुसरे बोलतांना ऐकण्याची तयारी असावी. लबक म्हणतो, असें करण्यांत वक्त्यापेक्षां शुश्रूषूचाच फायदा अधिक असतो. आणि श्रद्धावान् श्रोता वक्त्यालाहि प्रियच होतो. म्ह-

णून लोकें बोलतील तें शांत व प्रांजलमनानें ऐकण्यासच तत्पर रहाणें बरें. परंतु, कित्येक माणसें अशीं आढळतात कीं, त्यांजवळ बोलण्यासारखा मतलब नसतो कांहीं; पण बोलण्याचीच हुटहुट मोठी. फायदा काय? तर कालच्या सभेंत "अमुक राव बोलले". इतकाच!

कादंबऱ्यांत वाचावें तों शब्दाचें सामर्थ्य अद्भुत वर्णिलें आहे. हीन नामक कवि म्हणतो:—

( श्लोक )

स्वर्णाचीं रम्य हर्म्यें, परिजनहि बहू, गीतवादित्र जेथें।
पुष्पांचा नित्य चाले परिमल, नटती अप्सरा दिव्य जेथें॥
संत्र्याच्या एक शब्दें सकलहि परि तो थाट जाई लयाला।
जैशी कीं स्वप्नसृष्टी; उरत मग तिथें एकली भग्नशाला १

तें संसारी जीवांपुरतें तरी खोटें नव्हे. बचकभर भाजी आणि चटणीचें एक बोट; त्याप्रमाणेंच इतर हजारों प्रकारचीं सुखें आणि या सुखाचा एक घुटका; बरोबरी नाहीं. म्हणूनच उपनिषदांत ब्रह्मानंदाचा हिशोब या आनंदाचेच कोष्टकानें ठरविला आहे. प्रभु रामचंद्रासारखे मनोविजयी, पण ते देखील सीतादेवीवांचून वन्यवल्ली कवटाळूं लागले. यावरून स्त्रीप्रेमाचें माहात्म्य किती तें ध्यानांत येईल; व हें प्रेम कसें असावें ही ज्यांना जिज्ञासा असेल त्यांनीं भवभूतीचें उत्तरराम कंठगत करावें. आतां,

बेकन म्हणतो, "स्त्रैण प्रेम हें निर्दय तरी असतें, नाहींतर कपटी तरी असतें". यावर लबक म्हणतो, ही गोष्ट खरी कीं समरांगणांतील लोहमय बाणांपेक्षां मदनाचे मृदु पुष्पबाण हे मनुष्याला पुष्कळदां शतपट हैराण करितात; तथापि त्यांचा कंटाळा करण्याची सोय नाहीं. कारण, त्यांच्या तीव्रतेंत जो गुळगुळीतपणा आहे तो इतर वस्तूंच्या मार्दवांतहि नाहीं. ओमारख्याम म्हणतोः—

(श्लोक)

वृक्षाखालीं वसुनि दयिते, तूझिया सान्निधानीं।
प्रेमालापां करित, गिळितां भाकरी आणि पाणी॥
मध्यें गीती श्रुतिसुखकरा ऐकतां त्वन्मुखींची।
वाटे स्वर्गीं क्वचितचि सुरां जोड ऐशा सुखाची॥ १

हें वर्णन सर्वथा खरें आहे. मात्र प्रेमाचें माणूस तें तसें सर्वांगीं मनाजोगें मिळालेलें हवें. "खाई चोरुनि फांकडी करकरां कांदे, मुळे, कांकडी।" असली संगत असल्यास त्या सुखाला रामराम. लबक म्हणतो, अपात्र प्रेमानें पुष्कळ जीव उद्विग्न होऊन संसारांतून उठल्याचींहि उदाहरणें आहेत. यासाठीं तितकें कसोटीला टिकणारें मनुष्य सुदैवानें ज्याला प्राप्त असेल त्याच्या ह्या गोष्टी आहेत; एवढेंच. मग मात्र स्वस्त्रीसारखा अमोल दुसरा दोस्तच नाहीं.

शेक्स्पिअर सारखा व्यवहारचतुर विरळा;

त्यानें जगांत कसें वागावें हें थोड्यांत पुढें सांगितलें आहे:—

( अंजनी गीत )

सर्वांभूतीं प्रेम करावें । पात्र पाहुनी विश्वासावें ॥
उपद्रवातें न कुणा द्यावें । निजकार्यासाठीं ॥ १
सामर्थ्यानें शत्रु जिणावे । मित्रा संरक्षावें जीवें ॥
मौखर्याहुन मौनचि वरवें । कोणि म्हणो कांहीं ॥ २

मैत्रीचे बाबतींत आणखी एक गोष्ट सांगावयाची राहिली. ती गोष्ट म्हणजे कांहीं मनुष्यांचा मत्सरी आणि संशयी स्वभाव. असल्या स्वभावाचे माणसांशीं मैत्री करूं नये. कारण, शेक्सपिअरनें आपल्या 'अथेल्लो' संज्ञक सर्वोत्कृष्ट कृतींत असें म्हटलें आहे कीं, "संशयी लोक जे असती । त्यां राई पर्वत दिसती ॥ ". म्हणून मित्र करणें तो निर्मल मनाचा व विश्वासयोग्य आहे अशी खात्री पटवून मगच करावा. मात्र एकदां त्याला आपलासा म्हटल्यावर गैरविश्वास करूं नये.

एथपर्यंत, शत्रु हा अहितकर्ता म्हणून त्याज्य, व स्नेही हा सुखदाता म्हणून संग्राह्य, असें सांगितलें, ही गोष्ट खरी; तथापि निर्वाणचें वाक्य हेंच आहे कीं—" आत्मैव आत्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ( आपणच आपले मित्र व आपणच आपले वैरी )". कारण, सन्मित्र हा एक

१. वाचाळपणापेक्षां

चिंतामणी आहे, आणि तो अवश्य जोडावा. पण सर्वांसच तो मिळतो कुठें? गोरखनाथ म्हणतातः

( साकी )

भावसरीखा भाई न मिले । चित्तसरीखा चेला ।
ग्यानसरीखा गुरु न मिले । गोरख फिरे अकेला ॥ १

( सवई )

वैभव शाश्वत नाहिंच यास्तव कांहि तरी उपकार करा ।
धर्मचि हा परलोकसखा निज तारणिं हाचि उपाय वरा ।।
दुर्जन संगति सोडुनि दुर्मति सज्जनसंगति नित्य धरा ।
श्रीहरिचे मनिं पाय धरा निजतारणिं हाचि उपाय वरा ।।१

( श्लोक )

मा तात साहसंकार्षी वैभवैर्गर्वमागतः ।।
स्वगात्राण्यपि भाराय भवन्ति हि विपर्यये ।। १

—सुभाषित

भावार्थः—बाबारे, वैभवाचे योगानें गर्वास चढून भलतें सलतेंच कांही करूं नको. कारण, एकदां गाडें उलटलें म्हणजे आपली गात्रेंच आपल्याला भारभूत होतात.

( श्लोक )

लक्ष्मीवंता न जानन्ति । प्रायेण परवेदनाम् ।।
शेष धराभराक्रान्ते । शेते नारायणः सुखम् ।। १

—सुभाषित

भावार्थः—बहुधा श्रीमंताला परदुःखाची वेदना नसते. पहा वरें, बिचारा शेष पृथ्वीचे भारानें व्याकूळ झाला असून ‘ श्रीपति ’ त्याचे अंगावर चैनींत निजले आहेत.

# प्रकरण १०

## श्रीमंती

( विषम वृत्त )

अर्थमनर्थं भावय नित्यं । नास्ति ततः सुखलेशः सत्यं ॥
पुत्रादपि धन भाजां भीतिः । सर्वत्रैषा विहिता रीतिः ॥१

—शंकराचार्य

( श्लोकार्ध )

आये दुःखं व्ययेदुःखं । कथमर्थाः सुखावहाः॥

—सुभाषित

भावार्थः—द्रव्य मिळविण्यांतहि कष्ट, खर्चतांनाहि कष्ट; मग अर्थापासून सुख तें कसें ?

मनुष्यलोकांतील जे कांहीं श्रेष्ठ व निर्लेप आनंद आहेत त्यांतच शास्त्र, कला, वाङ्मय, आणि संगीत यांपासून होणाऱ्या आनंदाची गणती करणें इष्ट आहे. बरें, यांपैकीं एकाहि आनंदाला श्रीमंतीची कांहीं अपेक्षा दिसत नाहीं. एकादे श्रीमंताचे अजबखान्यांत बहुमोल चित्रें व पुतळे असतात; परंतु त्यांचे दर्शनानें एकाद्या मार्मिक कारागिराला जो आनंद होतो, तो त्यांचे श्रीमंत परंतु कलानभिज्ञ मालकाला होत नाहीं. **सालोमन** म्हणतो, असल्या श्रीमंताला त्या वस्तूंकडे डोळा टाकण्यापलीकडे काय उपयोग? ही

गोष्ट केवळ कलाकौशल्यालाच लागू आहे असें नव्हे. आजकाल भौतिकशास्त्रें काय अद्भुत चमत्कार करून राहिलीं आहेत, तें अनुभवण्याला अवश्य ती फुरसूद आणि मनःस्वास्थ द्रव्याच्या मागें लागलेल्या नवकोटनारायणांना कुठें आहे ? शास्त्रांचीं गूढें राहोत; साध्या वाङ्मयाचा तरी आनंद त्यांच्या कुठून वांट्यास यावा ? वास्तविक, या आनंदाला श्रीमंतीचें कारणच नाहीं. कारण जे सर्वोत्कृष्ट ग्रंथ ते तर आजकाल अति स्वस्त मिळतात. एका आठवड्याचे प्राप्तीनें जीं पुस्तकें विकत घेतां येतील तीं वर्षांत वाचून होणें मुष्किल. भव्य ग्रंथसंग्रहालय ही एक संपत्तीच खरी; परंतु तिचा खरा उपभोक्ता तिच्या श्रीमंत मालकापेक्षां तीवरील कारकूनच असतो, हेंच खरें. मालक साठा सहामाशीं येणार आणखी पुस्तकें कपाटांतून ओळीनें व्यवस्थित ठेविलीं आहेत कीं नाहींत एवढें पाहणार; म्हणजे संपलें. कारण, तो जर मुत्सद्दीमंडळांत किंवा इतरतः राजकारणांत गुंतलेला किंवा राज्यांतला मोठा हुद्देदार असला, अथवा त्याला आपल्या अफाट संपत्तीची व्यवस्था पाहणें प्राप्त असेल, तर मग त्याला पुस्तक वाचण्याला वेळ कुठचा ? नांवच नको.

अर्थात् हे आनंद पैसेवाल्यांच्या कपाळीं नाहींत. असें असतां, आपण द्रव्याला इतकें कांहीं

महत्त्व देतों कीं एकाद्याची जबर द्रव्यहानी झाली असतां आपण म्हणतों कीं, 'गेला हो गेला, ठार गेला'! पण खरें पाहतां, त्याचा पैसा त्याला कोणतें सुख देत होता आणि त्याच्या जीविताचें कसलें सार्थक करीत होता ? मग तो गेल्याचा शोक व्यर्थ नव्हे काय? आतां हें खरें कीं, होरेस म्हणतो कीं "या जगांत पैसा हा खरा चक्रवर्ती आहे. मान, सत्ता सर्व त्याचे पायीं आहे". फ्रेंच लोकांतहि एक म्हण आहे कीं, "इतर वस्तु कितीहि मोहक झाल्या तरी पैशाइतकें मोहक कांहीं नाहीं". आपल्याइकडेहि म्हणतात "अजब ख्याल पैसेका". पण हीं सगळीं वाक्यें प्राकृत जीवांचे दृष्टीपुरतींच आहेत. ज्ञात्यांना द्रव्यापेक्षां उच्च शीलाची महती केवढी तरी वाटते. भर्तृहरि म्हणतातः—

( श्लोकचरण )

वरं वन्हौ पातस्तदपि न कृतः शीलविलयः।

भावार्थः—अग्नींत पडून प्राणहानि बरी, पण शीलहानि बरी नव्हे.

लोभी जीव कांहीं म्हणोत, पण विचारी माणसांना उघड असें दिसतें कीं द्रव्यसंग्रह व द्रव्यलालसा हीं उभय असुखदायी आहेत. त्यांतहि कदाचित् संग्रहापेक्षां लालसा अधिक दुःखावह म्हणणें रास्त होईल. नव्याणवाचे फेऱ्यांत सांप-

डलेले लोभी जीव पुरें पोटाला देखील खात नाहींत; त्यांना वाटतें तेवढाच पैसा कमी पडेल. आणि शास्त्रांत तरी द्रव्यनिंदा जी केली आहे, ती फारशी द्रव्यसंग्रहाची नसून द्रव्यतृष्णेची केली आहे. आचार्य म्हणतात:—

(विषम वृत्त)

मूढ जहीहि धनागम**तृष्णां**। कुरु तनुबुद्ध मनसि वितृष्णां ॥
यल्लभसे निजकर्मोपात्तं । वित्तं तेन विनोदय चित्तं ॥ १

**भावार्थ**:—हे मूढा, हे अल्पमते, द्रव्यप्राप्तीची ही लसलस सोड आणि तृप्ति बाळग. तुझ्या मेहनतीनें जें कांहीं द्रव्य मिळेल तेवढ्यांत मजा कर.

अर्थात् स्वकर्मानें द्रव्य मिळालेंच तर टाकावें असें कांहीं आचार्यांचें म्हणणें नाहीं. पण लसलस, लोभ, तत्प्राप्त्यर्थ तळमळ हीं नसावीं; इतकेंच. आतां द्रव्यसंग्रहाचे ठायींहि कांहीं दोष आहेत. एक तर, तें जों जों मिळत जातें तों तों तृष्णा अधिक वाढते; आणि अंगांत मस्ती चढून अमार्गप्रवृत्ति होऊं लागते. म्हणून तुकोबा म्हणतात:—

(पद)

पोटापुरतें देईं। मागणें लयि नाहीं लयि नाहीं ॥ धृ०
कळणा अथवा कोंडा। देवा देईं भुकेच्या तोंडा।

बाकी, ही विवेकदृष्टि थोड्यांना. बहुजन म्हणजे द्रव्याभिलाषीच आढळतो. मोलिअर नामक प्रहसनकाराचें हर्पेगान नांवाचें पात्र द्रव्या-

बद्दल शोक करितांना म्हणतें:—" हाय हायरे ! माझ्या प्रियमित्रा, द्रव्या, तूं मजपासून दूर गेलास ना ? आतां मी काय करूं ! आतां मी कशावर जगूं ? बाबा, तूं गेल्यानें माझा सर्व आधार तुटला, विश्राम नाहींसा झाला व आनंद मावळला;—नव्हे, सर्व संसारच आटपला. आतां मला जगून तरी या जगतांत काय कर्तव्य ? "

असो; वेळेचें महत्त्वहि द्रव्यासारखेंच मानिलें जातें; पण आह्माला वाटतें कीं, तें द्रव्याहून वरिष्ठ आहे. आणि असें असून वेळेची मालकी सर्वांस सारखीच आहे. राजाला आणि रंकाला दिवसाचे तास चोवीसच. किंबहुना, रंकाचे एके दृष्टीनें अधिकच. कारण, त्याचा काळ राजाइतका चिंतेनें ग्रासला नसल्यानें त्याचे अधिक कामास येतो. राजा अंथरुणावर आठ तास लोळून त्याला दोन तासहि निद्रा नसेल. आणि रंक धरणीवर पडतांच घोरूं लागल्यानें निम्मे वेळांत ताजातवाना होऊन उठेल. ही झोंपेचे वेळेची व्यवस्था. आतां भोजनाची, तेथेंहि तोच मासला. गरीब केव्हांच हातावर चटणीभाकरी चावून चालता होतो, आणि राजेसाहेब अडणीवर सोन्याचें ताट ठेवूनहि प्रहरभर शितेंच ओंवीत बसतात. याशिवाय माणसाचे तास दोन तास पोरांबायकांचे संगतींत--हास्यविनोदांत जातात. तो फा-

यदा राजारंकाला सारखाच. आणखी दोन तास व्यायाम, पोषाख चढवणें, उतरणें इत्यादिकांत. पण या कामीं गरीबाला वेळाची बचत अधिक सांपडते. खालीं उरले तास आठ किंवा दहा. हे पोटाचा उद्योग करण्यांत दोघांचे जावयाचेच. पैकीं गरीबांचीं कामें बहुधा अंगमेहनतीचीं असतात. वरिष्ठांचीं मानसिक श्रमाचीं असतात. यांत अनुभव असा कीं, अंगमेहनतीपेक्षां मानसिक मेहनतीनें थकवा अधिक आणि आनंदहि कमीच. कारण, जरी मानसिक काम प्रसंगीं आनंददायक असतें, तरी एकंदरींत तें करणाऱ्यांच्या मागें जी जबाबदारी आणि ज्या काळज्या असतात, त्यांपायीं त्यांच्या तो आनंद अंगीं लागत नाहीं. म्हणच आहे: "ज्याचे अंगीं मोठेपण। तया यातना कठीण॥" ती खोटी नव्हे. लबक म्हणतो, अमेरिकेंतलीं वर्तमानपत्रें घेऊन त्यांत तेथील प्रेसिडेंटला नित्य किती काम असतें तें वाचावें, म्हणजे वाटेल कीं, सुतारपाथरवटांची लांकूडदगडफोड बरी; पण ही उच्चस्थानची माथेफोड नको.

एतावता, असें सिद्ध होतें कीं, श्रीमंताला धनद्रव्याच्या बाजूनें अधिक सुख नाहीं आणि कालरूपी द्रव्याच्या बाजूनेंहि त्याची स्थिति गरीबापेक्षां कमीच सुखावह ठरते.

आतां, या दोन बाजू जरी कदाचित् हुकल्या

तरी श्रीमंतीची तरफदारी करणारे एक गोष्ट पुढें आणतात. ते म्हणतात कीं, घसघशीत द्रव्य असलें म्हणजे गरीबागुरीबाचा परामर्श घ्यावयास सांपडतो—दीनाचें दुःखहरण करितां येतें. आणि दीनदुःखहरणासारखें उंची सौख्य आणखी कोणतें आहे ? हें त्यांचें म्हणणें खरें आहे. परंतु परदुःखहरणास द्रव्याखेरीज इतरहि अनेक साधनें आहेत. शिवाय, एकादे गरीब म्हातारीनें भिकाऱ्याला चार पैसे देणें आणि धनाढ्यानें मोहोर देणें यांचें श्रेय सारखेंच आहे. शेक्स्पिअर किंवा व्यास--वाल्मीक यांजपाशीं पैसे नव्हते, पण त्यांचे शब्दांवर जितक्या लोकांचें दुःखहरण आणि उदरभरण होत आहे, तितक्या लोकांचें कोणाहि पृथ्वीपतीचे हातून होत नसेल. एवंच, परोपकाराचे कामीं धनिकाची प्रतिष्ठा अधिक मानण्याचें कारण नाहीं. **निकोल** म्हणतो, " धनिक झाला, तरी काय ? या अफाट विश्वाचा एक कोंपराहि त्याचे ताब्यांत असणें शक्य नाहीं; मग त्या धनीकपणाचें एवढें स्तोम कशाला ? आमचे भर्तृहरींची कोटी याहून विनतोड आहे. ते म्हणतात:--

( श्लोकचरण )

मृत्पिण्डो जलरेखया वलयितः सर्वोप्ययं नन्वणुः ।

म्हणजे जलरेषेनें वेढलेला हा मृत्पिंड ( पृथ्वी )

इवलासा तर आहे. मग त्याचें स्वामित्वाचा एवढा दिमाखा कशाला? अन्यत्र ते म्हणतातः–

(श्लोकचरण)

कतिपयपुरस्वाम्ये पुंसां क एष मदज्वरः ।

म्हणजे, कुठे दोन–पांच गांवांवर मालकी झाली तर मनुष्याला इतकी मस्ती चढते, याला काय म्हणावें? अन्फिअन नांवाचा एक ज्ञानी पुरुष अथेन्स शहरच्या बाजारपेठेंतून जातांनां म्हणाला, "मला ज्यांचें जन्मांत कारण नाहीं, अशा कितीतरी वस्तु येथें भरल्या आहेत ह्या"?

खेरीज, परदुःखहरणास द्रव्यापेक्षांहि दया आणि दुसऱ्याची जाण यांची अपेक्षा अधिक असते आणि ती गरीबालाहि सुसाध्य असणारच. बरें, सोन्यारुप्याचे तुकडे किंवा मालमत्ता ही कांहीं खरी संपत्ति नव्हे. बायबलांत म्हटलें आहेः– "हे मनुष्या, तुला वाटतें कीं मजजवळ वित्तविषय पुष्कळ असल्यानें मला आतां कशाची गरज नाहीं. परंतु, तुला कळत नाहीं, कीं तूं हीन, दुःखी, दरिद्री, अंध व नागवा आहेस". कोटीबाज विठोबाअण्णा म्हणतातः—

(श्लोकचरण)

लभेत नियुतं धनं निधनमेव तज्जायते ।

**भावार्थः**—बाबारे, तूं नियुत (लक्ष) द्रव्य मिळविलेंस तरी तें नि-युत-धन म्हणून निधन म्हणजे मृत्युमूळच होणार.

हीच द्रव्याची मातब्बरी. ट्राहर्न म्हणतो, "सोनें आणि संपत्ति हा वेगडेचा रंग आहे; आणि पदव्या आणि प्रतिष्ठा वाऱ्याचे फुगारे आहेत". लबक म्हणतो, धनिक लोक ज्यांना तुच्छ समजतात, अशांत खरे श्रीमंत (तेजस्वी, वर्चस्वी) उदारबुद्धि व सच्छील किती तरी असतील. मनुष्यजन्मांत खऱ्या किंमतीच्या ज्या गोष्टी आहेत, त्या मुळींच द्रव्यसाध्य नाहींत. अरब लोकांत म्हण आहे कीं, "सत्कृत्यें ही मनुष्याची खरी संपत्ति आहे. कारण मनुष्य मेला, म्हणजे मागचे मर्त्य जीव जरी त्यानें मागें सोनें नाणें काय ठेविलें आहे म्हणून धुंडूं लागतात, तरी देवदूत केवळ त्याच्या सत्कृत्यांचीच चौकशी करितात". आपल्याइकडे "धनानि भूमौ पशवश्च गोष्टे" हा श्लोक सुप्रसिद्धच आहे.

यावरून द्रव्याचें खरें महत्त्व लक्षांत येईलच. खेरीज, सुखसाधन म्हणून जर द्रव्याकडे पहावें, तर पुष्कळदां तें संपादण्याचे कामीं इतके कष्ट, इतका त्रास, व एवढा कालव्यय होतो कीं, तें हातीं लागल्यावर भोगण्याचें पुरें त्राणहि अंगांत उरत नाहीं. बरें, खऱ्या सुखाला द्रव्याची विशेष जरूर नसते. खरें सौख्य ही बाजार-सवद्याची जिन्नस नव्हे. सामान्यतः सुखाला अवश्य गोष्टी म्हणजे "स्वच्छ हवा, स्वच्छ पाणी, ओजवलेलें

अन्न, आरोग्य आणि स्वस्थ वृत्ति ". ह्या गोष्टी लक्षाधीशाला आणि एकाद्या लोहाराला सारख्याच सुलभ असतात. उलटपक्षीं या जगतांत असुखकारक गोष्टी म्हटल्या म्हणजे दुखणींबहाणें, मनस्ताप आणि दुष्कृत्यें ह्या होत. पण द्रव्यानें यांचा परिहार न होतां समयीं अधिक प्राप्ति मात्र होते. बेकन म्हणतो, "दयाघन प्रभु पर्जन्य, सूर्यप्रकाश इत्यादि सामान्य गोष्टी सुष्ट-दुष्टांस सारख्याच देतो. पण, संपत्ति, सन्मान व सद्गुण हे कांहीं निवडक माणसांसच देतो". सिसिरोचें म्हणणें "थोर मनुष्य भव्य मंदिरांत असावा हें अनुरूप आहे. पण भव्य मंदिरांत जेवढा कोणी असेल तेवढा थोरच असतो, हा समज चुकीचा आहे". आपल्यांत म्हटलें आहे, "प्रासादशिखरारूढः काकः किं गरुडायते।"—कावळा राजवाड्यावर बसला म्हणून गरुड होत नाहीं.

जो न्याय व्यक्तीला लागू तोच राष्ट्राला. लक्ष्मीचा धूर निघत असला म्हणून तें राष्ट्र खरें श्रीमंत नव्हे. तर ज्यांतील रहिवासी मनानें व शरीरानें निरोगी, सच्छील व भले असतील तेंच राष्ट्र संपन्न. द्रव्यमदानें जसा व्यक्तींचा नाश होतो तसा राष्ट्रांचाहि होतो. आजकाल इंग्लंडला अशी घमेंड झाली आहे कीं, आपली संपत्ति दुरंत आहे. लेखक म्हणतो, ती विपुल आहे खरी; तथापि

विपुल म्हणजे अपार नव्हे, तिला मर्यादा ही आहेच. पण इंग्लंडला ह्या गोष्टीचें भान नाहीं. विपत्तींत काटकसर सगळ्यांनाच सुचते; पण संपत्तींत मितव्ययी राहील तोच शहाणा. परंतु इंग्लंडला आज पैशाची तमाच वाटत नाहीं. डनियल डिफो म्हणे, काटकसर करण्याची अक्कल इंग्रजाला नाहीं. लबकचें म्हणणें कीं, ही अक्कल अजूनहि आली नाहीं. आणि उधळ्याचे हातीं द्रव्य असून व्यर्थच आहे. मूर्खांना लक्ष्मी कंटाळते, असें अल्फ्रेडचें म्हणणें असे. इस्रायल लोक कट्टे मूर्तिपूजक होते तरीहि स्वर्णवत्साची म्हणजे द्रव्याची पूजा करणारांस ते निंद्य मानीत.

कांहींचे मतें, द्रव्यवानाचे मागें गरिबासारखा ' कसें करूं, काय करूं ' ह्या अष्टाक्षरींचा भुंगा नसतो; यामुळें धनिक सुखांत आरामांत असतात; आणि म्हणूनच धनवत्ता स्पृहणीय आहे. परंतु या लोकांना हा अनुभव नाहीं कीं, श्रीमंतालाच द्रव्याची तळमळ अधिक असते. लाखाचे दोन लाख कधीं होतील, दोहोंचे पांच कसे होतील, याच भ्रमणांत तो अखंड असतो. दुसरी गोष्ट, हातीं पैसे खुळखुळूं लागले कीं नसते ढंग इष्क-आराम सुचतात आणि डोळ्यांवर धूरहि चढतो. लबक म्हणतो, कांहीं धनमत्तांना तर गरीबगुरीबें म्हणजे आपलीं पायपु-

सणीं किंवा पोतेरींशीं वाटतात; इतका त्यांस उन्माद चढतो. गरीबाचे अंगीं उद्योगीपणा व सोसकपणा हे दोन गुण असले म्हणजे गरीबी सुखदायक होऊं शकते. कठीण आहे श्रीमंतीच. श्रीमंत असून त्याचे अंगीं दानशूरता, उपभोगांत नेमस्तपणा, दीर्घदृष्टि, इंद्रियदमन व आणखी बरेच दुसरे सद्गुण असतील तर त्याला श्रीमंती सुखावह होईल; एरव्हीं ती त्याचा अधःपात करील. अधिकार आणि द्रव्य हीं किती घातुक आहेत, यापायीं जगतांत केवढाले अनर्थ गुदरले आहेत, याची साक्ष प्रत्येक देशाचा इतिहास देतच आहे. कांहीं रोमचे राजपुत्र अल्पवयांत मोठ्या नीतीनें चालत होते; पण पुढें तक्तारूढ होतांच डोळे फिरून नीतीचा मार्ग सुटला व अखेर त्यांची दैना दैना झाली. नेपोलियनला तर इतका अहंकार झाला कीं, स्वर्ग अर्ध बोट राहिला. आणि त्यामुळेंच तो अखेर हापटला. यावरून श्रीमंती व सत्ता हीं किती अनर्थावह आहेत हें समजेल.

फेनेलान म्हणतो कीं, "द्रव्य व प्रतिष्ठा यांचे मागें लागलेले जे लोक आहेत ते सुवर्णमय रथांत बसले आहेत खरे; परंतु तुटक्या कड्याचे धारेवरून ते आपला रथ हांकीत आहेत. अर्थात् त्यांच्या दांतकुड्या पडणार असें मी खास सम-

जतों ". आतां, द्रव्यतृष्णा जरी निंद्य असली तरी न्यायार्जित द्रव्यांत, काटकसरीनें राहून, आगामी काळासाठीं संग्रह करणें हें कांहीं निंद्य नव्हे. कारण, लबक म्हणतो, चर्मदृष्टीचें सार्थक अंतर्दृष्टि येणें हें आहे; आणि अंतर्दृष्टि आल्याचें रूप दूर दृष्टि पोंचणें यांत आहे.

पूर्ववयांत जर कारण नाहीं असल्या वस्तू खरेदी केल्या असल्या, तर वार्धक्यांत ज्यांचें कारण आहे अशा वस्तू विकून टाकण्याचा प्रसंग येईल; म्हणून पूर्ववयांत इतक्या बेतानें रहावें कीं, उत्तर वयांत कोणाचें दमडीसाठीं फट् म्हणून घेण्याचें कारण पडूं नये. म्हण आहे: "सेवकान्ने पुरातने "—कालचे शिलकींतून खावें; आजच्या कमाईतून खाणें चागलें नव्हे. आणि उद्यां आपण मिळवूं या भरावर आज ऋण काढून सण करणें हा तर केवळ शतमूर्खपणा आहे. रेबेलास यानें मरतांना आपलें मृत्युपत्र म्हणून एक कागद बंद करून ठेविला होता. तो उघडून पाहतां त्यावर लिहिलें होतें कीं, " मी कर्जबाजारी आहें, माझेजवळ छदाम शिलक नाहीं. बाकी उरेल तें मीं गरिबांस दिलें आहे ". नुकतेच आत्महत्या करून घेतलेले धरमसी यांचें उदाहरण उधळ्यांनीं ध्यानांत धरण्याजोगें आहे.

कोणत्याहि उदीम-धंद्यांत पडलों असतां ए-

कदम लाट मारून आपण गबर होऊं असली इच्छा केव्हांहि धरूं नये; निदान तवकलीचा धंदा तरी करूं नये. कारण, असला धंदा म्हणजे जुगारच; आणि तिचें रूप कितीहि संभावित असलें तरी जुगार ही घातुकच हें निश्चित समजावें. दुसरें हेंहि तत्त्व ध्यानांत ठेवावें कीं अल्प फायद्यानेंच गजवे भरचक भरतात. कवि म्हणतो:—

( श्लोक )

जलबिंदुनिपातेन । क्रमशः पूर्यते घटः ॥
सहेतुः सर्व विद्यानां । धर्मस्य च धनस्य च ॥ १

भावार्थः—थेंब थेंब सतत पडल्यानेंच घट भरतो. हीच गोष्ट विद्या, द्रव्य व धर्म या तिन्हींस लागू समजावी.

तिसरें तत्त्व—चलतीचे दिवसांत विपत्ती जवळ ठेपल्याप्रमाणें भिऊन चालावें; विपत्कालीं उदयकाल सन्निकृष्ट असल्याप्रमाणें उमेदीनें रहावें; म्हणजे विपत्तीहि सह्य व सुखावह होईल.

द्रव्याप्रमाणेंच केवळ जमीनीचें अधिपत्यहि सुखाला आवश्यक आहे, हा समज चुकीचा आहे. एकाद्याचे ताब्यांत पुष्कळशी शेती व बागाईत असली तर त्याला वर्षास भरभक्कम खंड मिळेल; पण मालक जर अरसिक असला तर बागबगीच्यामुळें होणारें सृष्टिसौंदर्याचें सुख त्याला कधीं होणार नाहीं. आणि मनुष्य जर रसज्ञ आणि मार्मिक असला तर त्याचे सुखाला

जमीनीचे मालकीचीच कांहीं जरूर आहे असें नाहीं. समुद्राच्या लाटा व गर्जना, सुगंध शीतळ वायु, सूर्योदय-सूर्यास्तांचे बहुरंगी देखावे व रात्रौ चंद्र-तारकादिकांच्या मौजा, ह्या गरीबालाहि मोफत मिळणाऱ्या आहेत. आणि रसिकाला ह्या गोष्टी जें सुख देतात तें अरसिकाला जमीनीचे मालकीनेंहि कधीं मिळणारें नाहीं.

आतां भोजनाचें सुख. तेथेंहि हाच मासला. श्रीमंती-गरीबीचें त्यांत कांहीं नाहीं. अक्षयी भुकेनें वखवखलेल्या कामकऱ्याला कांदाभाकरी जें सुख व समाधान देते, तें, सर्वदा अग्निमांद्यानें पीडलेल्या श्रीमंताला पंचपक्वानांनींहि होणें शक्य नाहीं. तेव्हां गरीबीनें या बाबतींत सुखाची हानि मुळींच नाहीं.

स्त्रियांची म्हण आहे, " गळां नाहीं सरी आणि सुखें निद्रा करी " ती अक्षरशः खरी. द्रव्यवानांना रात्रौ झोंप नाहीं. कोणी चोर येईल काय, दरवडा पडेल काय, ही धाकधूक. गरीबाला तें कांहीं नाहीं. तो उघड्या दारीं राज्य करीत असतो.

एथपर्यंतचे एकंदर विवेचनांत द्रव्याची सुखहेतुता जरी आह्मीं नाशाबीत केली आहे, तरी द्रव्यापासून सुख होत नाहीं असें नाहीं. सुख होतें, पण तें शहाण्याला होतें. कारण, लक्ष्मी

ही शहाण्याशीं आज्ञांकित किंकरीप्रमाणें वागते आणि मूर्खांशीं उद्धट स्वैरिणीप्रमाणें वागते. आणि स्वैरिणी अत्यंत सुंदर झाली तरी तें सौंदर्य परास्वाद्य असल्यानें तिच्या पतीला उलटें क्लेशकारक होतें. मूर्खांचें धनहि स्वैरिणीप्रमाणें बहुधा परोपभोग्यच असतें. म्हणच आहे: "गद्धोंका माल अकलमंदोंका खुराक!"—मूर्खांची दौलत म्हणजे अक्कलवाल्यांची चमन. अर्थात् सुखाला हेतु मुख्यतः द्रव्य नसून शहाणपणा आहे, हेंच येथेंहि सिद्ध झालें. कृपणाला तरी द्रव्यापासून कोणतें सुख? कारण तो निव्वळ ओझ्याचा गाढव.

संपत्ति हें एका अर्थीं एक लचांडच आहे. आपल्या लग्नकार्यांतून एखाद वेळीं कांहीं शुष्कप्रतिष्ठित वऱ्हाडी मिळतात. त्यांचा उपयोग नसतो काडीचा; पण त्यांवाचून पान मात्र हलायचें नाहीं. पाऊल पुढें टाकतां येत नाहीं. अशांना आमचा एक विनोदी स्नेही म्हणे: "असून अडचण आणि नसून खोळंबा". लढाईवर लष्कर निघालें म्हणजे त्याचें सामानसुमान मागून रखडत चालत असतें. तें टाकून जावें तरी सोय नाहीं; त्याबरोबर रखडावें तर मोहिमेची वेळ हुकते. एवंच दुहेरी बखेडा. हाच न्याय, बेकन म्हणतो, पुष्कळदा द्रव्याला लागू

पडतो. अपार संपत्तीचा वितरण हा एकच उपयोग आहे. बाकीचे उपयोग ही नुसती कल्पना. कवि म्हणतोः—

( श्लोक )

यद्ददासि विशिष्टेभ्यो । यच्चाश्नासि दिने दिने ॥
तत्ते वित्तमहं मन्ये । शेषं कस्यापि रक्षसि ॥ १

भावार्थः—तूं स्वतः जितकें कांहीं खाशील आणि सत्पात्रीं देशील तेवढें वित्त मात्र तुझें, बाकी कोणाचें तरी.

" सर्वेगुणाः कांचनमाश्रयंते " असें एक सुभाषित आहे; परंतु, ही लौकिकी भाषा. परमार्थतः नुसत्या द्रव्यसंभारानें दुर्जनाचा सज्जन होणार नाहीं; निर्गुणाचा सद्गुणी होणार नाहीं. थेमिस्टाक्लिसला एकानें विचारिलें, माझे मुलीला दोन वर मागत आहेत. एक सुशील, परंतु दरिद्री आहे; दुसरा गबर, परंतु शीलहीन आहे. तर मी मुलगी कोणत्याला देऊं? थेमिस्टाक्लिसनें उत्तर केलें, " पहिल्याला. तेथें तिला सुख होईल ".

द्यौः शांतिरन्तरिक्षं शांतिः पृथिवी शांतिरापः
शांतिरोषधयः शांतिः वनस्पतयः शांतिर्विश्वेदेवाः
शांतिर्ब्रह्म शांतिः सर्वं शांतिः शांतिरेव शांतिः
सामाशांतिरेधि।

—यजुर्वेद

**भावार्थः**—हे परमेश्वरा, तुझ्या कृपेनें, आह्मांस हें अफाट भासणारें ( अतएव भयप्रद ) अंतरिक्ष, हें आकाश, ही पृथ्वी, हा जलसमूह, ह्या ओषधि, या वनस्पति, ह्या सर्वहि सृष्टींतील देवता इत्यादि सर्व निरुपद्रवी व सुखकारक होऊं दे. आणि आह्मांस सर्वत्र शांतिच शांति असूं दे.

( श्लोक )

महावनेऽपि चरतो । मुनिवेषस्य धीमतः ॥
तथा देवाश्च दैत्याश्च । भवन्तु सुखदाः सदा ॥१
राक्षसानां पिशाचानां । रौद्राणां क्रूरकर्मणाम् ॥
क्रव्यादानां च सर्वेषां । माभूत्पुत्रक ते भयम् ॥ २

**—वाल्मीकि रामायण**

**भावार्थः**—**कौसल्येनें रामचंद्र** वनास जातांना आशीर्वाद दिला कीं, बा बुद्धिमंता पुत्रा, तूं मुनिवेषानें घोर वनांत फिरत असतां देव, दैत्य, राक्षस, पिशाच, तसेच मांसाहारी इत्यादिकांपासून तुला भय प्राप्त न होवो.

# प्रकरण ११

## सृष्टीची भीषणता

एतानि तानि नाम कांताराणि किमतःपरं भयानकं स्यात् ।

—भवभूति

भावार्थः–तींच हीं जंगलें; यांहून भयंकर कांहीं नसेल.

( अभंग )

कांहीं दिसे अकस्मात । तेथें वाटे आलें भूत ॥
वायां पडावें संदेहीं । मुळीं तेथें कांहीं नाहीं ॥
झाड झुडूप देखिलें । जिवीं वाटे कोणी आलें ॥
**रामदास** सांगे खूण । भितो आपणा आपण ॥ १

सृष्टीचें वैचित्र्य व रमणीयता पाहून पुष्कळांना तिजबद्दल प्रेम, आदर, व कौतुक वाटतें. कित्येकांना आदरहि नाहीं आणि अनादरहि नाहीं; त्यांची वृत्ति केवळ तटस्थ असते. पण पूर्वकालीं तिसराहि एक वर्ग होता, आणि प्रस्तुतहि अशिक्षित व अडाणी लोकांत असलीं माणसें आढळतात–कीं, ज्यांना सृष्टीचे व्यापारांत एकादा असाधारण प्रकार दिसला म्हणजे त्याबद्दल कौतुक न वाटतां भय मात्र वाटतें. आकाशांत धूमकेतु उगवला, किंवा एकादे वर्षीं पंचांगांत फार ग्रहणें असलीं, म्हणजे आपणावर विधात्याचा कोप झाला असें समजून तीं घाबरून जातात. वर्षा-

कालीं मेघांचा विशेष कडाक्याचा गडगडाट कानीं पडला आणि विजांचा चमचमाट डोळे दिपवूं लागला, म्हणजे मुरकंडी वळून, ' भार्गवराम ! भार्गवराम ! " म्हणून मंत्र जपणारींहि माणसें अद्याप आहेत.

जितकें अज्ञान जास्त, तितकें भय अधिक. अडाणी लोकांना जिथें तिथें भूतें–खेतें दिसत असतात. एकादे झाडाचे मुळावर, दगडावर, शेंदूर टाकलेला आढळला कीं त्यांनीं बांच खाल्लाच. हा कोण ? म्हसोबा; हा कोण ? गोटोबा; त्याचे वाटेस जातां कामा नये, म्हणून लागलेच कांपावयाला. स्प्रोट नामक ग्रंथकार म्हणतो कीं, व्हँकुअर नामक बेटांत एक पर्वत आहे, त्याचें नांव देखील तेथील लोक तोंडास आणीत नाहींत. कारण त्यांचा असा समज आहे कीं, त्याचें नांव घेतल्यास तो आपणास समुद्रांत बुडवील !

आमच्या देशांत चेटुक करणाऱ्या व चेटुकाला भिणाऱ्या बायाबापड्या पुष्कळ आहेत. आस्ट्रेलिया, ब्रॅझिल, आफ्रिका व इतरहि कांहीं देशांत अडाणी लोक त्यांचा कोणी आप्तइष्ट मेला कीं त्याला कोणी तरी करणी करून मारिला असेंच समजतात; जणूं काय सहज-मृत्यु हा मनुष्याला नाहींच. न्यूहिब्रिडीजमध्यें कोणीहि आजारी पडला कीं डाकिणीनें भूत उठविलें असें

समजून तिचे शांतीकरितां मोठ्यानें शंख फुंकितात आणि 'उदयीक तुला अमुक अमुक भाग आह्मी देतों, शांत हो' म्हणून तिच्या शंखध्वनीद्वारा विनंत्या करितात. टर्नर नामक साहेब या लोकांत जाऊन राहिला होता, तो म्हणतो, आली ती रात्र हे शंखध्वनी आणि डाकिनीच्या प्रार्थना यांनीं मला पिसाळाट आला!

स्वतःची तसबीर किंवा प्रतिकृति चित्रकाराकडून काढविण्याचे कामींहि अडाणी जातींत कांहीं विलक्षण समजुती आहेत. ते आपला चेहरा चित्रकाराला उतरूं देत नाहींत. कारण, त्यांना वाटतें कीं, आपलें चित्र कोणाचे हातीं लागलें अथवा आपली मुद्रा चित्रलेखकाचे नजरेंत भरली तर आपणास तो अपाय करील. अमेरिकेंतील तांबडे इंडियन लोकांनीं एकदां केन नामक साहेबाला गराडा दिला, आणि कांहीं केल्या ते दूर जातना. तेव्हां साहेबानें त्यांच्या तसबिरा उतरून घेण्याचा आव आणिला त्याबरोबर ते सर्व पळाले. आमचे इकडे मध्यप्रांत, नागपूरकडे कांहीं अडाणी जाती आहेत, त्यांचे अंगणांत भंगी उभा राहिला कीं त्यांचा थरकांप होतो. तेथील एका गृहस्थानें आह्मास सांगितलें कीं, मीं एक भंगीच शिपाई ठेविला आहे. तो तगाद्याला दाराशीं गेला कीं

ते लोक मजकडे धांवत येऊन माझें देणें पटापट देऊन टाकितात व पुनः भंगी पाठवूं नका म्हणून पायां पडून विनंति करितात. कॅटिलिन साहेब एका रानटी जातीचे मुख्याचा फोटो काढण्यास मागूं लागला; पण तो कबूल होईना. तो म्हणे, तशानें माझा अर्धा चेहरा नाहींसा होईल आणि अर्धाच मला उरेल; मग मी काय करूं ? याचप्रमाणें आपले केसांची बट, आपलीं नखें, वस्त्राची चिंधी किंवा उष्टें अन्न, यांपैकीं कांहींहि चेटकीचे हातीं लागल्यास त्यावर ती मंत्रप्रयोग करून आपणास उलथील म्हणून थरकभिणारे लोक आहेत.

ब्रिटिश कोलंबिआंतील इंडियन लोक आहेत त्यांना आपलें नांव दुसऱ्याला सांगण्याचें फार भय वाटतें. अलगांकिन नांवाची एक रानटी जात आहे त्यांतील लोक आपलें पाळण्यांतलें नांव फक्त आपल्या आप्तांस व मित्रांसच सांगतात; आणि व्यवहारासाठीं आपणास ते कांहींतरी टोपण नांव ठेवून घेतात. हिंदुस्थानांतहि नामप्रकाशनाचे कामीं मनाईचीं बरींच सदरें आहेत.

( श्लोक )

आत्मनाम गुरोर्नाम । नामातिकृपणस्यच ॥
आयुष्कामो न गृह्णीयात् । जेष्ठापत्यकलत्रयोः ॥ १

भावार्थः—ज्याला पुष्कळ जगण्याची इच्छा असेल त्यानें आपलें स्वतःचें, आपल्या गुरूचें, कोणाहि अत्यंत

कृपणाचें, वडील मुलाचें आणि आपल्या सौभाग्यवतीचें नांव घेऊं नये. (सौभाग्यवतीनें पतीचें घेऊं नये हें अनुमेय समजावें ).

काफीर लोकांत व आफ्रिकेंतील कांहीं जातींतहि अशाच प्रकारची समजूत आहे. त्यांतील बायका ' तिकडचें ' नांव घ्यायच्या नाहींत. कांहीं देशांत मृत मनुष्याचें नांव घेण्यास लोक भितात. उत्तर-दक्षिण अमेरिकन, सैबीरिअन, पेपान लोक, आस्ट्रेलिअन, आणि शेटलंडांतील लोक, यांतील विधवा आपल्या मृत भर्त्याचें नांव उच्चारीत नाहींत.

एवढें तेवढें कांहीं गैर झालें कीं अडाणी जातींना वाटतें कीं कोणीं कांहीं करणी केली, देव उठवला, किंवा भूत घातलें. आणि मग या समजुतीनें ते बिचारे व्याकूळ होऊन जातात.

पूर्वींचे रोमनलोक आपणास सुधारलेले व सुविद्य म्हणवीत, तथापि त्यांच्यांतहि असलें खूळ होतें. धडसें जिचें स्वरूप लक्षांत येत नाहीं अशी कांहीं वस्तु दृष्टीस पडली कीं त्यांना कांहीं तरी विपरीत आहे म्हणून धास्ती वाटे. सृष्टींत जिथे तिथे त्यांना गूढें भरलेलीं दिसत व तीं पाहून ते दहशत घेत व त्यांना देव समजून शरण जात.*

* रोम शहरचें खरें नांव ' व्हलेन्शिआ ' होतें. पण तें शत्रूस कळल्यास तो त्यावर चेटूक करून रोमचा नाश करील या भयानें तें गुप्त ठेविलें होतें. अखेर तें व्हलेरिअस सोरॅनस यानें उघड केलें, तेव्हां त्या अपराधाबद्दल लोकांनीं त्याला देहान्त शासन दिलें.

त्याच वेळीं ग्रीकलोकहि सुधारलेलेच होते. पण त्यांची समजूत वेगळी असे. त्यांना अशी एकादी गूढ गोष्ट दृष्टीस पडली तर ते गोंधळून न जातां तिचा शोधकदृष्टीनें विचार करून तींतलें गूढ उलगडीत व तीहि सृष्टिनियमांप्रमाणेंच घडली आहे, असें लोकांस स्पष्ट करून दाखवीत.

ग्रहनक्षत्रांवर विश्वास ठेवून वागणारे पुष्कळच आहेत. शनी लत्तेला आला, मंगळ वक्रीं आला, म्हणून व्याकूळ होऊन त्या त्या ग्रहांची आराधना, उपास करणारे कितीक तरी आढळतात. प्रसिद्ध महाडकर ज्योतिषी कै० बाबाजीराव यांनाहि प्रतिकूल ग्रह बाधा करितात हें मान्य असे; परंतु, ती बाधा टाळणें तर अक्षांशरेखांशानुरोधानें त्यांचा अंमल जेथें तसा पोंचणार नाहीं अशा अन्यस्थळीं जावें, उपास आणि दानें करीत बसणें निरर्थक आहे, असें ते म्हणत. आमच्यांतला एक सिद्धांती तिसरेंच म्हणतो:—

( श्लोक )

वैद्या वदंति कफ-पित-मरुद्विकारान् ।
ज्योतिर्विदो ग्रहगणं परिवर्तयंति ॥
भूताभिषंग इति भूतविदो वदन्ति ।
प्राचीनकर्म बलवन्मुनयो वदन्ति ॥ १

भावार्थः—कोणाला कांहीं दुखणेंबाहणें आलें असतां वैद्यलोक हा कफ-वात-पित्ताचा बिघाड आहे असें म्हणतात; ज्योतिषी मंडळी ग्रह उलटे पालटे करीत

सुटतात; देवऋषी पिशाचबाधा झाली म्हणून सांगतात; आणि विचारी मुनि रोग्याचें जबरदस्त पूर्वकर्मच त्याला नडतें आहे असा अभिप्राय देतात.

यूरोपांत मध्ययुगांतील कालांत नद्या, पर्वत, तळीं, विहिरी, दऱ्या, समुद्र, वनें, क्षेत्रें या सर्वांचे ठिकाणीं भूतें–खेतें, पिशाच, वेताळ, खैस, जखिणी इत्यादि उपद्रवकारक भूतांची वस्ती असतेच असते अशी समज असे. व या समजुतीनें किती तरी गोंधळ उडवला असल्याची इतिहासांत साक्ष आहे. हा भुताटकीवरचा विश्वास केवळ अडाण्यांतच नसून सुशिक्षित राजकुलापर्यंत होता. पहिला जेम्स राजा असें समजे कीं, जर एकादे चेटकीनें कोणाहि मनुष्यासारखें मेणाचें बाहुलें करून त्याला त्या मनुष्याचें नांव देऊन जाळलें तर तत्काळ तो मनुष्य इकडे दग्ध होईल–निदान मरेल तरी. लबक म्हणतो, आजकाल शास्त्रीय ज्ञानाचा प्रकाश झाल्यानें असल्या खुळ्या समजुती नष्ट झाल्या आहेत, ही आनंदाची गोष्ट आहे.

आल्प्ससारखे, हिमालयासारखे विशाल व गगनचुंबी पर्वतांना पाहून तर त्या काळचे लोकांची घाबरगुंडीच वळे. लिओनार्डो बर्नी म्हणून एक गृहस्थ अर्लबर्ग पर्वतांतील आपल्या प्रवासाचें वर्णन करीत असतां म्हणाला, " न-

रे बाबा, तें स्मरण देखील नको. त्या प्रचंड विक्राळ पर्वताचें नांव ध्यानांत येतांच भयानें ापली अजून छाती धडधडूं लागते ! कसला क्षसी पर्वत तो "! बर्नर्ड नांवाचा एक मोठा धु सन ११८८ सालीं आल्प्स पर्वताचे घाट ढत असतांना काळवंडून जाऊन परमेश्वराला रण जाऊन म्हणाला, " दयाघना, मला या संगांतून कसें तरी वांचवा, म्हणजे मी दुनि- त जाऊन लोकांना सांगून टाकीन कीं, बापहो, म्हांला जीविताशा असेल तर या भ्यासुर पर्व- ाकडे तोंड देखील करूं नका ". मॅडम डी. टील मोठी ग्रंथकर्त्री होती तरी ती म्हणे:— ी एकाद्या दूरस्थ विद्वानाचें संभाषण ऐकण्या- ाठीं खुष्कीनें पांचशें कोस रखडत जाईन, पण ा मेल्या अफाट नेपल्सच्या उपसागराकडे डोळा घडून देखील पहाणार नाहीं.

त्या काळींहि या गिरि-अरण्यांचे देखाव्याला ा भिणारे असे कांहीं लोक होते; तथापि तेहि तिचे सप्रेम उपभोक्ते मात्र खास नव्हते. निकोले ा आपले ग्रंथांत म्हणतो कीं, त्या काळीं जर कोणीं एकाद्यानें घरापाशीं बाग केलाच तर तो स्वतःचे उपभोगासाठीं नसून केवळ शोभा म्ह- ून केलेला असे. गोल्डस्मिथसारख्या कवीला स्कॉटलंडांतील शैलसंघाचा राग येई. तो म्हणे,

" शोभा कशाची, पांथांचे मार्गांत नसत्या अडचणी मात्र; त्यापेक्षां हालंड देश चांगला " ! गिलिपननें सन १७८८ त कंबर्लंडमधील पर्वत व जलाशय यांवर एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत तो लिहितो कीं, " येथील अत्यंत विस्तीर्ण व उच्च पर्वत पाहून ऑव्हिसन नामक गृहस्थ म्हणे:–ही ह्या देखाव्याची भीषणचारुता मला सुख देत नाहीं. एकामागें एक उभे असलेले हे असंख्य शिलोच्चय तर दृष्टीचा निरोध करून अपायच करितात. असल्या ह्या कुरूप राक्षसांचें दूरादवलोकन बरें. कारण, ' दूरतः पर्वता रम्या ' दुरून डोंगर साजरे या म्हणीप्रमाणें अंतरामुळें त्यांचें कुरूपत्व नाहींसें होऊन आलोकनक्षम तरी होतील ".

वर्डस्वर्थ कवीनें पिटर बेल नामक एका अरण्यवासी मनुष्याचें वर्णन दिलें आहे, त्यांत तो म्हणतो:–" बिचाऱ्या बेलचें सर्व आयुष्य गिरिकंदर, वृक्षराजी, नदीतीरें इत्यादिकांतच वेंचलें; तथापि, वनश्री म्हणून कांहीं एक विश्रांतिविषय आहे, याची त्याला कल्पना देखील आली नाहीं ". टेनिसन हा तर रसिकाग्रणी, पण त्याची देखील बहिःसृष्टीवर थोडीशी इतराजीच दिसते. तो म्हणतो, " बहिःसृष्टि रुधिरप्रिय आणि हिंस्रतापूर्ण आहे ". पण

सृष्ट्युपासक लबकला हें बोलणें रुचत नाहीं. तो म्हणतो, टेनिसनसारख्यानें प्रकृतिरमणीवर असला आरोप करणें अयोग्य आहे. रानावनांत हिंस्र पशूंचा संचार असेल; एक प्राणी दुसऱ्या प्राण्याला फाडून खात असेल; म्हणून तेवढ्यानें प्रकृतीचे राज्यांत केवळ हिंस्रपण भरलें आहे, आणि आरामकर असें कांहीं नाहीं, हें म्हणणें पक्षपाति आहे. मनुष्यें रोगानें महिनोगणती आंथरुणांत खितपून मरतात, त्यापेक्षां पशूंचें तडकाफडकीं मरणेंच अधिक बरें. लबकचे मतें सृष्टिदेवीचे साम्राज्यांत क्रीडत असतां हिंस्र पशूंच्या दाढेंत सांपडून, गिरिशृंगावरून कोसळून, किंवा एकादे जलाशयांत बुडून आलेला मृत्यु, घरीं आंथरुणावर येणाऱ्या मृत्यूहून अधिक सुखावह. लबकचें इतकें असीम सृष्टिप्रेम आहे.

एका दृष्टीनें ज्ञानी मनुष्यापेक्षां अज्ञानी श्वापदांचीच स्थिति सुखकर. कारण, मनुष्याचे मागें जशा अनंत प्रकारच्या चिंता–व्यथा असतात, तशा पशूंना मुळींच नसतात. उद्यां काय खावें म्हणून कोणी पशु फिकीरींत पडतांना पाहिलेला नाहीं. सहस्र उपाधींनीं भरलेल्या मानवी चैनींपेक्षां ही पशूंची साधी परंतु निश्चित स्थिति अधिक सुखावह नव्हे काय? खरोखर, या बाबतींत पशूंचें गुरुत्व मनुष्यानें घेण्यासारखें आहे,

असें विचारी माणसांना वाटल्यावांचून रहाणार नाहीं. सारांश, ज्याला खरी शास्त्रीय दृष्टि आली त्याला पशुसृष्टि व बाह्यप्रकृतीहि तिरस्कार्य न वाटतां प्रेमास्पदच वाटेल. आणि सृष्टिदेवीबद्दल खरें खरें प्रेम उपजण्यास केवळ कविजनांची सहृदयता पुरेशी नसून तिचे जोडीला शास्त्रीय मार्मिकताहि असली पाहिजे अशी खात्री होईल. थिओबोल्ड नामक जर्मन गृहस्थ म्हणतो, " आपणाला कोणत्याहि पर्वताची अंतर्घटना ज्ञानचक्षूनें आरशासारखी स्वच्छ दिसेपर्यंत आपणास त्याचें सत्यज्ञान झालेंसें म्हणतां येणार नाहीं ". व सत्य ज्ञान नाहीं तोंपर्यंत तद्भव आनंदहि नाहीं, हें उघडच आहे.

आमच्यांत सृष्टिप्रेम व सृष्टिवर्णन यांचा जवळ जवळ अभावच आहे, अशा प्रकारचे आमच्यापैकीं अलीकडील आंग्लसारस्वतपटूंचे आमच्या लोकांवर आक्षेप आहेत. त्यांस उत्तर असें आहे कीं, अज्ञान म्हटलें म्हणजे तें अनर्थावह ठरलेंच. मग तें कृतयुगांत असो वा कलियुगांत असो, युरोपखंडांत असो कीं भरतखंडांत असो. या न्यायानें पहातां, चालू भागांत जे अज्ञानाचे परिणाम वर्णिले आहेत ते ज्यांत दिसून येतात, अशीं माणसें आमच्या या भरतखंडांतहि अडाणी वर्गांत बहुत आहेत; व तीं कुठेहि असणा-

रच. बाकी, ज्ञानीवर्गासंबंधें पहातां या भरतखंडांत सृष्टचमत्कारांचे मार्मिक प्राचीनतम कालापासून आढळतात. ऋग्वेदाहून प्राचीनतर ग्रंथ ब्रह्मांडांत नाहीं, असें पाश्चात्य शहाण्यांनीं देखील कबूल केलें आहे. या ऋग्वेदांतच पर्जन्य, मेघ, सूर्योदय, संध्यासमय, रात्रि, उषःकाल यांचीं वर्णनें इतकीं मार्मिक व सहृदय आहेत कीं त्यांच्या तोडीचीं वर्णनें कोणत्याहि कवीच्या किंवा सृष्टिशास्त्रज्ञाचे लेखणींतून उतरणें दुर्घट आहे. आमचा आदिकवि वाल्मीकि याच्या सुप्रसिद्ध काव्यांतील वनश्रीचीं व जलाशयाचीं वर्णनें वाचीत असतां आपण तडागारामांतच उभे असल्याप्रमाणें सुख होतें. आमचे ऋषि-मुनि-यतींना तर सृष्टिदेवीचे उत्संगावर खेळण्याचा अतोनात नाद. आधुनिक बाण, शूद्रक, भवभूति, मुकुंदराज प्रभृति कविवर्य सृष्टिदेवीचें विलोभनीय स्वरूप पाहून अनेक ठिकाणीं प्रेमोद्गार टाकितांना आढळतात. विद्वानांचें असो; पण आमची साधीभोळी लोकप्रिय शकुंतला ताई, तिजवर तरी वनश्रीचें कोण प्रेम? ती सासरीं जाऊं लागली तर तिच्या बोळवणीच्या वेळीं—

( साकी )

क्षीरतरूनें शालु दिला (हो) । लाक्षारस दुसऱ्यानें ॥<br>
इतर लतांनीं हात उभारुनि । दिधले (हो) दागीने ॥१

—**संगीत शाकुंतल**

अशा अर्थाची साक्षात् कविकुलगुरूची साक्ष आहे. आणि बेटा हरिणपाडस तिचा ओंचा ओढूं लागला. ठीकच आहे; प्रेम द्यावें आणि प्रेम घ्यावें. कारण, तिनें आपल्या दिव्यरूपाचा गर्व एकीकडे ठेवून हरिणशावांपासून मुग्धाविलोकिताचा उपदेश घेतला होता.

आमची देवमण्डळी तर सृष्टिदेवीच्या हृदयवल्लभांपैकींच दिसते. आमचे नंदजीके लालांना कुंजाविहार, वनमालाधारण, वंशीवादन, व गोपालन यांसारखें प्रिय कांहींच नाहीं. आमचे अयोध्याधिप जरी शहरी होते, तरी त्यांनींहि ऐन उमेदीचीं चौदा वर्षें वृक्षलतासान्निध्यांतच काढलीं. आमचे भूतपति भोलांनाथांचें सदैव राहाणेंच गिरिशिखरीं. सहवासाचें माणूस तें पर्वतराजाचेंच अपत्य. परिधान गजचर्म. अलंकार पवनाशन आणि प्रियवस्तु म्हणजे "चावल चंदन बेलकी पतिया, व गंगा". एक चिरंजीव गजमुख, दुसरे शिखिवाहन. याहून सृष्टिप्रेमाचें अधिक प्रदर्शन दुसरें कोठें शोधावें? सारांश, सृष्टिप्रेमासंबंधें अनादिकालापासून या भरतभूमीची स्थिति युरोप खंडापेक्षां कितीतरी सरशी आहे.

इंग्रजी वगैरे कित्येक भाषांत चंद्र, सूर्य, पृथ्वी, जल, वायु इत्यादि सृष्टवस्तूंना एकएकच वाचक शब्द आहे; परंतु आमच्या संस्कृतभाषेंत या प्रत्ये-

कीस दहावीस, पंचवीस पर्याय शब्द आहेत. आणि हे पर्याय शब्द म्हणजे त्या त्या वस्तूमध्यें दिसून येणाऱ्या गुणधर्मांचे बोधकच आहेत. निघंटांत व अमरांत पृथ्वीला ‘ गौः ’ असा शब्द आहे व ‘ स्थिरा ’ असाहि दुसरा शब्द आहे. अर्थात् हे शब्द घडणाऱ्या आमच्या पूर्वजांना तिचें शास्त्रीय दृष्टीनें असणारें ‘ गतिमत्त्वहि ’ ज्ञात होतें व व्यवहारकालीं असणारें ‘ स्थिरत्व ’ हि ज्ञात होतें. चंद्राला ‘ ओषधीश ’ म्हटलें आहे, कलानिधि म्हटलें आहे, ‘ चंद्र ’ हि म्हटलें आहे. अर्थात्, त्याचे ठिकाणीं रहाणारा ओषधिपोषणाचा गुण, क्षयवृद्धिधर्म, व आल्हादकत्व हीं सर्व ध्यानांत येऊनच ह्या संज्ञा दिल्या गेल्या. आणि हे भिन्न भिन्न गुणधर्म दृढ अवलोकनाशिवाय ध्यानांत येणार नाहींत व हृदयांत त्या वस्तूंबद्दल प्रेम असल्याशिवाय त्या वस्तूचें मुहुर्निरीक्षणहि कोणी करणार नाहीं. यावरून आमच्या पूर्वजांचें सृष्ट्यवलोकन व सृष्टिप्रेम कसें होतें हें कोणासहि समजून येईल. आह्मी मात्र त्यांचा कित्ता ताजा ठेवावयाचें विसरत आहों, हें बरें नव्हे.

( श्लोक )

स्निग्धश्यामाः क्वचिदपरतो भीषणाभोगरूक्षाः ।
स्थाने स्थाने मुखरककुभो झाङ्कृतैर्निर्झराणाम् ॥
एते तीर्थाश्रमगिरिसरिद्गर्तकांतारमिश्राः ।
संदृश्यंते परिचितभुवो दण्डकारण्यभागाः ॥ १

भावार्थः--रामचंद्र म्हणतात, हे दण्डकारण्याचे भाग जे कांहीं वृक्षांचे दाटीमुळें स्निग्ध व श्याम असे दिसतात, अन्यत्र उजाड मैदानामुळें रूक्ष भासतात, जागजागीं झऱ्यांच्या वाहणीच्या झर्झर आवाजानें जेथील दिशा नादमय होऊन गेल्या आहेत, व ज्यांत अनेक तीर्थें, आश्रम, डोंगर, नद्या, खाडे, जंगलें यांची खिचडी आहे, ते पूर्वपरिचितसे दिसतात.

( श्लोक )

यत्र द्रुमा अपि मृगा अपि बन्धवो मे ।
यानि प्रियासहचरश्चिरमध्यवात्सम् ॥
एतानि तानि बहुनिर्झरकंदराणि ।
गोदावरीपरिसरस्य गिरेस्तटानि ॥ २

**--उत्तररामचरितम्**

भावार्थः—जेथील वृक्ष तसेच मृगहि माझे बंधु होते, आणि जेथें प्रियेच्या समागमांत मी दीर्घकाल राहिलों होतों, तोच हा अनेक झरे व दऱ्या यांनीं युक्त गोदावरी तीरच्या गिरीचा कांठ.

# प्रकरण १२

## सृष्टिप्रेम

( श्लोकचरण )

* नादत्ते प्रियमण्डनाऽपि भवतां स्नेहेन या पल्लवम्।

---शाकुंतलम्

वसंतऋतु जर आयुष्यांत एकवारच येता; दिनमणीचा उदयअस्त नित्य न होतां वर्षाकाठीं एकवेळच होता; बहुरंगी इंद्रधनुष्य शतवर्षांनीं एकदांच दिसतें; सुंदर पुष्पें जर माणकांइतकीं दुर्मिळ असतीं, आणि हिमबिंदु हिरकण्यांइतके दुष्प्राप्य असते, तर ह्या गोष्टी किती तरी आश्चर्यकारक वाटल्या असत्या; आणि त्यांच्या दर्शनानें आपणास आनंदहि किती तरी अनिर्वाच्य झाला असता.

दयाळू परमेश्वरानें या गोष्टी विपुल ठेविल्यामुळें आपले हातून त्यांची अवगणना होते. कारण, म्हणच आहे, ' अतिपरिचयादवज्ञा '. गेटी म्हणतो, " इंद्रधनुष्य हें इतकें चित्रविचित्र व चित्ताकर्षक आहेना ? तथापि तें सारखें घटकाभर

---

* अर्थः—नटण्याची तिला हौस खरी; पण हे वृक्ष हो, तुमच्यावर तिचें प्रेम असल्यामुळें ती तुमचे पल्लवाला हात लावीत नाहीं.

राहूं द्या, म्हणजे त्याजकडे कोणीहि पाहणार नाहीं". जनांची चालच ही. कवि म्हणतो, "नव-नवगुणरागी प्रायशः सर्वलोकः।"—"वस्तू वाटे नवी तों अवड बहु तिची लोकरीती अशी हे।". मनुष्य म्हणतें, अं:, त्यांत काय पहावयाचें आहे? तें नित्याचेंच आहे. पण खरें पाहतां, या ज्या नित्याच्या गोष्टी, त्याच अत्यंत मनोहर आणि अत्यंत अवश्यकहि आहेत; आणि ज्याची दृष्टि शास्त्रपूत झाली असेल, त्याला ह्या गोष्टी प्रतिदिनीं नवीन करमणूक दिल्यावांचून रहात नाहींत. आकाशांतील ताऱ्यांकडे रुचिहीन लोक वर मान करून देखील पुरेसें पहात नाहींत; पण ग्रहज्योतिषी दुर्बीन लावून रात्रीच्या रात्री डोळेफोड करीत असतो आणि त्याला आनंदहि नित्य नवा होत असतो. सर **वॉल्टर स्कॉट** म्हणे, "या जगतांत अत्यंतावश्यक आणि जीवाशीं बाळगण्या इतक्या योग्य अशा ज्या वस्तु आहेत, त्याच नित्याच्या आहेत". **ग्रे** कवि म्हणतोः—

( श्लोक )

जें क्षुद्र पुष्प फुलतें गिरिकंदरांत।
जें मंजुगीत पडतें श्रवणीं वनांत॥
हा सूर्य, हें गगन, हे क्षिति सर्व वाटे।
कीं स्वर्गिचीं उघडिती मजला कपाटें॥ १

स्वतः विधात्याच्या कुशल हातानें निर्मिलेले पुष्पांचे अनंत नेत्रानंदकर वर्ण व आकृति आणि

अनेक मार्गांनीं त्यांचे हातून होणारी लोकसेवा यांकडे लक्ष जाऊन ज्याचें मन द्रवणार नाहीं, तो मनुष्यच नव्हे. मधुमालती, वनज्योत्स्ना, स्वर्णचंपक, मदनबाण, अशोक, पुन्नाग इत्यादि अनेक पुष्प-वृक्ष-लतांचीं नुसतीं नांवेंच इतकीं श्रुतिमनोहर आहेत कीं, त्यांच्या श्रवणाबरोबर मनुष्य मिटक्या मारूं लागतो. जाई, जुई, मोगरीचा बहर राहिला बागांतच; पण आमचा हौशी चंडोल " या जाई, जुई, मोगरिला बहर तो आला।" ही नुसती नामावळी गाऊनच प्रत्यक्ष बहर भोगीत असल्याप्रमाणें खुषींत दिसतो. नामस्मरणांत ही जादू; मग त्यांचे सन्निध जाऊन एकीकडे त्यांचा तो सकलेंद्रियमोहन, मृदु, मधुर सौरभ घेत, व एकीकडे त्यांच्या त्या सतेज व टवटवीत वर्णवैचित्र्यावर दृष्टि स्थिरावीत, मनुष्य उभा राहिला असतां खरोखरच त्याला या मृत्युलोकाची क्षणैक विस्मृति पडून आपण गंधर्व, किन्नर, अप्सरा इत्यादि विलासी दिव्यजनांच्या समागमांतच आहों असें वाटतें; व पुष्पोद्यानांतील वृक्षस्कंदांवरून बसलेल्या पक्ष्यांचे सहज रमणीय कलमधुर ध्वनी ऐकतांना सांसारिक दुःखाची आठवणहि करण्यास चित्तास सवड होत नाहीं, यांत नवल कोणतें ?

डोंगर, पर्वत, अरण्यें यांसंबंधें सिसिरोचें

म्हणणें असें असे कीं, आपणास त्यांपासून जो आनंद होतो, त्याचें कारण आपली त्यांत वसती आहे म्हणून; परंतु हें म्हणणें खरें नाहीं. विशाल व उत्तुंग पर्वतांचें गभीरोदात्त रूप दृष्टीस पडतांच कोणाहि मनुष्यास करमणूक झाल्यावांचून रहाणार नाहीं. युगानुयुगें मस्तकावर शुंडाधारेनें मेघ वर्षत असतांहि जे जेरीस आले नाहींत, असले प्रोत्तुंग गिरिप्रपात आणि अखंड झंझावातालाहि दाद न देणारीं अद्रिशृंगें पाहून ज्याला म्हणून कांहीं हृदय आहे तो सहजच कौतुकाविष्ट होतो. लबक म्हणतो, " तुम्ही गिरिशृंगाकडे पहात जा, तेथून तुम्हांस साह्य मिळेल " असा जो बैबलांत उपदेश आहे तो मोठे शहाणपणाचा आहे. सृष्टिसौंदर्याची रुचि उत्पन्न करण्याला जसे सृष्टिशास्त्रवेत्ते कारण आहेत, तसेच प्रकृत्युपासक कविगणहि आहेत. रस्किन म्हणतो, " नद्या-निर्झरांना जलपूरण करणें व वायूची शुद्धता करणें एवढीच कामगिरी हे गिरिराज करितात असें समजूं नये. ही कामगिरी सामान्य आहे. त्यांची उंची कामागिरी म्हणजे आपल्या विशाळपणानें मानवी हृदयाला थक्क करून सोडून त्याचे दृष्टीवरील मोहपटल उडविणें व विधात्याच्या अजब करणीची मनुष्यास साक्ष पटवून ईश्वरी वैभवाविषयीं सतृष्ण अस-

लेलीं मानवी हृदयें तृप्त करणें ही होय. त्यांचे घटनेंत विधात्याची मोठीच शिल्पचातुरी दिसून येते. त्यांपासून एक तर मनुष्याला तत्काळ आश्रयस्थान, सुख व विश्रांति मिळते; आणि तो शोधक दृष्टीचा असल्यास, ते सृष्ट्युत्पत्तीपासूनच्या कथा त्याला सांगतात व अनंत रमणीय देखावे दाखवितात ".

अंतरिक्षाचाहि हाच प्रकार. जे प्रेक्षावान् असतील अशांना अंतरिक्ष म्हणजे विस्मय, कौतुक व आनंद यांचें एक अक्षय्य निधानच आहे. दिवसास चंडरश्मीचें तें सर्वातिशायी भास्वर शुक्ल तेज आणि वैभव पाहून डोळे थकच होतात. पुढें संध्यासमय येऊन दिनमणी अस्ताचलचूडावलम्बि झाले, म्हणजे तर ते दृष्टिक्षम होऊन त्यांस अधिकच रमणीयता येते. बरें, अल्पावकाशानें ते साफ दृष्टीआड होत आहेत, तों शीतरश्मि निशानाथ आपल्या असंख्य चमकदार सहचारिणींसह गगनांगणांत आविर्भूत होऊन आपल्या शरीरनिर्वापक ज्योत्स्नेनें सर्व जगत् भरून काढितात, तेव्हां तर असें वाटतें कीं दिनमणींच्या कारकीर्दींतली मौज हिजपुढें कांहींच नाहीं. निखिल नेत्रानंदन, विश्वतापहरण अमृतांशु नभोमंडलांत उदित झालेला पाहून कविगण आणि प्रेमीजन यांना तर काय होतें तें होतें. आईला

जसें नव्या नवसांच्या आपल्या लाडक्याला पाहून यावर काय शृंगार चढवूं आणि कोणते अलंकार घालूं असें वाटतें, तसें कविगणांना या आनंद-कंदाला कोणती उपमा द्यावी आणि कोणती न द्यावी असें होऊन जातें. आणि मग त्या उल्हास-भरांत कोणी हा दिग्वधूंचा क्रीडाकंदुक, कोणी स्वर्गंगेंतील राजहंस, कोणी ताराहारांतील मध्य-मणी, कोणी शृङ्गाररक्षामणि इत्यादि रूपकें त्या-जवर करितात. प्रेमी जनांना वाटतें कीं या सु-धाकराचें राज्य आहे तों असेल नसेल ती चैन करून घेऊं. असा हा चंद्रोदय निरुपम सुख-दायी आहे.

रात्र ही तर, शांति आणि विश्रांति मिळावी म्ह-णूनच ईश्वरानें निर्मिलीसें दिसतें. एक प्रेमी म्हणतो:

( श्लोक )

ज्योत्स्ना किती मधुर हे विहरे तटांतीं ।
एथें प्रिये बसुनि आपण एकचित्तीं ।।
ऐकूं मनोहर मृदुस्वन गायकांचे ।
जे होति रम्यतर शांतिभरें निशेचे ।। १

—शेक्सपिअर

सेंट बॅसिल म्हणतो कीं, " तुम्ही जर एका-द्या निरभ्र रात्रीं आकाशांतील तारांगणांचे सौंद-र्याकडे कांहीं वेळ सारखी टक लावून, मग अस-ल्या या कधीं न कोमेजणाऱ्या तारकारूपी

पुष्पांनीं या भव्य विश्वमंदिराचें बिस्तीर्ण छत ज्यानें चितारिलें असेल त्या चतुर कारागिराविषयीं विचार करूं लागाल, तर तुम्हांला या कुशल जगत्कर्त्याविषयीं प्रेमानें गहिंवर आल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं. त्याहूनहि पुढें तुमच्या जेव्हां असें लक्षांत येईल कीं, हें इतकें चित्रविचित्र नकास-काम नुसतें मनोहरच नसून नियमबद्ध आहे, तेव्हां तर तुम्हांला प्रेम केवळ अनावर होईल, आणि तुम्हांला असें खचित वाटेल कीं, ज्याची कृति इतकी मोहक आहे, त्याचें स्वतःचें रूप व सामर्थ्य किती तरी मनोवेधक असलेंच पाहिजे". कांहींचें असें म्हणणें आहे कीं अंतरिक्षांतील चमत्कारांवरून कर्त्याच्या अजब बुद्धिवैभवाची तेवढी साक्ष पटते; पण त्यापासून त्याचे चांगुलपणाचा निश्चय होत नाहीं. पण परमात्मा केवळ कौशल्यनिधीच नाहीं, तर दयासागरहि आहे. तुकोबा म्हणतातः—

( अभंग )

कां रे नाठवीसि कृपाळू देवासी ।
पोषितो जगासि एकलाचि ॥
फुटे तरुवर उष्णकाळ मासीं ।
जीवन तयासि कोण घाली ।
कोणें केली बाळा दुग्धाची उत्पत्ति ।
वाढवि श्रीपति सवें दोन्ही ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता ।

राहें त्या अनंता आठवूनि ॥
तुका म्हणे त्याचें नांव विश्वंभर ।
करा निरंतर ध्यान त्याचें ॥ १

शास्त्रीय प्रगतीनें तर सृष्टीचें अगाधपण प्रतिक्षणीं प्रतीयमान होत आहे. साध्या डोळ्यांना तळहाताएवढें दिसणारें सूर्यबिंब आपल्या चतुःखंड पृथ्वीच्या लक्षावधी पटीनें मोठें आहे; आणि त्याचे भोवतीं सप्तग्रह फिरत आहेत. तथापि असल्या ह्या अवाढव्य सूर्यमालेचा मध्यमणी जो सूर्य तो अनंत अंतरिक्षांत असणाऱ्या अमर्याद तेजोगोलांचे मानानें केवळ राईएवढा ठिपका आहे. हें सत्य ज्योतिःशास्त्रानें प्रतीत होतें. भूगर्भशास्त्रहि आपल्या परीनें कालाचें अनंतत्व दाखवितें. शिवाय, शास्त्राचे साह्यानें एवढेंहि अफाट विश्व आज असंख्य युगें सुतांत ओंवल्यासारखें निमयबद्ध व सुयंत्र चाललें आहे, असें आढळून येतें. असें झालें म्हणजे या अखिल नाटकाचा चतुर सूत्रधार कोण असेल, तो शोधावा म्हणून मनास सहजच वेड भरतें व चित्तांत भक्त्यादि सद्भावांचा उद्गम होऊन डोळे त्या आदिकारणाकडे लागून, वाणीला त्याचें महिम्नस्तोत्र करण्यास सहजच स्फूर्ति होते; आणि

( आर्या )

ही अद्भुत सृष्टि तुवां देवा केव्हां कधीं कशी केली ॥
याविषयींची आह्मां जीवांची कल्पना विरुनि गेली ॥ १

रविशशिनक्षत्रांही कैसें आकाशसदन शोभविलें ॥
सौंदर्य हें पहाया जीवांचे नयनवृंद लोभविले ॥ २

—परशुरामपंततात्या गोडबोले

इत्याकारक प्रेमोद्गार तिच्यावाटे स्वयंभूच बाहेर पडतात; व जीव आश्चर्य व आनंद यांत गढून जाऊन, त्याला आधिव्याधींची विस्मृति पडते; आणि दृढाभ्यासानें या विश्वरूपी मंदिरांत परमात्म्याची मूर्ति सर्वत्र विराजमान आहे, असा भाव हृदयांत ठसून जन्माचें सार्थक होतें. हे सर्व उपकार शास्त्राभ्यासाचे व सृष्टिप्रेमाचेच आहेत. असें असतां वर्डस्वर्थसारख्या कवीनें

( श्लोकार्ध )

कशाला कला आणि तीं शुष्क शास्त्रें ।
पुरे एक प्रेमार्द्र सौहार्द मात्र ॥

असें म्हणावें हें अमळ तऱ्हेवाईक आहे. शोधक बुद्धीनें सृष्टीचें सप्रेम अवलोकन केल्यानें केवळ नेत्रानंद किंवा करमणूकच होत नसून मनुष्याला अनेक उपयुक्त गोष्टींचें ज्ञान होतें. कौंट मॅटि नामक इतालियन गृहस्थानें जी " इलेक्ट्रो-होमिओ-पाथी " किंवा " वैद्युत्-अनुचिकित्सा " पद्धति शोधून काढिली हिचें गुरुत्व एका कुत्र्याकडे आहे. तें असें:—एक अंगास लूत भरलेला कुत्रा रानांत जाऊन एका वनस्पतींत लोळून येई. प्रसंगीं, त्या वनस्पतीचीं

कांहीं पानें त्याचे अंगास चिकटून येत. ह्या गोष्टीकडे मॅटीचें लक्ष असे. पुढें तो कुत्रा निर्मळ झाला. तेव्हां मॅटीनें ती वनस्पती कुत्र्याचे मार्गानें हुडकून, तिचे प्रयोग करून पाहिले, तों त्या वनस्पतीनें लुतीसारखे अन्यहि लशीचे रोग बरे होतातसें दिसलें. मग शोधावरून शोध वाढत त्यानें ही अद्भुत चिकित्सापद्धति निर्माण केली. याचप्रमाणें वानरापासून, मुंगुसापासून व अन्य अनेक प्राण्यांपासून रोगहारक उपायांचें मनुष्यास ज्ञान झालेलें आहे. डुकराचें तेल, सशाचें रक्त, गोरोचन, पलिस्तराची लस, कॉडलिव्हर ऑईल, कस्तुरी, इत्यादि किती तरी औषधि जलस्थलचर प्राण्यांपासून प्राप्त झाल्या आहेत.

एवंच, सृष्टयवलोकनापासून आनंद व करमणूक होऊन, शिवाय असल्या अनेक उपयुक्त गोष्टींचें ज्ञान होतें हें सिद्ध आहे. असें असतां मनुष्यें संसारांतील व शारीरिक दुःखांचा विसर व्हावा म्हणून पत्ते, सोंगट्या, बिलिअर्ड किंवा जुगार खेळत बसतात, अथवा गुत्त्यांत जाऊन मादक पेयांचे चषक झोंकीत राहतात, याला काय म्हणावें ? सृष्टिनिरीक्षणांत किती आनंद, ज्ञान व दुःखमोक्ष आहे, प्रत्येक वनराजी, प्रत्येक क्षेत्र, प्रत्येक उपवन, प्रत्येक जलप्रवाह किंवा जलाशय, किती सुख व कौतुक देतो, तें सांगतां

येत नाहीं. डोळे मात्र पाहिजेत. बरें; शास्त्रीय ज्ञानानें वरील व्यसनांप्रमाणें कोणाचा घात केल्याचें ऐकिवांत नाहीं. उलट, कल्पवृक्षाप्रमाणें त्यानें आपल्या भक्तांना आभर करून सोडल्याचीं उदाहरणें विपुल आहेत. सृष्टि ही केवळ सौंदर्याचेंच प्रदर्शन नसून तें शिक्षणगृहहि आहे. खरें ज्ञानगुरुत्व सृष्टीसारखें कोणाचेहि अंगीं नाहीं. म्हणूनच गौतमबुद्ध तत्त्वोपदेशार्थ मनुष्यांना सोडून वनांत सृष्टिदेवीचे निकट गेला, ही गोष्ट प्रत्येकानें लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

रस्किनचें तर सृष्टि म्हणजे उपास्य दैवतच होतें; व त्यानें आपल्या उपदेशानें अनेकांस या उपासनेस लाविलें. शिलरनें त्याला एकदां टोला मारला कीं, आपली उपास्यभूत सृष्टि नितरां रमणीय असेल; पण सौंदर्यमूढांचे हातून कामगिरी काय उठणार ? सौंदर्याचे वेडांत त्यांची कर्तव्याची बाजू ढिली पडते. त्यावर रस्किननें असा सणसणीत जबाब दिला कीं, शांत व समतोल मन ठेवून जो सहृदय मनुष्य वनसंचाराला निघेल, त्याला वनांतील प्रत्येक पाषाण, पुष्प, पर्ण किंवा ध्वनि यांपासून उमेद व कर्तव्यपरता प्राप्त झाल्यावांचून रहाणारच नाहीं. सारांश, सृष्टिसौंदर्यानें मनुष्य कर्तव्यविमुख न होतां, उलट कर्तव्यपरच होतो. शेक्सपिअर म्हणतो:

( आर्या )

शास्त्री सुबोधदाते मित्र, तसे ग्रंथ सजव निर्झरहि ॥
पाषाण धर्मवक्ते, मातेसम हितकरा समस्त मही ॥१

सृष्टिदर्शनामुळें हृदय केवळ आनंद व आश्चर्य यांनीं भरून जातें एवढेंच नव्हे, तर त्याचे ठिकाणीं ईशप्रेमहि दाटतें. शिवाय, राजकारण, धर्मपंथ, शास्त्रीय वाद, स्वकर्तव्य यांमध्यें जरी आपले व्यक्तिशः मतभेद असले, तरी वनश्रीचें सौभाग्य व वसंताची बहार सर्वांना सारखींच विवश करितात. वसंत येतांच प्राणिमात्राला जणूं नवीन चैतन्य आलेंसें होतें. मधुकालांतील ती पुष्पश्री पाहून आपलें मन तल्लीन होतें व पवनांदोलित आम्रमंजरीबरोबर जणूं नाचूं लागतें. कवि म्हणतो:

( श्लोक )

विकसित-सहकार-भारहारी ।
परिमलपुञ्जित-गुञ्जित-द्विरेफः ॥
नवकिसलयचारुचामरश्री ।
हरतिमुनेरपिमानसं वसंतः ॥ १

भावार्थः—फुललेल्या आम्रमंजरीचे हार धारण करणारा, सुगंधाकृष्ट भ्रमरपुंजांना गुंजारव करवावयास लावणारा, आणि कोमल वृक्षपल्लवरूप चामरांनीं राजासारखा शोभणारा हा वसन्त, मुनींचें देखील मन हरण करितो.

चार्लस लंबनें दिव्योद्यानांतून अडाम आणि ईव्ह हीं स्वतः होऊन दूर झालीं यावरून एके ठिकाणीं उद्यानवास म्हणजे कारावासच सम-

जावा, असें म्हटलें आहे. पण, तें म्हणणें भावार्थाचें नसून विनोदाचें आहे. कीट्स तर, शहरांत कोंडून पडलेल्या लोकांना खेड्यापाड्यांतील खुल्या हवेंत जाऊन स्वच्छंद फिरणें यासारखें अमृतच नाहीं असें म्हणतो. परंतु लबक म्हणतो, आमच्या दुर्भाग्यानें सृष्टिरमणीची निवांत गांठ पडण्याला वावटळ, धूळ, पाऊस वगैरे किती तरी अंतराय येतात. त्यांतून गांठ पडलीच तर दृष्टिमांद्य, बुद्धिमांद्य, अरसिकता वगैरे आमचे दोष आड येऊन तिचे योग्यतेनुरूप तिचें कौतुक आमचे हातून होत नाहीं. तथापि अशानें तिचे वास्तव योग्यतेला कमीपणा येतो असें नाहीं. कुपरीक्षकामुळें रत्नाची किंमत कमी समजणें अन्याय्य होईल. सुदैवानें जे कोणी वरील अंतराय व दोष यांपासून मुक्त असून तिच्या नादीं असतील, त्यांना असा अनुभव येतो कीं, जों जों तिचे रूपाशीं अधिक परिचय व्हावा, तों तों त्याचा मोहकपणा व सौंदर्य खुलत जाऊन, इतकें विचित्र असूनहि अक्लिष्ट रूप विधात्याला घडवितां तरी कसें आलें असेल याचाच मनास आचंबा वाटून रहातो. असें असतां, रूसो नामक फ्रेंच लेखक म्हणतो कीं, "सृष्टींतील सौंदर्याचा भाग केवळ काल्पनिक आहे; तिच्या प्रत्यक्ष रूपांत रमणीयता मुळींच नाहीं". हें म्हणणें खरोखरच

अरसिकालाच शोभेसें आहे. फार झालें तर इतकें म्हणतां येईल कीं, अमुक एक विशिष्ट भाग दुसऱ्याहून अधिक सुंदर आहे. परंतु तेवढ्यानें एकूण रूपाचे सौंदर्याला कमीपणा देतां येणार नाहीं. खरें म्हटलें तर, मनुष्य आपले मूर्खपणानें या रूपाला कमीपणा आणितो. मूळचा भाग निर्विवाद सुंदर असून मनुष्यच त्याचे प्रतिबिंब गचाळ उतरून त्याला कमीपणा आणितो, दुसरें तर कांहीं नाहीं. रस्किन म्हणतो, " अस्सल प्रकृतीचा जो नीरस म्हणून म्हटलेला भाग असेल तशांचें सौंदर्य जें इष्टकार्य करील, त्याचे शतांशहि मनुष्यकृत अति निपुण अनुकृतीनें होणार नाहीं. अस्सल तें अस्सल आणि नक्कल ती नक्कल".

बाभळीच्या झाडाचे कांटे बोंचतात; पण छायेचे बोंचत नाहींत. म्हणून बाभळीचे झाडांत बसण्यापेक्षां तिचे छायेंत बसणें अधिक सुखकर असतें. याचप्रमाणें, या रमणीय सृष्टीची छाया मनांत घेऊन तिचें अवलोकन करीत बसणें प्रत्यक्ष सृष्टिदर्शनाहूनहि एकेपरी अधिक सुखावह असतें; व निर्विघ्न असल्यानें मनावर अधिकच परिणाम करितें. या पद्धतीनें ज्यांनीं तिच्या दिव्य लावण्याचें परिशीलन केलें आहे, त्यांचें म्हणणें कीं, या दिव्य रूपाइतकें पुण्यपावन व चित्तशुद्धि-

कर दुसरें कोणतेंच रूप नाहीं. खरोखरच ईश्वराचे विशिष्ट प्रेमांतली ही सृष्टि असली पाहिजे. मानवी सुंदरींचें रूप पाहून प्रसंगीं दुर्विकार जागृत होतात. पण ह्या रूपावलोकनानें कुविचार उलटे नष्ट होतात; आणि या सृष्टिसुंदरीची अगाधसत्त्वता, हृदयंगम प्रेमळता, व अखंड परकार्यतत्परता हीं पाहिलीं, म्हणजे तर असा कांहीं पूज्यभाव उत्पन्न होतो कीं, सत्त्वपरीक्षणार्थ आलेले त्रिमूर्ति जसे बाळ होऊन अनसूया सतीचे पायाशीं लोळूं लागले, त्याचप्रमाणें ह्या दिव्य रमणीचे आपण बाल होऊन हिचे अंकावर क्रीडत रहावें असेंच वाटते. अकबर बादशहा म्हणे, " या सुंदरीचे अंगावरील शालू किती तरी मनोहर आहे. तो खुदानें अंगीं विणला असून त्याच्यांतील मोहक रंग तर त्यानें आपल्या खुद्द हातानेंच भरलें असले पाहिजेत. सृष्टीचा प्रियकर—काल—हाहि तिजमुळें सदा चैनींत असतो. ती त्याला दरवेळीं नवीन नवीन पुष्पांचे हार घालिते व नानाविध धान्या-फलांची मेजवानी देते".

कांहीं लोकांचा असा आक्षेप आहे कीं सृष्टिरमणी सुंदर खरीच, तथापि तिचे भक्त तिचे रूपाचा फाजील बडेजाव करितात. पण हा आरोप मिथ्या आहे. एवढी गोष्ट खरी कीं, तिचा

पेहराव सदा सारखाच भपकेदार नसतो. कधीं तो फारच भडक असतो व कधीं सौम्य व पोक्तपणाचा असतो. पण, कसाहि असला तरी त्याचा मोहकपणा अप्रतिम असतो हें मात्र मिथ्या नव्हे. कसलाहि नामांकित चित्रकार येऊं द्या; त्याला तिच्या रूपाची प्रतिकृति उठवितां नाहींच यावयाची. समग्र रूप तर राहोच, तिच्या केशपाशांतील मेघमालारूपी गजरा किंवा तिच्या क्रीडोद्यानांतील हंसाचे एका पिसाची हुबेहु नक्कल रंगवून दाखविण्याचीहि त्याची सोय नाहीं, हें त्यानें पक्कें समजावें.

कॉडिंगटन आणि नेपिअर नांवाचे दोघे गृहस्थ जलपर्यटन करीत असतां चित्रकारांच्या गोष्टी निघाल्या. तेव्हां पहिला म्हणाला, टर्नर या चित्रकाराची रंग भरण्याची कमाल आहे; असले भडक रंग आपण सृष्टींत देखील पाहिले नाहींत. या वेळीं अस्तमानसमय असून चंडकिरण सहस्रांशु पश्चिम—गिरीचा आश्रय करण्याचे बेतांत होते. नभोमंडलांत वारुणी दिशा चित्रविचित्र अशा नैकविध उज्ज्वल रंगांनीं भरून राहिली होती. व त्या रंगांची छबि खालील ऊर्मिमाली सरित्पतीचे देदीप्यमान् वक्षस्थलावर प्रतिबिंबित झाली होती. तें पाहून नेपिअर यानें गलबताचे पूर्वेस अस्तावलंबी आरक्त सूर्यबिं-

बाचे प्रभेनें रक्तमय होऊन गेलेल्या व एकीवर एक उसळ्या खाणाऱ्या त्या जलतरंगांकडे आपलें बोट करून आपले स्नेह्यास म्हटलें, " तो पहा, त्या उसळणाऱ्या लाटांचा रंग किती लाल भडक, केवळ आगीचा लोळ दिसत आहे, नव्हे काय ? तुमच्या चिताऱ्याचा लालरंग याहूनहि भडक व तजेलदार आहे काय?" या प्रश्नापुढें कॉड्रिंगटनला हार खावी लागली. कारण, सूर्याच्या आरक्त प्रभाबिंबानें सर्व समुद्रच पेटून गेल्यासारखा भडक दिसत होता, आणि त्यांतहि क्षणक्षणा एकमेकींशीं मिसळून वेणी गुंफणाऱ्या व प्रियमैत्रिणींप्रमाणें स्वच्छंदक्रीडा करणाऱ्या बहुरूपी सुंदर जलवीची यांची छबी पाहून तर तो त्यांचे दिव्यतेपुढें व सौंदर्यापुढें मूढच होऊन गेला; आणि म्हणाला, "मित्रा, लाल रंगांत आमचा चित्रकार यांची बरोबरी नाहीं पावणार, हें कबूल आहे. पण बोवा त्याचा पिंवळा रंग तर खचितच बिनतोड आहे". हे शब्द कानीं पडतांच नेपिअरनें गलबताचे पश्चिमेकडील समुद्राचा देखावा दाखवून प्रश्न केला, " कां ? हा पिंवळा कसा काय ?" येथेंहि पहिल्याप्रमाणेंच फजिता झाला. तेव्हां मग कॉड्रिंगटन आपल्या चुकीबद्दल हंसला आणि आदरबुद्धीनें म्हणाला, " मित्रा, आमच्यावर बाजू लागली बोवा; उपाय नाहीं.

आमचें बोलणें खुंटलें. खरेंच, मजपेक्षां तुला व आमचे चित्रकाराला सृष्टिसौंदर्याची कल्पना अधिक व्यक्त आहे".

( श्लोक )

सौवर्णानि सरोजानि । निर्मातुं संति शिल्पिनः ॥
तत्र सौरभनिर्माणे । चतुरश्चतुराननः ॥ १

—सुभाषित

**भावार्थः**—मानवी शिल्पी सुवर्णकमळें घडूं शकतील, परंतु त्यांचे ठायीं सुगंधोत्पत्ति करण्याचें चातुर्य एका सृष्टिकर्त्याचेंच.

हें म्हणणें सर्वथा खरें आहे. मनुष्याची अक्कल किती? सृष्टिकर्त्याचे कृतीची नक्कल करण्यापुरतीच. पण तीहि धडशी नाहीं. मॅडम सेविनी ही वसंतोत्सवार्थ एका जनपदोद्यानांत गेली असतां, तेथील रंगी-बेरंगी नूतन पालवी पाहून इतकी मोहित झाली कीं, तिनें आपल्या मुलीला पत्र लिहून म्हटलें, "माझे प्रिय कन्ये, या कोमल किसलयांचे नैकविध तजेलदार रंग पाहून मला वाटतें कीं, बालार्काचे किरणांतील सर्वहि रंग यांवर ओतले असावे. उपवनाचे कांहीं भागांत तर किनखाप पसरलासा वाटतो. खरेंच, या स्थळाचे निसर्गरमणीयत्व पाहून मी तर वेडी होतें. मी जातें आहें कोठें, पहातें आहे काय, जागी आहे कीं झोंपी आहें, हें मला कांहींच कळत नाहींसें होऊन जातें". मॅडम सेविनी तर

मार्मिकच बाई होती. तिला मोह पडण्यांत विशेष नाहीं. परंतु दुष्यन्ताची दासी ती काय ? पण ती देखील म्हणते—

सुखवि नयन किति ही आम्रकली ।
थोडी तांबुस हिरवी धवली ॥

**—संगीत शाकुंतल**

रमणीयतेची एका रसज्ञानें व्याख्या दिली आहे:—" क्षणक्षणे यन्नवतामुपैति । तदेव रूपं कमनीयताया:॥" म्हणजे प्रतिक्षणीं नवी नवी मोहक झांक दाखविणें हें रमणीयतेचें स्वरूप समजावें. हें लक्षण सृष्टीला कितीतरी पूर्णत्वानें लागू पडतें. प्रति ऋतूला पुष्पें, फळें वेगळीं, हवामान वेगळें, देखावे वेगळे. बरें, प्रत्येकाची खुमाष, प्रत्येकाची बहारहि वेगळीच. हें दर ऋतूलाच नव्हे; पण, दर क्षणालाहि म्हणणें अतिशयोक्ति होणार नाहीं. एक कवि म्हणतो:—" अहो नवनवाश्चर्यनिर्माणरसिको विधिः "—अहो ! दर वेळीं नवी नवलाई करून दाखविण्याचें या सृष्टिकर्त्याला वेडच दिसतें. हें म्हणणें मिथ्या नव्हे. कांहीं काल तर विशेषच विलोभनीय व चेतोहर असतात. प्रशांत प्रभातकाल, संध्याकाल यांचें मोहकत्व सर्वसंमतच आहे.

मुलांचे ठिकाणीं सृष्टिप्रेम व नूतन वस्तूविषयीं आदर हीं सहज असतात व यामुळें कित्येक मुलें पक्षी, प्राणी, वनस्पति, पाषाण किंवा

दुसरी कांहींहि मौजेची वस्तु मिळाली म्हणजे ती संग्रहीं ठेवितात. विलायतेंत कांहीं लोकांचे घरीं असले वस्तुसंग्रह चांगलेच आहेत. हा संग्रहाचा नाद स्तुत्यच आहे. परंतु, हा संग्रह इष्टमित्रांना केवळ दाखविण्याकरितां किंवा शोभेकरितांच असतो, असा पुष्कळ ठिकाणीं अनुभव येतो, हें बरें नव्हे. त्या संगृहीत वस्तूंचें लक्षपूर्व अध्ययन करून बोध घेतला, तर त्या संग्रहाचें सार्थक. शिवाय लबकचे मतें प्राणी आणि वनस्पति हे घरांत आणून ठेवण्यानें त्यांची निम्मे मौज जाते; ते वनांत स्वच्छंद विलासांतच पाहिजेत; तेव्हां त्यांची खरी बहार व खरें स्वरूप कळतें. यामुळें संग्रह करीत बसण्यापेक्षांहि वनांत जाऊन त्यांचा अभ्यास करणें अधिक इष्ट आहे.

आमचेकडे वस्तुसंग्रहाचा नाद युरोपाइतका नाहीं असें धरून चाललें तरी सृष्ट स्थावर-जंगम पदार्थांचें निरीक्षण करून त्यांपासून बोध घेण्याची हतोटी मात्र पाश्चात्यांहूनहि अधिक आहे. सुभाषितांतील अन्योक्ति प्रकरण म्हणजे या सृष्टपदार्थांपासून बोधग्रहणच आहे. सूर्य, चंद्र, मेघ, वायु, समुद्र, पर्वत, नदी, तडाग, कूप, दावानल, व्योमचर, जलचर, स्थलचर, वृक्षवल्ली—यावद्वस्तूंपासून अमोल बोध घेतलेले आहेत. वृद्धचाणक्यांत म्हटलें आहे:—

( श्लोक )

सिंहादेकं बकादेकं । षट्शुनस्त्रीणि गर्दभात् ॥
वायसात्पंच शिक्षेश्च । चत्वारि कुक्कुटादपि ॥ १

**भावार्थः**—सिंहापासून एक गुण शिकावा; बकापासून एक; कुत्र्यापासून सहा; गर्दभापासून तीन; वायसापासून पांच आणि कोंबड्यापासून * चार.

दाराशीं नुसत्या कुंड्या मांडणें किंवा पिंजरे टांगणें यापेक्षां ही सारग्रहणदृष्टि संपादणेंच अधिक श्रेयस्कर आहे.

सदरबाजारांतून जावें तों 'मौजेच्या जिनसा' विकणारांचीं कांहीं दुकानें लागतात. या दुकानांतून नानाप्रकारचे मौजेचे मुलांचे खेळ असून त्यांतच कांहीं कोडीं किंवा कूटांच्या रूपाचे खेळ असतात. पण सृष्टीमध्यें या खेळांचे शतपटीनें मनोरंजक व सोडविण्यास अवघड अशीं अनंतावधि कोडीं बिन पैशानें पहावयास मिळतात. तीं सोडविण्याचा यत्न करणें वरील खेळ-

---

* विस्तारभयास्तव येथे फक्त कोंबड्यापासून घेण्याचे गुण देतों.

( श्लोक )

युद्धंच, प्रातरुत्थानं । भोजनं सहबंधुभिः ॥
स्त्रियमापद्गतां रक्षेच्चतुः शिक्षेत कुक्कुटात् ॥ १

**भावार्थः**–उजाडत उठणें, झुंज खेळणें, जातीसह भोजन करणें व विपत्कालीं स्त्रीचें रक्षण करणें हे चार गुण कोंबड्यापासून शिकावे.

ण्यांपेक्षां अधिक बरें. प्रत्येक शास्त्राचीं, प्रत्येक विषयाचीं कोडीं वेगळालींच आहेत. लबक म्हणतो, फक्त 'भूगोल व प्राणिजीवन' या दोन विषयांवरील कोडीं मी येथें देतों त्यांचीं उत्तरें कोणाहि चतुरानें द्यावीं.

( १ ) वेल्स आणि लेक डिस्ट्रिक्ट या भागांतच पर्वतांची एवढी गर्दी कां ?

( २ ) इंग्लंडांतलि टेम्स नदी पूर्वगामिनीच कां ?

( ३ ) कॉट्स्स वोल्ड डोंगर हे आग्नेयी दिशेला कडयांसारखे तुटक कां आणि नैर्ऋत्येला क्रमानें उतरते कां ?

( ४ ) टेम्सचे दक्षिण तटाकाला असणाऱ्या नार्थ डौन्स आणि सौथ डौन्स यांचें परस्पर नातें काय ?

( ५ ) हा इंग्लिश चॅनल कोणत्या सालीं मूळ निर्माण झाला ? त्याचें वय काय ?

( ६ ) स्काटलंडांतील डोंगरांच्या रांगा एकमेकांशीं काटकोनच कां करितात ?

( ७ ) स्काटलंडांतील कांहीं सरोवरें इतकीं अथाक खोल कां ?

( ८ ) बीच वृक्षाच्या बिया तिकोनी कां, सिकमूर वृक्षाच्या वाटोळ्या कां ?

( ९ ) बीच वृक्षाचीं पानें लांबट असून तीक्ष्णाग्र कां, आणि सिकॅमूरचीं पानें हाताचे पंजासारखी फांकलेलीं व फताडीं कां ?

( १० ) बीच वृक्षांचीं पानें अखंड कां, ओकवृक्षाचे पानांना कातर कां ?

( ११ ) कांहीं वृक्षांचीं पानें पसरट कां ? कांहींचीं चिंचोळीं कां ?

( १२ ) कांहीं पुष्पें चंद्रविकासि कां, कांहीं सूर्यविकासी कां ?

( १३ ) पुष्पें मिटतात, तीं मिटावींच कां ?

( १४ ) कित्येक पुष्पांना पांचच पांकळ्या कां ? कांहींना नळकांड्या कां ?

( १५ ) शुभ्र आणि फिका-पिंवळा या दोन रंगांचेच पुष्पांना बहुधा अधिक मधुर सुवास कां ?

( १६ ) वाघाचे अंगावर पट्टेच कां ? चित्त्याचे अंगावर ठिपकेच कां ? सिंहाचा रंग पिंगट कां ? मेंढराचा उदी कां ? आणि कांहीं सुरवंटाचा हिरवट कां ?

( १७ ) मासे पाठीकडून दाट काळे व पोटाला फिके काळे कां ?

( १८ ) सोल जातीचे माशाचे दोन्ही डोळे एकाच अंगाला कां ?

( १९ ) कोंबड्याचें अंडें लांबट कां ? दिवाभीताचें वाटोळें कां ?

( २० ) पशु हा मनुष्याहून सदृढ असतां त्याचे आयुष्य २०।३० वर्षेंच कां ? मनुष्याचें १००।१२५च कां ? वृक्षाचें सहस्रावधि कां ?

हे प्रश्न वाचून सामान्यांना हंसू येईल. ते म्हणतील, कीं रिकामटेकड्यांचे हे उद्योग आहेत; या प्रश्नांना कसलीं उत्तरें आणि त्यांपासून फायदा तरी काय ? पण ज्यांची बुद्धि शास्त्रपरिष्कृत झाल्यानें या अफाट पद्मभवांडांत सूर्यमालेपासून तों अणु-त्रसरेणूपर्यंत प्रत्येक पदार्थाची स्थिति, गति, आकृति कायद्यानें बनलेली

असून प्रत्येक गोष्ट सहेतुकच आहे,—अमुकच माणसाचे गालावर तीळ कां, दुसऱ्याच्या मानेवर कां, हें देखील सप्रमाण सांगतां येतें,—अशी ज्यांची अनुभवानें खात्री झाली आहे त्यांना हे प्रश्न वेडगळ वाटणार नाहींत. व शोध करीत राहिल्यास यांचीं उत्तरें कालांतरानें तरी मिळतील. * आणि तीं मिळाल्यावर त्यांचा फायदाहि दिसून येईल असें समजावें.

पुष्कळ लोक शौकास्तव जनावरें पाळतात; त्यांचा लक्षपूर्वक अभ्यास करीत नाहींत. कांहीं शास्त्रज्ञांचे मतें पशु हीं केवळ चालतीं बोलतीं यंत्रें आहेत. कांहींचें म्हणणें त्यांना थोडीशी तरी मेधा, विचारशक्ति, व बऱ्यावाईटाचें ज्ञान आहे. पण ही विचारशक्ति किती किमतीची आहे? दोन आणि दोन मिळून चार होतात, हें हत्ती, कुत्रा, माकड वगैरे विशेष सुबुद्ध मानिलेल्या प्राण्यांस कळूं शकेल कीं काय? तसेंच एकादी सुंदर वस्तु पाहिल्यानें मनुष्याप्रमाणेंच त्यांना हर्ष होतो कीं काय? वगैरे गोष्टी तपासण्यालायक

* आपलेकडील प्रसिद्ध गणिती कै० केरूनाना छत्रे यानीं आपली ही पृथ्वी कशी बनली, तीवरील नद्या, पर्वत, समुद्र यांच्या जागा अमुकच कां, हें निर्णीत केलें आहे. परंतु, ही त्यांची कल्पना अजून पुस्तकरूपानें जगापुढें आली नाहीं.

आहेत, व कळल्यास फायदाहि आहे. कुत्रा परिचित माणसाचा माग, त्याचीं पावलें उमटलेल्या धुळीचा किंवा गवताचा वास घेऊन त्यावरून काढितो, ह्या गोष्टीचा फायदा कित्येक राजकारणी पुरुषांनीं घेतला आहे. कबूतरें शत्रूचे छावणींत हेरांचें काम करूं शकतात. इत्यादि शोध उपयुक्त नाहींतसें कोण म्हणेल ?

नुसत्या झाडांच्या पानांच्या व फुलांच्या म्हटल्या तरी हजारों हजार प्रकारच्या भिन्न भिन्न आकृति, तशाच फळांच्या भिन्न भिन्न रुचि ह्यांना कांहीं तरी कारणें असलींच पाहिजेत. पपनसहि लिंबू, संत्राहि लिंबू, ईडहि लिंबू, महाळुंगहि लिंबू, कौलाहि लिंबू, आणि लिंबूहि लिंबूच. पण एकाचा मेळ दुसऱ्याला नाहीं. साखर गोडच; आंबाहि गोड, अंजीरहि गोड, सिताफळहि गोड, द्राक्षहि गोड आणि खारीकहि गोड, पण याची गोडी त्याला नाहीं आणि गोड तर सारींच आहेत ! हें ‘ कांहीं तरी केलें आणि कसें तरी झालें ’ अशांतलें खास नव्हे. हे भेद कर्त्यानें जाणूनबुजून व हेतुपुरःसरच केले असले पाहिजेत. आणि हे हेतु कळणें मौजेचें नव्हे काय ? आहेच आहे. शिवाय, या नादानें या रमणीय वस्तूंचा परिचय झाल्यास, ज्ञानाखेरीज अन्य बहुत फायदे आहेत. नुसत्या पु-

ष्पांचेंच सौंदर्य म्हटलें तरी तें आपल्या दृष्टी-ला व मनाला एक पौष्टिक औषधच आहे.

नित्यांतल्या गोष्टी, पण त्या लक्षांत धरणारे थोडे. अष्टभुजा देवी अनेकांनीं अनेकदां पहिली असेल. परंतु तिचे हातांतील आयुधांचा क्रम कसा म्हणून विचारितां, सांगेलसा शंभरांत एकादा. रस्किननें खारीचें वर्णन दिलें आहे तें वाचलें म्हणजे मग आपले डोळे उघडतात आणि वाटतें कीं, हा लिहितो हें सर्व खरें आहे पण आपण लक्षांत घेतलें नव्हतें. रस्किन म्हणतो, "या खारीसारखा सुबक, आनंदी आणि गमतीचा दुसरा प्राणीच नसेल. अति हूड असून अत्यंत निरुपद्रव. खाण्यापिण्यांतहि कोणा जीवाची प्राणहानि नाहीं. मांजराचे पिलासारखी खेळकर, परंतु निर्दय नाहीं; शाखामृगाहूनाहि (वानराहूनहि) अधिक चलाख, पांखरापेक्षां मनोहर आणि तजेलदार, आणि वनदेवतेचें आवडतें खेळणेंच असली ही लुकलुक डोळ्यांची गोजिरवाणी मूर्ति एका वृक्षशाखेवरून दुसरीवर जाते, तेव्हां विजेची चपळाई कमी असा भास होतो. तिच्या गति तरी किती विचित्र! क्षणांत टुणकन् उडी मारील, क्षणांत तिरासारखी धांवत जाईल, क्षणांत मध्येंच मुरडेल. त्याचा कांहीं नेमच नाहीं. सारी लहर आहे! हरिणाहून चपळ, वाघाहून

अधिक टिपण झोंकणार. देहांत सरळपणा पहाल तर मुळींच नाही, पण जिनगरी बाहुलीपेक्षां अधिक मोहक आणि सावरीचे कापुसापेक्षांहि गुलगुलीत. अंगीं ऐट किती, मुरड किती, नखरा किती. आणि वात्रटपणा तरी किती. पळांत तुमचे मागें धांवेल, पळांत दृष्टिआड लपेल, पळांत वर डुकलि उचलून तुह्माला हेरील. क्षणांत प्रियसखीप्रमाणें हळूच कान देऊन चोरून ऐकत बसेल. कोण खेळाडू, कोण धूर्त, कोण दिमाखदार, किती रंगाढंगांची! छे, छे, मला वाटतें स्वर्गींची अप्सराच हें मुरकेदार, छोटें, छबेलें रूप घेऊन बाळगोपाळांच्या मौजेकरितां भूलोकीं अवतीर्ण झाली आहे".

विषमूर्ति भुजंगाचेंहि याच कुशल लेखकानें असेंच मौजदार चित्र रेखाटलें आहे. रस्किन म्हणतोः—"ओहो! तो पहा, वितळलेल्या रुप्याचा छोटासा ओघळ जमिनीवरून चालला आहे. चालला आहे कशाचा?—वाहतो आहे. कारण, त्या चालण्यांत यत्न किंवा कष्ट कसे ते नाहींत. गति किती गमतीची? चपळ असून शांत. पाण्याची लाट कीं वाऱ्याची झुळूक! पुनः लाट म्हणावी तर गर्जत नाहीं, ओघ म्हणावा तर धबधबा नाहीं. सर्व शरीर एका वेळीं गतींत असूनहि कांहीं भाग या कलावर झुकलेला, कांहीं उलट

कलावर, निमें सरळ पुढल्या झोकावर व निमें मागें मुरडलेला. तथापि कोणत्याहि भागाला फाजील संकोच नाहीं, फाजील ताण नाहीं. सर्व शरीर सारखें एक तोलांत चाललेलें. गोंगाट नाहीं, बोभाट नाहीं. टिकल्यांच्या चंद्रहाराचा सर घसरतो आहे कीं सुबक बुंदक्यांचा गळपट्टा पडला आहे, कांहीं ओळखत नाहीं. रेशमाहून मृदु, कदलीगर्भाहून शीतळ, पुष्पहाराहून सुखतर-स्पर्श. पण या सौम्यपणाला फसूं नका. दाढेंत जिवंत मृत्यु उभा आहे. थोडे वाटेस जा, म्हणजे समजेल चंद्रहार कीं कट्यार, आणि गळपट्टा कीं गळा उतरणारा पट्टा आहे तो ! रुपेरी पाण्याचा ओघळ आतां नव्हे. आतां झाली विषाची लाट. गवताचे गर्दीतून हा विषारी बाण सणाणतो आहे. क्रोधानें इतका दुमडला आहे कीं श्वास घ्यायला फुरसुद नाहीं. नुसता फणकारा चालला आहे. आतां त्याला शीत नाहीं, उष्ण नाहीं. पुष्पाचें मृदुत्व जाऊन पाषाणाचें कठोरपण उभें राहिलें आहे. अखिल ब्रह्मांडांतील क्रूरता, दुष्टपणा, हिंस्रता एकवटून तुमचे पुढें स्वारी खडी आहे. तिचे आटोक्यांत या, कीं स्वर्गद्वाराचीच भेट ! बरें, देहांत वळवळ तरी किती ! वानरापेक्षां वृक्षारोहणांत तलख, माशापेक्षां जलतरणांत सराईत, रोहींपेक्षां टिपण टाकण्यांत तरबेज, जेठींपेक्षां

पिळदार आणि वाघोबांनाहि पाणी पाजण्याला समर्थ; असलें हें प्रकरण आहे. अशाला माझा दुरून नमस्कार असो".

वरील वर्णनांतील प्रत्येक शब्द खरा आहे, असें आपणांस वाटतें; परंतु, हें रस्किननें पुढें मांडिल्यावर ! म्हणूनच मार्मिकाला या सृष्टींत पदोपदीं मौजा आहेत; मूढांना कांहीं नाहीं. लुई कार्नेरो म्हणून एक गृहस्थ शंभरांहून अधिक वर्षें वांचला. त्यानें आपल्या वयाच्या एक्याण्णवावे वर्षीं एक ग्रंथ लिहिला. त्यांत तो म्हणतो कीं, "सृष्टि सुंदर आहे, हें आतां माझे ध्यानांत येत चाललें आहे". ग्रीक लोक इतके कलाकुशल व शिल्पपटु होते तथापि सृष्टिसौंदर्याचे बाबतींत ते बहुतेक मूढच होते, म्हटलें तरी शोभेल. मोक्षमुल्लरप्रभृति ग्रंथकार म्हणतात, आर्यांच्या ऋग्वेदादि पुराण ग्रंथांत नुसत्या उषेचें जें अलंकृतिपूर्ण व मार्मिक वर्णन दिलें आहे त्या तोडीचें वर्णन इतर कोणत्याहि राष्ट्राच्या पुरातन ग्रंथांत आढळत नाहीं. या उषेचे वर्णनांतून किती तरी बहारीच्या कथा निर्माण झाल्या आहेत. सूर्यास्तसमयींचा देखावाहि असाच दिव्य व अनिर्वाच्य आहे. पण, दृष्टि असेल त्याला. कित्येकांना वाटेल कीं दृष्टि ती काय ? आह्मीहि पहातों. आह्मांलाहि डोळे आहेत. पण, डोळे

वेगळे आणि दृष्टि वेगळी. ती थोड्यांनाच असते. लबक म्हणतो, ही दृष्टि जर असेल, तर त्या पुरुषाला या जगतांत दुःख विरळच भेटेल. असला पुरुष निर्मळ आकाशाचे नीलवर्णाकडे किंवा तद्गत तारकापुंजाकडे, किंवा तरंगमाली सागराकडे, अथवा जलाशयाकडे किंवा एकादे अद्रिशृंगाकडे क्षणभर दृष्टि करील, तर सर्व सांसारिक दुःखाची त्याला तत्काल विस्मृतीच पडेल. इतका या वस्तूंत प्रभाव आहे. स्वच्छ व निरभ्र दिवशीं, शांत वेळीं खुल्या मैदानांत किंवा उपवनांत बसलें असतांहि ज्या चिंतेला विराम पडणार नाही, ती अत्यंत घोरच म्हणावयाची. अशी चिंता आयुष्यांत विरळाच असणार. कांहीं गूढ किंवा अद्भुत गोष्टींना ' अलौकिक ' किंवा अतिसृष्ट ( Super-natural ) असें कांहीं लोक म्हणतात; पण लबक म्हणतो, सृष्टीचा जर अंतपार कळलेला नाहीं, तर अमुक गोष्ट तिचे पलीकडची किंवा बाहेरची या म्हणण्यांत काय अर्थ आहे ? गूढ म्हणा, अज्ञात म्हणा, अज्ञेय म्हणा; पण अतिसृष्ट म्हणूं नका.

सृष्टि ही रूपानें अत्यंत दिव्य आहे, तरी ती कुलस्त्रीप्रमाणें साधीभोळी व मनाची निर्मळ आहे. पुष्कळ लोक अपरिचिताशीं बहुधा मोजकेंच बोलतात; पण चिरपरिचिताशीं मन मोकळें करून

सर्व गुह्य प्रकाशित करितात; हीच रीति या सृष्टिदेवीची आहे. आमच्या ऋषिवर्गांशीं हिची फारच सलगी असल्यानें तिचें अंतरंग त्यांना खुलें झालें होतें. या काळांतहि ती श्रद्धावंताचे कानांत आपलें गुज बोलते. गुरुत्वाकर्षणाचा नियम शोधून काढणारे न्यूटनला तिनें हालवून जागा करून विचारिलें कीं, " बेटा, तूं शहाणा खरा. पण हे जड परमाणू एकमेकांना ओढतात, हें तुझें म्हणणें गोड दिसतें का ? याचा नीट विचार केलास काय ? " त्याबरोबर न्यूटननें खालीं मान घालून चुकी पदरांत घेतली व सांगितलें " आतां खरा उजेड पडला. जड हा केवळ दृग्भ्रम असून, प्रत्येक जड परमाणूंत चैतन्य अंतर्हित आहे—नव्हे तो आनखाग्र चैतन्याचेंच विशिष्ट रूप आहे. हें रहस्य तुझ्या कृपाप्रसादानें मला पूर्ण कळलें ". नुकतें अलीकडे हेंच सत्य तिनें जगदीशचंद्र बोस या आपल्या लाडक्या भक्ताचे मुखानें लॉर्ड केल्व्हिन सारख्या निष्णात शास्त्रज्ञांचे पदरीं घातलें. सारांश, निःसीम भक्तांना याप्रमाणें ती पुष्कळदां स्वरूपबोध देते. आपले परिणतप्रज्ञ गुरुवर्य डॉ० भांडारकर म्हणतातः—

" ह्या विश्वांतील वृक्ष, पाषाण, पर्वत, नदी, विस्तीर्ण क्षेत्र, महासागर, आकाशमंडल, चंद्र, सूर्य, आणि असंख्य तारे ह्यांचा हा सर्व पसारा

पाहून प्रत्येक पदार्थाच्या स्वरूपाचेंच मात्र ज्ञान आपणास होऊन राहतें. आपली बुद्धि इतकेंच ज्ञान होऊन क्षीण होते; पुढें तिची गति कुंठित होते, असें नाहीं. हे सर्व पदार्थ पाहून अंतःकरणामध्यें विस्मय उत्पन्न होतो; पूज्यबुद्धि उदित होते. परंतु, ते पदार्थ जड आहेत; आणि आह्मीं मनुष्य चेतन आहों. चेतनापेक्षां जडपदार्थ हलका, कमी प्रतीचा. त्याजविषयीं विस्मय व पूज्यबुद्धि आपल्या अंतःकरणांत उत्पन्न व्हावयाची नाहीं. पूज्यबुद्धि आणि विस्मय ह्यांचा विषय चेतन वस्तुच असला पाहिजे. तेव्हां पूज्यबुद्धि आणि विस्मय मनुष्याच्या अंतःकरणांत जर उत्पन्न होतात, तर अवश्यमेव विश्व पहातांच ही चेतन आत्म्याची कृति, असा प्रत्यय साहजीक रीतीनें मनामध्यें उदित झाला पाहिजे; आणि तो उदित होऊन, मग त्या आत्म्याविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न होते, असें असलेंच पाहिजे. आणि अशा चेतन परमात्म्याचीं पुष्कळ चिन्हें आपला आत्मा या विश्वामध्यें ओळखून काढितो. यद्यपि पर्वत, दरी, नदी, महासागर, वृक्ष, पाषाण, चंद्र, सूर्य हे अचेतन आहेत, तथापि, त्यांच्याठायीं जो व्यापार घडत आहे तो एकाच धोरणानें चालला आहे; हें व्यवस्थित आहे आणि त्याजमध्यें घोंटाळा कांहीं नाहीं; हें एक चैतन्याचें चिन्ह. आणि हे

व्यापार चालून नेहमीं त्या वस्तूंची स्थिति पालटत आहे आणि अशा क्रमानें कालांतरेंकरून पृथ्वीची आणि सर्व विश्वाची अवस्था विलक्षण होऊन जाते. याप्रमाणें सर्वांचें रूपान्तर होतें. परंतु, रूपान्तरें घडवून आणण्याकरितां एकसारखा सतत हे व्यापार चालविणारा जो तो एकरूप, तो निश्चल, तो शाश्वत, तो अव्यय, तो अनादि आणि अनंत असाहि प्रत्यय अंतःकरणांत सहज उत्पन्न होतो. तसेंच, हा अपार अवकाश पाहून त्यास जशी सीमा कल्पितां येत नाहीं, त्याचप्रमाणें त्याचें सामर्थ्य जें सूर्य, चंद्र आणि तारे एथपर्यंत पोहोंचतें, त्याजला सीमा कल्पितां येत नाहीं; यास्तव तो देशतः अनादि आणि अनंत आहे. हें विश्व सुंदर, यांतील निरनिराळे पदार्थ अशाप्रमाणें योजिले आहेत कीं, ते सर्व मिळून एक सुंदर देखावा होतो. कोणत्याहि चित्रामध्यें कांहीं एक सौंदर्य आणणें झालें, म्हणजे त्या सौंदर्याची कल्पना प्रथमतः मनामध्यें आणली पाहिजे आणि त्या कल्पनेस बाह्यरूप देण्याकरितां निरनिराळे अवयव व तऱ्हेतऱ्हेचे रंग योग्य रीतीनें योजिले पाहिजेत. अशाप्रमाणें मनांत जर प्रथमतः एक कल्पना आणली नाहीं, आणि त्या चित्राचे अवयव व रंग, एकंदरींत त्याचा होणारा जो देखावा त्याकडे लक्ष न देतां क-

लिपले, तर अंतीं तो सर्व मिळून एक सुंदर वस्तु होणार नाहीं. त्याचप्रमाणें विश्वामध्यें सौंदर्य जर आहे, तर त्या सौंदर्याविषयीं कोणाला तरी प्रथमतः कल्पना असली पाहिजे, आणि त्या कल्पनेस बाह्यरूप प्राप्त व्हावें म्हणून निरनिराळ्या पदार्थांची योग्य रचना त्यानें केली असें असलें पाहिजे. असा प्रकार नसता, जर अचेतन शक्तीच्याच व्यापारानें हें विश्व निर्माण झालें असतें, तर सर्व पदार्थांची परस्परांच्यासंबंधानें अशी योजना झालीच नसती कीं त्या सर्वांपासून एकंदरींत विलक्षण सौंदर्य आणि शोभा उत्पन्न व्हावी. आणि कोणत्याहि पदार्थाच्या ठायीं शोभा आणि सौंदर्य आहे असें जें आपणास वाटतें त्याचें कारण हें कीं, तो पदार्थ कांहीं तरी शुभ आध्यात्मिक धर्माचें सूचक अथवा प्रकाशन करितो. याप्रमाणें हें विश्व अगाध सामर्थ्य, अनंत शान्ति, अनंत प्रेम, विलक्षण गांभीर्य, परम आनंद, परम शुद्धि, असीम उन्नति, अनाद्यनन्तता, इत्यादि आध्यात्मिक धर्मांचा प्रकाश करितें. मनुष्याच्या मुखचर्येवर जसे त्याचे आध्यात्मिक धर्म प्रतिबिंबित होतात, त्याप्रमाणें विश्वावर विश्वात्म्याचे धर्म प्रतिबिंबित झाले आहेत. अशा रीतीनें जो विश्वाचें अवलोकन करितो, त्यास परमेश्वराचा साक्षात्कार होतो ".

( फटका )

असार जीवित केवळ माया रडगाणें हें गाउं नका ।
घेई झोंपा तो नर मेला, संशय ह्याचा धरूं नका ॥ ध्रु०
वस्तुस्थिति ही असार भासे, अंतरिं परि बहुसार असे ।
जाणुनियां हें निजकर्तव्यें मन लावुनिया करा कसें ॥
मेलों म्हणजे मिळविलि, झालें सार्थक, न धरा मनीं असें।
माती असती मातिंत मिळती आत्म्याला हें लागु नसे ॥
सुखदुःखाचे भोग भोगणें हा मुळिं जीवित-हेतु नसे ।
उद्यां आजच्या पेक्षां कांहीं पुढेंचि जाऊं करा असें ॥
(चाल) मुकीं विचारीं कोणिं हका ।
अशीं मेंढरें बनूं नका ।
गेल्या गोष्टी स्मरूं नका ।
गतकाळाचा शोक फुका ॥
पुढचा भासो कितिहि सुखाचा काळ भरंवसा धरूं नका ।
असार जीवित० ॥ १

जाते घडि ही अपुली साधा, काय कार्य तें अतां करा ।
चित्तामध्यें धैर्य धरा हरिवर ठेवा भाव पुरा ॥
थोर महात्मे होउनि गेले, चरित्र त्यांचें पहा जरा ।
आपण त्यांच्या समान व्हावें हाच सांपडे बोध खरा ॥
(चाल) उठा उठा, तर, निजूं नका ।
" होईल कैसें " म्हणूं नका ।
कशाहि विघ्ना भिऊं नका ।
दीर्घोद्योगा सोडुं नका ॥
धीर धरी तो गंभीर असें शिका शिकारे विसरुं नका ।
असार जीवित० ॥ २

—( लॉंगफेलो ) ह० ना० आपटे.

# प्रकरण १३

## सद्यःकाल

( श्लोक )

वर्तमानेन वर्तन्ते । नराः पण्डित बुद्धयः ॥
श्वः कार्यमद्य कुर्वीत । पूर्वाण्हे चापराह्लिकम् ॥ १

**--महाभारत**

( श्लोक )

न कश्चिदपि जानाति । किं कस्य श्वो भविष्यति ॥
अतः श्वः करणीयानि । कुर्यादद्यैव बुद्धिमान् ॥ १

**—सुभाषित**

**भावार्थः**—उद्यां कोणाचें काय होईल हें कोणासच कळत नाहीं. यासाठीं शहाण्यानें उद्यांचें कर्तव्य आजच करून घ्यावें.

( श्लोक )

ये एकदांचि उदया अनुकूल वेळा ।
ती साधिल्या करि अखंड समुन्नतीला ॥ Good
जो मंदबुद्धि परि ती दवडील वायां ।
आजन्म दुःखचि तया, शिणवूनि काया ॥ १

**—शेक्स्पिअर**

कालाचे तीन भागः—भूत, भविष्यत्, वर्तमान. किंवा अतीत, अनागत आणि सद्यःकाल. यांपैकीं जो भूत किंवा अतीत तो आपले हातून कायमचाच निसटला, पुनः हातीं लागणारच नाहीं. अनागत

किंवा भविष्यत् तो आला तर आपला; पण या क्षणिक जीवितांत तो येईलच असा नियम नाहीं. राहतां राहिला वर्तमान किंवा चालू काळ. तो मात्र आपले हातीं असतो. याकरितां शहाण्यानें काय करणें तें या चालू प्रवाहांत साधून घ्यावें. उद्यांवर विश्वसूं नये. कॅपिस म्हणतो:—

( श्लोक )

कार्य कराया, युद्धा जाया। किंवा स्वाभ्युन्नति कराया॥
सद्यःकालचि साधक जाणा। उद्या करूं हा व्यर्थ वहाणा॥१

आपण शतायु आहों, ही भावना घातक होय. शहाण्यानें चालू क्षण तेवढा आपला असें समजून त्याचें सार्थक सर्वात्मना करीत असावें; पुढल्यावर हवालूं नये. कारण, " दीर्घसूत्री विनश्यति " असा ज्ञात्यांचा अभिप्राय आहे. चालू क्षण साधून इष्ट तें मात्र नेटानें आरंभावें, म्हणजे तें सिद्धप्रायच समजावें. आणि तेंच का दिरंगाईवर टाकिलें म्हणजे तें रेंगाळलेंच; त्याचें कपाळच तें. मोठें मार्कण्डेयाचें आयुष्य झालें, तरी देखील त्याला अंत हा आहेच. यासाठीं या ओले मातीचा भरंवसा धरूं नये. साधेल तेवढें स्वहित साधीत असावें. कारण, " कोण दिवस येईल कैसा। नाहीं देहाचा भरंवसा॥ ". म्हणून " कांहीं धांवाधांव करी। जंववरि मृत्यु आहे दूरी॥ " हा उपदेश आवर्जून पाळावा.

आपलेकडे जसे साडेतीन शहाणे होऊन गेले, तसे ग्रीस देशांत पूर्वी सात शहाणे प्रसिद्ध होते. त्यांपैकी पिटॅकस नांवाचा एक होता. याचें नांव शहाण्यांचे यादींत पडण्यास मुख्य कारण हेंच कीं, तो मोठा कालनेमी होता. तो ज्याला त्याला "वेळ साधा, वेळ साधा" म्हणून उपदेश करी. शेक्स्पिअर म्हणतो, " ठिणगी आहे तों हातानें विझवितां येईल. पण, उपक्षेनें तीच एकदां भडकली म्हणजे मग विहीर कोरडी करूनहि विझण्याची शंकाच ". तसेंच, कार्य एकदां हाताबाहेर गेलें म्हणजे सुधारणें कठीण.

द्रव्यापेक्षांहि वेळेला तिळ तिळ जपणें अगत्याचें आहे. गेलेला पैसा प्रसंगानें पुनरपि मिळेल, परंतु वेळ मिळणें शक्यच नाहीं. तो अनावर्ती आहे; आणि म्हणूनच शास्त्रपुराणांतून सर्वत्र ज्ञात्यांनीं आयुष्याच्या क्षणिकत्वाचे मूर्खांचे कानांशीं डंके पिटले आहेत. बरें, मनुष्येंहि तोंडानें आयुष्य क्षणिक क्षणिक म्हणून घोकीत असतात; पण वागतांना मात्र अशीं निसूर वागतात कीं जसें कांहीं त्यांना कल्पाचें आयुष्य आहे. पढतमूर्खपणा तो आणखी कसा असतो ? सत्पुरुष कानीं कपाळीं ओरडतातः " घटका गेली, पळें गेलीं, तास वाजे झणाणा । आयुष्याचा क्षय होतो, राम कां रे म्हणाना ॥ ". हे शब्द कथाकीर्तनांत ऐकूं

आले म्हणजे तेवढे लोक माना डोलवितात, आणि घरीं आले कीं बेहोष चालतात. अशांकडे पाहून वामन पण्डित म्हणतात, “ कशी या लोकांला बहुत चढली मोहमदिरा ! ”

आमच्या पूर्वजांनीं भाषेंत जे शब्द घडले आहेत तेच इतके खुबीदार आहेत कीं त्यांचा जो सम्यक् अर्थ ध्यानांत घेईल त्याला निराळें बोधक व्याख्यानच नको. कालाचें लघुतम मान सुचविणारे आमच्या भाषेंत ‘ पळ, विपळ ’ हे शब्द आहेत. हे स्वतःच काळाचा पळपटेपणा क्षणक्षणीं दाखवीत नाहींत काय ? ‘ क्षण ’ हा शब्द देखील कालाचें क्षयशीलत्वच दाखवितो आहे. परंतु आह्मी डोळे असून आंधळे, कान असून बहिरे बनल्यावर, शब्दांनीं काय करावें ? बेकन म्हणतो, “ आयुष्य टींचभर आहे. आणि जगत् हा बुडबुडा आहे ”. एक कवि म्हणतोः—

( श्लोक )

पळ, पळ, पळ ऐसें काळ आयुष्य नेतो ।
जननि म्हणत माझा बाळ हा थोर होतो ॥
मरण जवळ येतें थोर होणें कशाचें ।
हरहर, किति वर्णूं मौर्ख्य हें मानवाचें ॥ १

पण हा प्रकार मूढांचा झाला. शहाणे लोक काळाचे ठकबाजीला भीक घालीत नाहींत. ते तो येतांच त्याचा कान धरून आपलें काम साधून

घेतात आणि मग तो पळाला तरी अर्थातच त्यांची कांहीं हानि करूं शकत नाहीं. असें सांगतात कीं वांईचे रास्त्यांना ' आपण आतां जाणार ' म्हणून राज्यलक्ष्मीनें स्वप्नांत दृष्टांत दिला. तो ऐकून विचक्षणांनीं त्यांना अशी सल्ला दिली कीं ' ठीक आहे. तिला धर्मानें बांधून टाकावी आणि म्हणावें आतां खुशाल जा '. रास्त्यानींहि त्याप्रमाणें कृष्णातीरचे विस्तीर्ण घाट व देवालयादि धर्मकृत्यें करून तिला बांधूनच टाकिली. याचप्रमाणें ज्ञाते काळालाहि ठकवितात. तुकाराम म्हणतात, "गांठी पडली ठकाठका. त्याचें वर्म जाणे तुका ॥"—तशांतलीच ही मौज आहे.

बिशप फुलर म्हणे:—" एकादा सद्वर्तनी मनुष्य अल्पवयांत मेला, तरी तो मी दीर्घायुच समजतों. कारण, नुसतें शंभर वर्षें जगण्यांत काय मतलब " ? श्रीमच्छंकराचार्य अवघे बत्तीस वर्षेंच जगले. पण त्यानीं जी कामगिरी केली ती दुसऱ्याच्या हातून बत्तीस पिढ्यांतहि झाली नाहीं. विष्णुशर्मा म्हणतो—

( श्लोक )

यज्जीव्यते क्षणमपि प्रथितं मनुष्यै ।
विज्ञान-विक्रम-यशोभिरभज्यमानं ॥
तन्नाम जीवितमिह प्रवदन्ति सन्तः ।
काकोऽपि जीवति चिराय बलिंच भुंक्ते ॥ १

भावार्थः—ज्ञान, पराक्रम, सयश यांच्या अर्जनांत घालविलेलें जीवित अल्पच कां होईना, सार्थ आहे. नाहीं तर कावळाहि उष्टीं चिवडीत हजार वर्षे जगतो ! काय चीज ?

मनुष्यें तरी तऱ्हेवाईक असतात. मृत्यु कोणासहि नको. अर्थात् आयुष्य त्यास महत्त्वाचें वाटतें. पण, वागणूक पहावी तों आयुष्य जणू त्यांना भारभूत झालें आहे; अशी असते. असो, ज्यांना आयुष्याची किंमत कळत असेल त्यांनीं तरी त्याला कृपणापेक्षां अधिक जपावें; आणि त्याचा व्यय करणें तोहि फार तजविजीनें करावा. पुढें काय करणें त्याचा आगाऊ बेत बसवून ठेवावा म्हणजे धांदल होऊन काम न बिघडतां सुयंत्रपणें होतें. आज जें करितां येणें शक्य आहे, तें तर उद्यांवर कधींच ढकलूं नये. थीब्स प्रांताचा गव्हर्नर अर्चिआस याला 'सावध रहा' म्हणून एक पत्र आलें होतें; परंतु त्यानें 'या पत्राचा विचार उद्यां' असें म्हणून तें एकीकडे ठेविलें, आणि तेवढ्या दीर्घाईमुळें तो प्राणास मुकला. न्यूकॅसलचा ड्यूक सकाळचा एक तास व्यर्थ दवडून मग सारा दिवस हळहळत बसला. याकरितां प्रत्येक क्रिया यथाकालच करावी; व ती सुरळीत व्हावी, म्हणून उदयीक काय काय कामें करणें त्याचा क्रम अदले रात्रीं जुळवून ठेवावा; म्हणजे वेळ फुकट जात नाहीं, आणि

त्रासहि होत नाहीं. मुंबईसारख्या शहरांत जेथें अल्पप्राप्तीचे कुटुंबांस नाकपुडीएवढे खोलींत संसार करावा लागतो, तेथें जे टापटिपीचे लोक असतात त्यांच्या खोल्या तेवढ्याच असून प्रशस्त वाटतात, आणि जे अव्यवस्थित असतात, त्यांच्या खोल्यांत बसायला देखील धड जागा सांपडत नाहीं. हाच भेद व्यवस्थित आणि अव्यवस्थित यांच्या कार्ययोजनेंत आढळतो. बेंजामिन कान्स्टंट म्हणे:—" काय करावें ? माझा वेळ किती तरी व्यर्थ जातो. कांहीं केल्या कामाचा मेळच बसत नाहीं ". आपल्यांत म्हणच आहे " आळशाला दुप्पट काम " तेंच खरें. जे टिपदार लोक आहेत ते गचाळांचे चौपट काम करून देखील अधिक रिकामे असतात. यांतील रहस्य म्हणजे व्यवस्थितपणा. पुढें काय करणें त्याचें धोरण आगाऊ बांधणारा कधीं फसत नाहीं; आणि वेळ येईल तेव्हां पाहूं म्हणणारा अवसानीं हुकतो. हितोपदेशांत म्हटलें आहे:—

( श्लोक )

अनागतविधाताच । प्रत्युत्पन्नमतिस्तथा ॥
द्वावेतौ सुखमेधेते । यद्भविष्यो विनश्यति ॥ १

**भावार्थः**—पूर्वीच तरतूद करणारा, किंवा तावडतोब काम बजावणारा हे दोघे सुख पावतात. होईल तसें होईल म्हणणारा नाश पावतो.

आयुष्य हें अत्यल्प आहे इतकेंच नव्हे; पण, आणखी तें अनिश्चितहि आहे. शंभराचे ऐवजीं पाउणशें पर्षें पत्करतीं, परंतु, तीं तरी ठरीव पाहिजे होतीं. तें कांहींच नाहीं. पुढल्या क्षणाचा भरंवसा नाहीं, मग मास–वर्षांचें तर बोलणेंच नको. तोंडांत घातलेला घांस पोटांत उतरण्यापूर्वीं, किंवा नुसत्या शिंकेबरोबर, धड्याखड्या माणसांचा प्राण गेल्याचीं शेंकडों उदाहरणें आहेत. म्हणून शहाण्यानें प्रत्येक क्षण हा शेवटचा समजून त्याचा अत्युत्तम व्यय करीत असावें. विष्णुशर्मा म्हणतोः—

( श्लोकार्ध )

गृहीतइव केशेषु । मृत्युना धर्ममाचरेत् ॥

**भावार्थः**—मृत्यूनें शेंडीला हात घातलासें समजून धर्मकृत्य नेटानें करीत जावें.

कधीं कधीं मनुष्याला अनेक कार्यें असलीं म्हणजे प्रथम कोणतें करावें हा प्रश्न पडतो. विद्यार्थ्यांना तर हमेष हा अनुभव आहे. अभ्यासांत सरस, नीरस अनेक विषय असतात, पैकीं प्रथम कोणता हातीं घ्यावा, हें त्यांना गूढ पडतें. अशा वेळीं जो नीरस असेल तोच पहिल्या तोंडीं घेणें बरें. ताज्या दमांत तो रेटून जातो, आणि मग थकल्यावर सरस असेल तो स्वभावसरसतेनेंच प्रिय होतो; मिळून सारें ठीक हो-

तात. हीच गोष्ट व्यवहारालाहि लागू आहे. अवघड कामें तारुण्यांतच करावीं. तीर्थाटन वगैरे वृद्धावस्थेवर ढकलण्याचा पुष्कळांचा परिपाठ आहे; परंतु, अंगांत रग आहे तोंच तें उरकलें पाहिजे. पण कांहींचा समज तारुण्याचा काळ म्हणजे फुलाच्या झेल्यासारखा, तो हळुवार सुखांत गेला पाहिजे; वार्धक्य म्हणजे मुदतीबाहेर गेलेल्या खतापैकींच, त्यांत कांहीं हातीं लागलें वाहवा न लागलें वाहवा, असा आहे. पण ही चूक आहे. तारुण्य हाच कष्टाचा काळ समजून मेहनतींत दवडिला पाहिजे. मात्र तारुण्यांत अनुभव कमी असल्यानें अविचार होतो, याकरितां अनुभवी वृद्धांच्या बुद्धीनें चालावें. म्हण आहे:—" वृद्धस्य वचनं ग्राह्यं । आपत्काले ह्युपस्थिते ॥ " संकटसमयीं बुड्ढ्याचें ऐकावें. याप्रमाणें वृद्धांचा अनुभव व तरुणांची उमेद या दोहींचा जोड जमला म्हणजे कसलेंहि अवघड काम उलथून टाकितां येतें. याकरितां तसें वागून, उमेदींत वाटेंतला खडागुंडा काढून वाट चोखळून ठेवावी आणि मग वृद्धपणीं सुखानें डोळे मिटून चालावें.

काल हा निर्दयहि आहे आणि दयार्द्रहि आहे. शेकडोंची त्यानेंच धुळधाण केली आहे, शेंकडोंना त्यानेंच सौख्यशिखरावर नेलें आहे.

जोबर्ट म्हणतो, " काल हा कोणाला गोंजारतो, कोणाला पोंखरतो, कोणाला चिरडतो, कोणाला वर ओढतो, कोणाला जोडतो, कोणाला वेगळें काढतो ". सारांश, तो जशास तसा असतो. कित्येकांचें पहावें तों पूर्ववय भरल्या घोसांत असतां उत्तरवय विपत्तींत पडतें. कित्येक पूर्वी कोरान्न मागणारे उत्तरकालीं स्वतः धर्मार्थ अन्नसत्रें घालण्याइतके समर्थ होतात. ज्यानें काळाचा जसा व्यय केला तसें तो फळ पावतो. उघडच आहेः—

( श्लोकार्ध )

लोके गुरुत्वं विपरीततां वा । स्वचेष्टितान्येव नरं नयंति ॥

—हितोपदेश

भावार्थः—स्वकृतीनेंच उच्च-नीचावस्था प्राप्त होत असते.

" आयुष्य क्षणिक आहे. जातो आहे क्षण तो आपला. पुढला कोणीं पाहिला आहे, करितां हाच साधून घ्या" इत्यादि जे सत्पुरुषांचे उपदेश आहेत, ते आयुष्याचें महत्त्व ओळखून जनांनीं त्यांतील प्रत्येक क्षणाचा सदुपयोग करावा, एवढ्याच मतलबाचे आहेत. परंतु कांहीं लोक कधीं-कधीं यां शब्दांचा भलताच भाव काढितात. ते म्हणतात, आज चैन करा, भोगून घ्या. आपल्या मागें बसेना सावकार कोकलत! आप मेला, जग डुबाला. आज तो कर्ज देतो आहे तों ' ऋणं

कृत्वा घृतं पिबेत्' हें चालूं द्या. पण, हें निव्वळ मूर्खत्व आहे. सदुक्तीचा हा विपरीतार्थ करणें आहे. 'पुढलें कोणी पाहिलें आहे' हें सांगणाऱ्या सज्जनांचा भाव कृतीचा परिणाम न पाहतां चालावें हा नव्हे. चालू क्षण पुन्हां येणार नाहीं, तथापि प्रत्येक क्षणाचा परिणाम चिरस्थायी होणार आहे; आणि म्हणूनच तो निरंतर सत्कार्यीं लावीत जा, या अर्थाचें हें त्यांचें सांगणें आहे.

सारांश, आयुष्य हें दुर्भिळ आहे हें अखंड ध्यानांत वागवून दूरदृष्टीनें व दृढनिश्चयानें चालावें; व जी गोष्ट करणें ती अशी करावी कीं, तिजबद्दल पस्तावण्याचा प्रसंग येणार नाहीं. युरोपांत पुष्कळ उल्लू तरुणलोक गुलाबी गालांना भुलून सट्दिशीं लग्नाचा सवदा करून जातात; पण, अल्पकाळांतच त्यांना असा अनुभव येतो कीं, तो गुलाब कृत्रिम होता, आणि कांटे मात्र कायम अंगचे आहेत. आणि मग ते हात चोळीत बसतात. लेखक म्हणतो, हा अविचाराचा प्रकार केवळ लग्नाचेच बाबतींत आहे असें नव्हे, अविवेक्यांच्या प्रत्येक कृतीचें हेंच कपाळ आहे. आयुष्य क्षणिक झालें म्हणून तें घाईघाईनें कसें तरी खर्चावें, असें नव्हे. प्रत्येक क्षण विचारपूर्वकच कामीं लाविला पाहिजे. कारण—

( श्लोक )

गुणवदगुणवद्वा कुर्वता कार्यमादौ ।
परिणतिरवधार्या यत्नतः पण्डितेन ॥
अतिरभसकृतानां कर्मणा मा विपत्ते ।
भवति हृदयदाही शल्यतुल्ये विपाकः ॥ १

—भर्तृहरि

भावार्थः—बरें, वाईट कांहीं करणें तरी पक्का पाहून करावें. भसकन् कांहीं तरी करून गेल्यास आजन्म हळहळत बसावें लागतें.

शहाणे शहाणे लोकांत देखील असें म्हणणारे आहेत कीं, पूर्वींचा काळ चांगला, चालू काळच खोटा. परंतु, हा निव्वळ भ्रम आहे. भारतांत जसें म्हटलें आहे कीं " राजा कालस्य कारणं " त्याचप्रमाणें प्रत्येक मनुष्य आपल्या पुरता राजा व आपल्या काळाचा कर्ता आहे आणि तोच आपला काळ बरा किंवा वाईट करूं शकतो. आज कलियुगहि आहे आणि सत्ययुगहि आहे. आपण ज्या भावनेचे असूं त्या भावनेचा काल होतो, हें समजून सर्वांनीं त्याला सत्ययुगाचें रूप देण्यास झटावें व त्याचें अमूल्यत्व आणि अनावर्तित्व हीं डोळ्यांपुढें सारखींच ठेवून वागावें.

(आर्याचरण)

किं वैदग्ध्यमशोकः ।

**—आचार्यकृत रत्नमाला**

**भावार्थः**—खरें चातुर्य कोणतें?–कोणत्याहि गोष्टीबद्दल शोक करीत न बसणें.

( आर्याचरण )

ज्ञानलव–दुर्विदग्धं ब्रह्मापि नरं न रंजयति ॥

**—भर्तृहरि**

**भावार्थः**—ज्याला पुरें वैदग्ध्य आलें नाहीं–जो केवळ चुटमुटल्या ज्ञानानें केवळ अर्धवट संस्कृत झाला आहे— असल्या अर्धवटाची समजूत प्रत्यक्ष ब्रह्मदेवाला देखील घालतां येणें मुष्किलीचें आहे.

# प्रकरण १४

## वैदग्ध्य

( आर्या )

कैसें वैदग्ध्य असे ? । कोठें बुद्धीस सांग आधार ॥
वैदग्ध्य ईशभक्ती । सद्बुद्धी जाणिजे सदाचार ॥ १

—जॉब

( श्लोकचरण )

या लोकद्वय-साधनी तनुभृतां सा चातुरी चातुरी ।

—सुभाषित

**भावार्थः**—जिचे योगानें मनुष्यांना उभय लोक साधितां येतील त्या चतुराईलाच खरी चातुरी म्हणतात.

आमचे एका स्नेह्याची आई म्हणे, " सर्वस्व द्यावें आणि शहापण घ्यावें ’. उत्तरेकडील सागास नामक एका ग्रंथांत लिहिलें आहे कीं, शहाणपणाच्या झऱ्याचें एक घोट पाणी पिण्यास मिळावें म्हणून वोटन यानें त्या झऱ्याचे मिमिर नामक रखवालदार राक्षसाला आपला एक डोळा काढून दिला. आजकाल शहाणपणाचा असला अवचट मोबदला आपणास द्यावा लागत नाहीं, हें सुदैव आहे. आपण सारेच जरी बृहस्पती किंवा शुक्राचार्य झालों नाहीं तरी अभ्यासानें आपणास आपली विवेकदृष्टि वाढवितां येईल, व ‘ पुढल्यास ठेंच, मागला शहाणा ’ या न्यायानें

दुसऱ्यांचे अनुभवानें शहाणें होतां येईल. सिसिरो म्हणतो कीं, वैदग्ध्य किंवा चातुर्य ऊर्फ शहाणपणा याची व्याख्या पुराण तत्त्वज्ञांनीं केली आहे ती अशी:–" दैवी व मानुषी गोष्टींचें, अथवा व्यवहार व परमार्थ यांचें जें सोपपत्तिक ज्ञान तेंच वैदग्ध्य अथवा चातुर्य म्हणावें. आणि हें ज्याचे ठिकाणीं नाहीं किंवा असल्या ज्ञानाविषयीं ज्याचे ठिकाणीं आदरबुद्धि नाहीं, तो आदरास पात्रच नाहीं; तो मनुष्यच नव्हे ".

पर्कास म्हणतो, " विवेक आणि स्फुटवाचा ह्या दोनच गोष्टी पशूहून निराळेपणाच्या मनुष्याजवळ निशाण्या आहेत. या दोहोंतहि वाचाशक्तीपेक्षां विवेकशक्ति हीच अधिक महत्त्वाची निशाणी आहे. हिच्यांत कमीपणा असेल तर मोठेच अनर्थ होतात. एकाद्याची नुसती वाचाशक्ति बळकट आहे, पण तिला जर विवेकशक्तीचें पाठबळ नसेल, तर तीमुळें अनेक संकटें उत्पन्न होतील. वक्ता सभेंत उभा राहिला असतां श्रोत्यांचें मनोगत काय असावें हें त्याला प्रथम विवेकानें ताडतां आलें पाहिजे आणि तदनुसार त्यानें आपलें वक्तृत्व केलें पाहिजे; नाहीं तर तो वायफळ वक्ता समजला जाऊन उपहासास मात्र पात्र होईल. जे आपणांस खरे राजकारणी म्हणवितात त्यांचे अंगीं बोलक्यापेक्षां मु-

क्यांचें इंगित ओळखण्याची चातुरी अधिक पाहिजे.

वक्तेमंडळींत, प्रत्येकाला असुक एक प्रसंगीं आपण बाजवीपेक्षां कांहीं तरी फाजील बोलून गेलों अशाबद्दल पस्ताव्याची पाळी आलीच असणार; परंतु, मितभाषणाबद्दल अनुतापाचा प्रसंग विरळाच. म्हण आहे " सबसे चूप भली " त्याप्रमाणें मौन हें तर बावन कशी सोनेंच आहे. पण, भाषणाला कधीं कधीं रुप्याची देखील उपमा देतां येत नाहीं. शहाण्यानें साधेल तों कान, डोळे उघडे ठेवावे आणि तोंड मात्र बंद ठेवावें. सेंट बर्नर्ड म्हणे, " भाषण करणारानें खालीं, वर, पुढें, मागें व सभोंवार पाहून म्हणजे सर्वांगीं विचार करून मग बोलावें ". फ्रेंच भाषेंत म्हण आहे कीं " विचाराची तूट तेथें भाषणाला ऊत " ही पुष्कळदा प्रत्ययास येते. पूर्ण विचारी बहुधा मितभाषीच असतो. कारण, अस्थानीं व अप्रासंगिक भाषण व्यर्थ जातें. श्रोता जर नादान असेल तर वक्त्याचे चातुर्याची माती होते. यासाठीं मूर्खांस उपदेश करीत बसूं नये. मूर्ख लोक शहाण्यांपासून जितका बोध घेतात, त्यापेक्षां शहाणे मात्र मूर्खांपासून अधिक बोध घेऊं शकतात.

दीर्घसूत्रता हा दोष खरा; पण जनहिताचे कायदेकानूसारख्या महत्त्वाच्या विषयांत पुष्कळदा त्वरेपेक्षां दीर्घताच बरी पडते. अशा कामीं

तडकाफडकी कायदे करून सोडणें अतिशय मूर्ख-पणाचें आहे. सृष्टीचा क्रम पाहिला तर सावकाशीचाच दिसतो. मॅडम डी. सेविनी म्हणे, "थोड्याशा घिमाईनें पुष्कळसा पस्तावा वांचतो". हें सांगणें मुत्सद्दीपणाचेंच खरें, पण तें अमलांत आणण्याचें मात्र सदाच साधत नाहीं. ब्रौनिंग म्हणे, "दुःख तर असह्य झालेलें असतें आणि निर्णय तर लवकर होत नाहीं". अशी कधीं कधीं पंचाईत पडते. एकादे वेळीं आकस्मिक अशी गळचेप येऊन बसते कीं बसल्या बैठकीस एक घाव दोन तुकडे करणेंच प्राप्त येतें. तसें न करावें तर सोय नाहीं; करावें तर कायमचा बिघाड होण्याचें भय असतें. अशा वेळीं त्वरित योग्य मार्ग निवडणें फारच चतुराईचें काम आहे. लॉर्ड मेलबूर्नचा नेहमींचा प्रश्न असे कीं "हें काम असेंच पडूं दिलें तर काय होईल". लबक म्हणतो, आमचे कायदेकारी मंडळीची निंमे कामगिरी मागें घाईघाईनें किंवा अविचारानें करून सोडलेले कायदे रद्द किंवा दुरुस्त करण्यांत असते ! ठिकाणीं कांहीं नसतां, पुऱ्या चौकशीवांचून कांहीं तरी गैर गोष्ट आहेसें गृहीत धरून लगेच तिचे परिहारार्थ कायदा खरडून हे बहाद्दर पार होतात, आणि मग फजीत पावतात. या करण्यांत काय हंशील ? घड्याळ केवळ जलद चा-

लण्यांत मातबरी नाहीं; तें सारखें आणि सुयंत्र चालण्यांत आहे. हाच न्याय कायदे करण्यास लागू समजावा.

कोणतीच गोष्ट घाईघाईनें करून जाण्यांत शहाणपण नसतें. आणि त्यांतले त्यांत एकादें गूढ काम आलें म्हणजे तर पडून रहावें हेंच बरें. रात्रीचे शांत समयीं झोंपीं जातांना आपले मनाला तो गूढ प्रश्न घालून ठेवावा, म्हणजे मन झोंपेंत आपल्या न कळत त्याचा विचार करून सकाळला समर्पक उत्तर तयार ठेवितें; आणि हें उत्तर बहुधा मोठें सयुक्तिकहि असतें व त्यास अनुसरून चाललें असतां सहसा पश्चात्तापाची पाळी येत नाहीं. प्राप्तकार्याबद्दल थोडा वेळ झोंपीं गेलेलें बरें; पण तें अविचारानें कसें तरी सारून मग अंथरुणावर तळमळत पडणें बरें नव्हे. ग्रेशन म्हणतो, " मनुष्याची स्मृति कधीं-कधीं असा दुष्टपणा करते कीं, ती त्याला ऐन अवसानीं आपणच फसविते आणि पुनः त्याला त्याचे हानीबद्दल वारंवार टोंचीत राहून तळतळविते ". स्वस्थ बसणें सोपें; परंतु, हातून एकदां भलतेंच होऊन गेल्यावर तें निस्तरणें फार कठीण. यासाठीं कोणतेंहि करणें तें सावकाश व विचारपूर्वक करीत जावें, म्हणजे आजन्म तळमळण्याची पाळी येत नाहीं.

एकादे कामांत मनुष्य चुकला असतां, 'आपणास स्मृतीनें फसविलें' म्हणून ओरडतो; पण आपणास ज्ञान नव्हतें हें कांहीं तो कबूल करीत नाहीं. कारण आपण ज्ञानहीन आहों, असें कोणासच वाटत नाहीं. असें जरी आहे तरी जगांत ज्ञान ही इतकी सवंग जिन्नस नाहीं; ती मोठी दुर्मिळ आहे. मोठमोठ्या राजांना द्रव्यराशी खर्चिल्यानें किंवा अधिकारसामर्थ्यानें प्राप्त होणारी ती नाहीं. ही ज्ञानाची गोष्ट; आणि शहाणपणा किंवा चतुराई ही तर ज्ञानाचेहि पलीकडील पायरी आहे. बाकी, ज्ञान ही अशी कांहीं मोहक वस्तु आहे कीं, एकदां तिची गोडी लागली कीं ती पुरेशीच होत नाहीं. ती अधिकाधिक असावीसेंच वाटतें. पितर दि ग्रेट राजा हा मोठा ज्ञानेच्छु होता. त्यानें असा निश्चय केला होता कीं, या आयुष्यांत जेवढ्या म्हणून गोष्टी पहातां येतील तेवढ्या पहावयाच्याच; ऐकूं येतील तेवढ्या ऐकावयाच्या आणि शिकण्यायोग्य असतील तितक्या शिकावयाच्याच. सारांश, मिळेल ज्ञान तितकें संगृहीत करावयाचें अशी त्याला ज्ञानाची अत्यंत आवड होती.

मार्टिनोचें असें म्हणणें आहे कीं, " आपण सर्वज्ञ झाल्यास आपणास ज्ञानाचें महत्त्वच वाटेनासें होईल ". पण हें म्हणणें चुकीचें आहे.

ज्ञानाचें कौतुक ज्ञानी जितकें करील तितकें अज्ञान्याचे हातून होणार नाहीं. गुणाचें मोल गुणज्ञच करूं शकतो. पंडितांपेक्षा अज्ञानी लोकांत भक्ति किंवा देवाविषयीं आदरबुद्धि दृढ असते असें जरी कधीं कधीं आढळून येतें तरी खुद्द भगवंतानीं भगवद्गीतेत चार प्रतींचे भक्तांतून ज्ञानी भक्ताचीच पायरी श्रेष्ठ गणिली आहे. अर्थात् सज्ज्ञानानें आदरबुद्धि कमी होते हें म्हणणें मृषा आहे. ज्ञान्याला या चमत्कृतीबद्दल विश्वाची जों जों अधिक माहिती होते तों तों त्याच्या कर्त्याविषयीं त्याची प्रेमबुद्धि अधिकाधिक ठसावत जाते. आणि ही गोष्ट अन्यत्र मार्टिनोनेंच कबूल केल्यासारखी आहे. कारण, एके स्थळीं, ज्या अनंताचे साम्राज्याचे आपण प्रजाजन आहों त्याचेकडे डोळे लावावयाचे सोडून आपण क्षुद्र मानवी कृतींचेंच कौतुक करण्यांत दंग असतों या करणीला मार्टिनो दोष देतो.

सालोमन हा ज्ञान व चातुर्य यांचें साहचर्य मानीत असे; व तो म्हणे, "ईश्वराविषयीं आदरभाव हाच ज्ञानाचा उगम होय; पण मूर्खांना चातुर्याचा, तसाच उपदेशाचाहि, कंटाळा असतो." अन्यस्थळीं तो म्हणतो, "चातुर्यदाता प्रभुच आहे आणि ज्ञान व बुद्धिशक्ति हीं त्याचेच कृपेनें मनुष्याला मिळतात." गीतेंतहि भगवान् म्हण-

तातः—" मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनंच"—या अर्जुना, प्राण्यांचे ठिकाणीं असलेली स्मरणशक्ति, ज्ञानशक्ति व तर्कशक्ति यांचा उगम मीच आहें. " सालोमन म्हणतो:—

( श्लोक )

चातुर्यें रचिली धरा विपुल ही त्या विश्वशिल्पाकरें ।
तैसें बुद्धिबळें अनंत उपरी आकाश हें निर्मिलें ॥
त्याच्या ज्ञानबळें अधोंतरिं नभीं मेघव्रजातें § स्थिति ।
तच्छब्देंच तुषार, वारि, करका †, पाथोर * हे वर्षति ॥ १

ज्ञान हें कच्चा माल पुरवितें; चातुर्य त्याचा योग्य विनियोग करितें. चातुर्यावांचून ज्ञान निरुपयोगी आहे. हिंदुस्थानांत कच्चा माल विपुल आहे, परंतु त्याचा सदुपयोग कसा करावा ही चातुरी आजकाल हिंदुस्थानांत नाहीं. यामुळें " झाड सत्यभामेचे घरीं आणि फुलें रुक्मिणीचे दारीं " असें झालें आहे. अर्थात् वैदग्ध्याची किंवा चातुर्याची पायरी ज्ञानाचे वरची आहे. ज्ञान म्हणजे एकादे विषयाची कच्ची माहिती, आणि चातुर्य म्हणजे त्या माहितीचा इष्टार्थसाधनाकडे विनियोग कसा करावा ही हिकमत. म्हणून ज्ञानाहून चातुर्य विशिष्ट. पण चातुर्याहूनहि सदाचरणाची महती विशिष्ट. कारण, अंगीं ज्ञान आहे, चातुर्यहि आहे; परंतु तदनुरूप आचरण

§ मेघसमुदायांस. † गारा. * मेघ.

नाहीं, तर काय फल ? श्रुतींत सांगितलें आहे कीं " आचारवान् पुरुषो वेद ।" म्हणजे ज्याचें ज्ञान आचरणांत उमटलें तोच खरा ज्ञानी. " यः क्रियावान् स पण्डितः " " क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे । " हीं सर्व वाक्यें हेंच सत्य सांगतात. सालोमननें चातुर्य व सदाचार यांची प्रशंसा पुढीलप्रमाणें केली आहे:—

( श्लोक )

सदाचार, चातुर्य हीं दोन रत्नें ।
जगीं धन्य जे मेळवीती प्रयत्नें ॥
उणें त्यांपुढें राज्य लोकत्रयाचें ।
मणी-हेम-रौप्यादि तेथें कशाचें ॥ १
दीर्घायुता, धनिकता, बहुमान्यताहि ।
चातुर्ययुक्त मनुजास अलभ्य नाहीं ॥
आनंद-शांति-सुख-सौहृद सर्वदाही ।
स्वर्वल्लरीकरगताच विदग्धता ही ॥ २

शहाणे दुसऱ्याला ठेंच लागलेली पाहतांच सावध होतात; मूर्ख स्वतःला ठेंच लागूनहि डोळे उघडीत नाहींत. सदुपदेशानें सुधारणें हा उत्तम पक्ष. हें खऱ्या शहाण्याचें लक्षण. ठोकर लागल्यानें सुधारणें हा मतिमंदांचा पक्ष. हा ठेंच खाऊनहि शहाणे न होणारांपेक्षां बरा. शहाणा नुसत्या शब्दाचे इशाऱ्यानें जागा होतो. मूर्खाला टोणपे घालावे लागतात. शब्दांनीं शहाणें होण्यापेक्षां ठेंच खाऊन शहाणें होणें अधिक क्लेशा-

वह असतें; पण मूर्खांना तेच आवडतें. ते दुसऱ्यानें सांगून ऐकावयाचे नाहींत. बरें, अनुभवापासून उपदेश घेण्यालाहि अक्कल लागतेच. एक फ्रेंच म्हण आहे कीं "पोळलेलें मांजर, थंड पाण्यालाहि भितें". किंवा आपल्यांत म्हण आहे कीं, "बालः पायसदग्धो दध्यपि फूत्कृत्य भुंक्ते। (दुधानें तोंड पोळलें म्हणजे पोर दहीं, ताक देखील फुंकून खातें)." त्याप्रमाणें अनुभवावरूनहि मूर्ख भलताच धडा घेतात.

पुष्कळांना 'मी शहाणा, मी व्यवहारचतुर' अशी घमेंड असते. त्यांना वाटतें कीं आजपर्यंत होऊन गेलेल्या नामांकित शहाण्यांचें सर्व सार आपणांत उतरलें आहे. आणि याची निशाणी काय? तर बड्याबड्या शहाण्यांचे कांहीं सिद्धांत त्यांना मुखपाठ असतात. पृथ्वी फिरते आहे हें यांना माहित असल्यामुळें हे झाले आर्यभट्ट! यांचे ठिकाणीं आचाराचा विधिनिषेध नाहीं, कीं हे झाले शुकाचार्य! सुखदुःख सारखेंच मानावें हें यांना समजतें, म्हणून हेच विदेहजनक! किंवा "यद्दृष्टं तन्नष्टं" हा सिद्धांत यांनीं ऐकला आहे; हे झाले शंकराचार्य! ॲडिसन अबोल असे, हेहि मुखस्तंभ बसतात, हे झाले ॲडिसन! पण, खरें शोधितां हा सर्व अहंमन्यतेचा प्रकार असतो. अशांचे ठिकाणीं खरें चातुर्य तथातथाच असतें.

आपणच आपल्याशीं पुष्कळदां असुक एक आपली समजूत बरोबर आहे असें मानितों. परंतु, ती कशी म्हणून प्रश्न केल्यास, हेन्री सिजविक नामक नैय्यायिकाला स्वप्नांत जी विचारसरणी ऐकूं आली तिचाच मासला आढळतो. सिजविकला ऐकूं आलें:—

" आह्मी असें मानितों, कारण इतर लोक असेंच मानितात. "

" किंवा-किंवा-किंवा पूर्ण विचाराअंतीं अस्मादिकांस असें वाटतें म्हणून. "

" किंवा आह्माला कोणीं असें सांगितलें म्हणून आणि आह्माला असेंच मानावेंसें वाटतें म्हणून."

" किंवा पूर्वीं एकदां आमचें असें मत असून, अजूनहि तसेंच आहे म्हणून. "

" किंवा पूर्वीं असा समज असून, इतउत्तर तसा ठेवण्यास हरकत नाहींसें वाटतें म्हणून ".

कां ? किती कडीबंद, किती आटोकाट, किती शास्त्रबद्ध विचारसरणी ही! पण पुष्कळांचे सिद्धांत असल्या गचाळ पद्धतीनेंच ठरविलेले असून त्यांना ते बिनचूक वाटतात; व आपण ज्ञाते, चतुर, सिद्धांती आहों, असा त्यांस गर्व वाटतो!

मोठमोठ्या विद्वानांचें एकाद्या विषयांत एवढ्या तेवढ्या कारणानें, किंवा एकदेशी विचारानें एकादें मत झालें असतां तें सिद्धांताच्या दार्ढ्यानें ते जगापुढें मांडतात. पण सिद्धांत ठरविण्याला

जो सर्वांगी पूर्ण विचार तो खरोखर त्यांनीं केलेला नसतो. मोक्षमुलर म्हणे:—"आक्सफोर्डच्या विद्यालयांना जर कायमची सुट्टी मिळेल तर मग आक्सफोर्ड नंदनवनाची बरोबरी करील. कारण, एकांत व गंभीर विचाराला तें सर्वथा योग्य व रम्य असें स्थळ होईल". हें मत मननांत गढलेल्या मोक्षमुल्लरभट्टांपुरतें ठीक आहे. पण, तो सामान्य सिद्धांत म्हणून ठोकून देणें, अंमळ साहसच. कामाचे दिवसांत शिक्षकवर्गाचीं माथीं पोरांशीं डोकेफोड करण्यानें त्रासून गेलेलीं असल्यामुळें त्यांना शांत विचारासाठीं मधून सुट्टीचे दिवस पाहिजेत हें खरें; पण, कायमची सुट्टी म्हणजे सगळेंच आटोपलें.

विचारासारखा शीण कशांत नाहीं. विचारांत मेंदू खर्ची पडतो, त्या मानानें पहातां शारीरिक श्रमानें कांहींच झीज लागत नाहीं. पोरें वाटेल तेवढे शारीरश्रम करितात; म्हणून काय? उलटीं वाढत जातात. पण, विचार मेंदू खातो. अंगमेहनत करणारा खाल्याप्याल्यानें तत्काळ ताजा होतो; विचारानें मेंदू शिणविणाराचा भागवटा त्वरित दूर होत नाहीं. शिवाय, विचाराची गति कुंठित झाली म्हणजे मनुष्याला खेद होतो. त्याला वाटतें आह्माला परमेश्वरानें या संशयावर्तांत कां टाकिलें आहे? आह्माला सृष्टीचें गूढ कां उकलं

नये ? आतां काय करावें? बाकी, हमालमंडळीला या खेदाचा गंधच नाहीं.

सृष्टिकर्त्यानें अनेक गोष्टी गूढ ठेविल्या आहेत हें पाहून मनुष्याला पुष्कळदां वाईट वाटतें; परंतु त्यानें खास समजावें कीं असें करण्यांत सृष्टि करणाराचा कांहीं तरी स्तुत्यच हेतु आहे. एकतर त्या आपणांस पूर्ण समजणेंच शक्य नसेल, किंवा समजूनहि त्यांचा आमचे हातून दुरुपयोग होण्याचें भय असेल, किंवा त्या पाहतांच आपण आश्चर्यानें दंग होऊन जागचेजागींच स्तब्ध बसूं अथवा दिपूनच जाऊं. या म्हणण्याचा प्रत्यय दूर नाहीं. आपल्या लाडक्या अर्जुनाला परमात्मानीं जेव्हां मनुष्यांना चर्मचक्षूंनीं कधींहि न दिसणारें, आपलें विश्वव्यापि विराट् स्वरूप दाखविलें, तेव्हां तें दृष्टीस पडतांच तो प्रथम 'विस्मयाविष्ट' व 'हृष्टरोमा' झाला; परंतु लौकरच त्या अद्भुतरूपानें दिपून जाऊन त्याची बोबडीहि वळली. आणि तोच अर्जुन आपण होऊन परमेश्वराला हात जोडून म्हणूं लागला, कीं:—

( श्लोक )

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा । भयेनच प्रव्यथितं मनो मे ॥
तदेव मे दर्शय देवरूपं । प्रसीद देवेश जगन्निवास ॥ १

—श्रीमद्भगवद्गीता

भावार्थः—तुझें हें अपूर्व रूप पाहतांच मला आनंद झाला खरा; पण त्याचें विशालत्वानें मला भेदरी बसून माझें

काळजानें ठाव सोडिला आहे. याकरितां, हे जगन्निवासा, मजवर कृपा कर आणि तुझें आपलें नित्याचें सौम्य-रूपच मजपुढें असूंदे. हें रूप मला आवडतें, परंतु सहन होत नाहीं.

पॅस्कल म्हणतो, " सर्व सत्य आपले कानीं एकदम पडल्यास आपलीं कानटाळीं बसून आपण बहिरे सुण्ण होऊन जाऊं. भरदुपारचा प्रकाश अतिभास्वर खरा, पण त्यांत दृष्टि मुळींच दिपून जाते; त्यापेक्षां शांत व मंद प्रकाशांत दृष्टीचा प्रसर दूरवर होतो ".

ज्ञानाचे प्रगतीचा इतिहास पहातां, आस्ते-आस्ते मनुष्याचे दृष्टीला सृष्टिरहस्यें अधिकाधिक कळत आहेत. कालच्या या एकोणिसाव्या शतकांतच किती तरी नवीन शोध लागले व सृष्ट शक्तींचे अद्भुत खेळ दृग्गोचर होऊं लागले. बाकी, ईश्वराचें विश्व हा अनंतगूढांचा महोदधि आहे. त्याचे मानानें पहातां, " सिंधूंतील एकादा बिंदु, किंवा खंडीमध्यें पाव रति" देखील मनुष्याचे हातीं अजून लागला नाहीं. विश्वरूपिणी सृष्टिदेवी शास्त्रीय ज्ञानानें फुगून गेलेल्या मनुष्यास अजूनहि हंसून म्हणेल कीं, बाळ, इतक्यांतच धन्य मानूं नको. तूं नुसता अंगठाच चोखीत आहेस.

सृष्टीचीं गूढें आपल्याला समजावीं अशी इ-

च्छा पुष्कळांना असेल. परंतु, तीं उकलून पाहण्याची खटपट म्हणाल तर कोटींतून एकाद-दुसऱ्याचे हातून देखील होण्याची मारामार. ही पोटाची खळी भरण्यासाठींच बहुतेकांना इतके श्रम करावे लागतात कीं त्यांना असल्या कामांत पडण्यास फुरसुदच होत नाहीं. ते उदरभरणानेंच व्याकुळ होऊन असल्या गूढ विचारांचें काम आनंदानें वेडेपीरांवर सोंपवितात. ते म्हणतात, " जाऊं द्या कीं, कोणीं व्यर्थ डोकें चोळीत बसावें ? त्यापेक्षां आपल्या पोटासाठीं कोणाच्याहि दोन पाट्या टाकाव्या आणि निघोर असावें. काढूं द्या त्यांना युक्त्या, आपण आयताच फायदा घेऊं "! आमचे हिंदुस्थानची तरी आजकाल सर्वथा हीच स्थिति आहे. बुद्धिमत्तेची किंवा कल्पकतेची वाण नाहीं; परंतु माध्याह्नकाळाची सोय लावण्यापुढें सगळें अटलें आहे.

सिसिरो म्हणतो, " डेमोक्रिटसला पांढऱ्याकाळ्यांतला भेद ओळखत नव्हता, इतका तो डोळ्यांनीं अंधळा होता. परंतु, त्याचे ज्ञानचक्षु इतके सतेज होते कीं चांगलें आणि वाईट, न्याय्य आणि अन्याय्य, सन्मान्य आणि द्वेष्य, उपयुक्त आणि त्याज्य, थोर आणि नीच यांमधील भेद त्याला फारच स्पष्टपणें दिसत असे ".

सर्वांचेच अंगीं तितकी चतुराई नसेल; परंतु

अमुक वर्तन रास्त आणि अमुक गैर हें ज्ञान स्वभावतःच प्रत्येक मनुष्याला असतें. आपल्या-पुढें शंभर चेहरे असले तरी त्यांतून जो अत्यंत सुंदर असेल त्यावर जशी नेमकीच दृष्टि जडते त्याचप्रमाणें रास्त गोष्ट कोणती हें आपणास अंतःप्रेरणेनेंच कळत असतें; आणि इतकें कळलें म्हणजे आपणास सुखी होण्याचा उपाय सांपडलाच. केवळ सुखी होण्याचाच नव्हे, पण ' नराचा नारायण ' होण्याचा देखील सांपडला म्हटलें तरी शोभेल. जगांत काय करावें किंवा कसें वागावें हें कळणें फारसें कठीण नाहीं; पण कळल्याप्रमाणें करणें किंवा वागणें ह्याचीच सारी मारामार आहे. नुसत्या कळण्यानें सिद्धि होत नाहीं. अमुक एक वनस्पति हिमालयावर आहे असें आपणास कळून भागत नाहीं. ती तेथून आणण्याचा किंवा आणविण्याचा यत्नच झाला पाहिजे, तेव्हांच त्या कळण्याचें सार्थक होईल. पण यत्न करणें तोंडच्या गोष्टी नव्हत. एक गृहस्थ मानससरोवरास जाऊन आले तें ऐकिलें म्हणजे ऐकणारासहि फुरफुरी येते; परंतु, त्यांचे मार्गांतील हाल-अपेष्टांचें वर्णन त्यांचे मुखांतून ऐकू आलें म्हणजे हौस जागचेजागींच जिरते. सेंट पाल म्हणतो, "सिद्धि फुकटची नाहीं. हातावर शीर घ्यावें त्यानें आत्मसिद्धीचे नादीं पडावें".

कोणतेहि गोष्टींत मर्यादितपणा राखणें हें तरी चातुर्याचेंच एक अंग आहे कारण, अतिरेकानें सद्गुणच दुर्गुण होतो. अतिदानप्रियत्वानेंच बलि पातालीं गेला. अति धाडस हें अविचाराचेंच भावंड समजावें. वाईटाचें फळ वाईट आणि चांगल्याचें चांगलें, हा नियम अभंग आहे. सत्कर्म हेंच बक्षीस व दुष्कर्म हीच शिक्षा समजावी. सदाचार आहे तेथें सौख्य आहे; दुराचारापाशीं दुःख उभें आहे. म्हणून मनुष्यानें बरें चालावें आणि निर्भय असावें. बऱ्याचा जय व्हावयाचाच. दुर्जनाशीं आपण बरेंच वागावें. धर्मराजा दुर्योधनाला देखील 'सुयोधन' म्हणे. एक अरब भक्त म्हणतो, "हे देवा, अभक्तांवर दया कर. कारण, भक्तकनवाळू तूं आहेसच आहेस".

टेनिसन म्हणतो, "मनुष्यास जर ईश्वर साक्षात् भेटला तर मनुष्याचें मन त्याचे प्रेमांत चूर राहील". परंतु लबक म्हणतो, हें म्हणणें ज्याला या दुष्ट जगाचें वारें पुरें झोंबलें नाहीं अशा बाळपणच्या कोंवळ्या मनासच लागू पडेल. जे का व्यसनाचे, दुर्गुणाचे, दुष्कर्माचे शाळेंत एकदां निर्ढवले, अशांना देव भेटो कीं महादेव भेटो, त्यांचा दुर्गणच त्यांना प्रिय वाटेल. कृष्णशिष्टाईचे वेळीं श्रीकृष्णानें दुर्योधनपक्षाला सर्वांसमक्ष आपला ऐश्वरयोग दाखविला, म्हणून काय? उ-

पड्या घड्यावरच पाणी. अमुक गोष्ट गैर आहे, एवढें समजण्यानें ती दूर होत नाहीं. तिचा तिटकारा आला पाहिजे; थरक भय वाटलें पाहिजे. पण तसें बहुधा होत नाहीं. कारण दुर्गुणाची गोष्ट अशी आहे कीं:—

( आर्या )

दुर्गुण भेसुर राक्षस दर्शनमात्रेंचि द्वेष्य भासतसे ॥
परि चिरपरिचय होतां, सह्य, प्रिय, श्लिष्ट मित्र वाटतसे १

—पोप

शेक्स्पिअर म्हणतो, देव तरी आपल्यावर कांहीं घेत नाहीं. दुर्जनांना त्यांच्या दुर्गुणाच्या द्वारेंच तो शासन करितो. दुर्गुणांनीं, दुर्व्यसनांनीं जगाचा नाश होत आहे. पण जगत् डोळे उघडीत नाहीं. **नोहा** हा एवढ्या जलप्रळयांतून शिलक राहिला, परंतु अखेर दारचे द्राक्षीचे रसापायीं ( दारूपायीं ) मेला. आणि या रसापायीं आजकाल हजारों मृत्युमुखीं पडत आहेत, तरी या रसावरचें प्रेम उडत नाहीं, ही तर व्यसनाची जबरदस्ती आहे.

दुर्गुणाइतकेंच कधीं कधीं मूर्खत्वहि घातक असतें. एक मूर्ख पोर हातचे दिव्यानें घर पेटलेलें पाहूनहि गुपचुप बसली आणि त्यामुळें अर्धगांवची होळी झाली. एकाद्या दुर्जनानें मुद्दाम आग लाविली असतां त्याचे दौर्जन्यापासून होणारी जी

नुकसानी तीच हिचे मूर्खत्वानें झाली; म्हणजे फलतः तरी दोहोंची किंमत एकच झाली.म्हणून समाजांत दुर्जनांइतकाच मूर्खांचाहि निषेध करणें प्राप्त आहे. देवानें स्वर्ग, व नरक या दोहोंचे मार्ग सारखेच खुले ठेविले आहेत; व सदाचारानें पहिला गांठल आणि दुराचारानें दुसरा, अशी प्रसिद्ध जाहिरात लावून, तिचेखालीं "येनेष्टं तेन गम्यताम्।" म्हणून लिहून ठेविलें आहे. यांत काय तें माणसानें समजावें.

जगांत कांहीं माणसें दुसऱ्याला दुःख व त्रास द्यावयाला निर्माण झालीं असतात; व कांहीं दुसऱ्यांचा त्रास सोसण्यासाठीं झालीं असतात. पराला दुःख देणारे हे एकंदरींत स्वतः दुःखी असून दुसऱ्यालाहि दुःखी करितात. परदुःख घेणारे सज्जन हे दुसऱ्याला सुखी करून स्वतःहि सुखांतच असतात. योगबलानें कांहीं लोक दुसऱ्याचा रोगभोग आपले अंगीं उतरून घेतात; पण तशानें दोघेहि बचतात. सज्जनांचा हाच मार्ग.

सालोमनला ईश्वर प्रसन्न होऊन 'माग' म्हणाला. तेव्हां त्यानें मला 'ज्ञान आणि चातुर्य' हीं दोन द्या म्हणून मागितलें. ईश्वरानें त्याला तीं दोन्ही देऊन त्यांचे जोडीला लोकमान्यता व राजवैभव हीं दिलीं. परंतु, या मिलाफाचा परिणाम असा झाला कीं, सत्ता आणि

संपत्ती यांचे मदापुढें ज्ञान व चातुर्य हीं लटकीं पडलीं. आणि सालोमनचे चातुर्याचे बोल जरी अमोल आहेत, तरी त्याचें चरित्र वाचलें म्हणजे " लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडा पाषाण " असेंच म्हणणें भाग येतें. कारण, सर्व सुखसाधनें, ज्ञान, चातुर्य हीं पूर्ण अनुकूल असतांहि त्यानें मरतां मरतां एकाद्या दुःखी माणसासारखे असमाधानाचे उद्गार काढिले, याहून अधिक खेदावह तें काय ? आतां किती झालें तरी तो मोठा सत्ताधिश व भलाच माणूस होता म्हणून तो ' मी हुकलों ' एवढेंच म्हणाला; ' सर्वांची हीच गति' असा अभिप्राय त्यानें दिला नाहीं.

सन्मार्ग कोणता हें प्रत्येकानें आपल्या आत्मारामाला पुसत जावें. तो कधीं फसावयाचा नाहीं व दुसऱ्याचें ऐकावयाचा नाहीं. चोराचा आत्माराम चोरी हें दुष्कृत्य आहे असेंच बेमुर्वत त्याला सांगतों, इतका तो स्पष्टवक्ता आहे. लबाड मनुष्य आपली जिव्हा, मुद्रा, मनोविकार सर्व बदलील, परंतु या हृदयस्थ आत्मारामावर त्याचा कांहीं अंमल चालत नाहीं. तो गैरकर्म करूं लागला कीं आत्माराम त्याला आंतून ठोठावणारच. याकरितां मनुष्यानें त्याचे आज्ञेंत चालावें, म्हणजे पाऊल गैरमार्गीं पडणार नाहीं.

संगच्छध्वं संवदध्वं संवो मनांसि जानताम्
देवा भागं यथापूर्वं संजानाना उपासते ।

—ऋग्वेद

भावार्थः—हे लोकहो, तुम्ही सर्वहि एकमेकांत मिळून मिसळून चाला, व भांडणतंटे सोडून देऊन मिळून मिसळून बोला व आपलीं मनें सुसंस्कृत करा आणि पूर्वीचे ज्ञानी पुरुष जसे ईश्वराची उपासना करीत आले तशीच तुम्हीहि करा.

समानो मंत्रः समितिः समानी समानं मनः सहचित्तमेषाम्।
समानं मन्यमभिमंत्रये वः समानेन वो हविषा जुहोमि ॥

—ऋग्वेद

भावार्थः–तुम्ही विषम विचार करूं नका, तुमची सामाजिक व्यवस्था समानतेचे तत्त्वावर चालवा. तुमचे संकल्पविकल्प व ध्येयें एकजात असूंद्या. (ईश्वर म्हणतो,) मी तुम्हां सर्वांस समतेनेंच उपदेश करितों व तुम्ही माझे उपदेशाप्रमाणें चालल्यास मी तुम्हांस सारखेंच फल देईन.

# प्रकरण १५

## राष्ट्रांची शांति

अपार संपत्ति किंवा उदंड शस्त्रसंभार यांनीं कोणतेंहि राष्ट्र निर्भय होत नाहीं; तर परराष्ट्रांशीं स्नेहभाव ठेविल्यानें होतें.

—सॅलस्ट

लबक म्हणतो, सांप्रतची युरोपीय राष्ट्रांची स्थिति आह्मां सर्वांसच भयप्रद व लज्जाकर आहे. रानटी लोकांनीं शस्त्रबळावर वादाचा निर्णय करणें एकवेळ शोभेल; पण असल्या सुधारलेल्या राष्ट्रांनीं तोच मार्ग स्वीकारावा हें नीतिदृष्ट्या व व्यवहारदृष्ट्याहि उद्वेगजनक आहे. आजकाल नुसती अंतःशांति राखण्याकडे युरोपीय राष्ट्रांत एकंदर ४०,००,००० शिपाई आहेत. आणि लढाऊ लोक ते याहून निराळेच. ते आहेत १,००,००,००० हून अधिकच. ही संख्याहि अजून वाढविणेंच आहे. तसें झालें म्हणजे तो आंकडा २,००,००,००० वर जाईल. या सैन्याचे खर्चाचे खरे आंकडे पुरापुर प्रसिद्ध नाहींतच. पण जे कांहीं अंशतः आहेत, त्यांची बेरीज केल्यास सालीना ४५,००,००,००० पौंड होते.

प्रत्येक राष्ट्राच्या हिशोबाच्या पद्धति वेग-

ळ्या व अर्धमोलीं, बिनमोलीं, किंवा पूर्ण मोलानें नोकरी घेण्याचेहि परिपाठ कमजास्त प्रमाणांत आहेत, यामुळें अचुक आंकडा मिळणें अशक्य आहे. तरी आजकाल, युरोपीय राष्ट्रं व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें यांचे गोडे व कडवे मिळून शिपाई लोकांची संख्या आणि त्यांच्या वार्षिक खर्चाचे आंकडे याप्रमाणें आहेत:—

| राष्ट्राचें नांव | शिपाई | वार्षिक खर्च पौंड |
|---|---|---|
| संयुक्त राष्ट्र ... | ४,२०,००० | ६,५०,००,००० |
| रशिया ... ... | ११,५०,००० | ४,६०,००,००० |
| जर्मनी .. ... | ६,६१,००० | ४,३८,००,००० |
| फ्रान्स ... ... | ६,२०,००० | ४,१०,००,००० |
| आस्ट्रिआ-हंगेरी | ३,८४,००० | १,९४,००,००० |
| इताली... ... | ३,०५,९०० | १,७०,००,००० |
| स्पेन ... ... | १,००,००० | ६७,००,००० |
| नार्वे आणि स्वीडन | ७३,००० | ५५,००,००० |
| टर्की ... ... | ३,७०,००० | ४८,००,००० |
| हालंड ... ... | ३५,००० | ३६,५०,००० |
| बेलजम... ... | ५०,००० | २५,००,००० |
| पोर्तुगाल ... | ३४,००० | २६,००,००० |
| स्वित्झर्लंड ... | १,४८,००० | १३,००,००० |
| ग्रीस ... ... | २३,००० | १२,००,००० |
| देनमार्क ... | १४,००० | १२,००,००० |
| बल्गेरिया ... | ४३,००० | १८,००,००० |
| संयुक्त संस्थानें (अमेरिका) | १,०७,००० | ४,००,००,००० |

एवढा जगड्वाळ द्रव्यव्यय होत आहे, इतके मानवी प्राण्यांचे जीव आणि श्रम फुकट खर्ची पडत आहेत, तरीहि आमची महत्त्वाकांक्षा मिटत नाहीं. अधिक आरमार पाहिजे, अधिक फौज पाहिजे, म्हणून ओरड सुरूच आहे! रयतेनें कष्टानें मिळविलेलें द्रव्य कररूपानें हिरावून घेऊन त्यावर हे एवढे पोळ पोसावयाचे हें कुठलें शहाणपण! शिवाय आबदाबामुळें राष्ट्रांत युद्ध नच झालें, तरी यांच्या खर्चानेंच अखेर प्रत्येक राष्ट्राची कंबर मोडून जाऊन दिवाळेंहि वाजणारच. युरोपांतील प्रत्येक प्रमुख राष्ट्र आलें तें वर्ष अधिकाधिक कर्जांत बुडत आहे. सन १८७० सालीं या राष्ट्रांचे कर्जाचा आंकडा ४,००,००,००,००० पौंड होता. हा तेव्हांच छाती दडपेसा होता. आणि हल्लीं तर याचे दीडपट झाला असून सालोसाल फुगतच आहे.

आह्मां शहाणे राष्ट्रांची सुधारलेपणाची कल्पनाहि किती अश्लाघ्य आहे पहा! एक जपानी मुत्सद्दी म्हणाला, " आह्मीं जोंपर्यंत युरोपांत केवळ आमचे कळाकुसरीचींच कामें पाठवीत असूं तोंपर्यंत युरोपचे लोक आह्मांस अर्ध-रानटी म्हणत. पण आह्मीं जेव्हां रशियाचे हजारों शिपाई यमसदनीं पाठविले, तेव्हां मात्र ' आतां जपान खरें सुधारलें ' म्हणून आ-

ह्यांस शाबासकी मिळूं लागली. आहे कीं नाहीं न्याय?" यंग नामक कवि म्हणतो, "एका मनुष्याचा प्राण घेणारास खुनी म्हणून गळफांस देतात व हजारोंचे बळी घेणारास शूर वीर म्हणून त्याला पुष्पहार घालितात; म्हणजे उत्कट दुष्कृत्याला सत्कृत्याची पदवी मिळते, असला हा जगताचा न्याय आहे".

लढाई म्हटली म्हणजे पुष्कळांचे डोळ्यांपुढें, तो फौजेचा थाटमाट, स्फूर्तिजनक रणवाद्यांचा गजर, शिपायांचे एकजात भडक पोषाख, व समशेरांचा डोळे दिपविणारा चमचमाट हीं उभीं रहातात; पण नुसत्या स्मरणानेंच अंगावर रोमांच आणणारा तो रक्तपात, व प्राणिवध याची त्यांना कल्पनाहि येत नाहीं. परंतु, परवांच्या रूसोजपान युद्धाची किंवा कोणत्याहि युद्धाची हकीकत वाचली म्हणजे वाचणाराचें हृदय भीति आणि करुणा यांनीं व्याप्त होऊन जातें. दुसरी गोष्टः हानि, विपत्ति, क्लेश यांचे दृष्टीनें युद्ध हें उभयपक्षांस सारखेंच अनर्थावह असतें; फक्त विजयी पक्षाला वर मिशा करून चालायला येतें, हाच काय तो फायदा. श्रीकृष्णास युधिष्ठिर म्हणतो:—

( श्लोक )

पराजयश्च मरणान्मन्ये नैव विशिष्यते ॥
यस्य स्याद्विजयः कृष्ण । तस्याप्यपचयो ध्रुवम् ॥१

जयो वैरं प्रसृजति । दुःखमास्ते पराजितः ॥
सुखं प्रशान्तः स्वपिति । हित्वा जयपराजयौ ॥२

**भावार्थः**–पराजय तर मरणतुल्यच. पण विजयांत देखील हानि पुष्कळच होते. शिवाय, जय मिळाल्यानें वैर वाढतें व पराभूत पक्ष दुःख करीत राहतो. पण शांतीला ह्यांतील कांहींच नाहीं. तिथें सुखाची झोंप मिळते.

कांहींचें म्हणणें कीं हें सर्व खरें, पण स्वहितरक्षणार्थ हें सारें आह्मांस पत्करावें लागतें. परंतु या म्हणणारांना हें समजलें पाहिजे कीं, कोणत्याहि राष्ट्राचें खरें हित अंतःशांतता व परराष्ट्रांशीं स्नेहभाव यांत आहे; युद्धांत नाहीं. ग्रिहकार कझिन म्हणतो कीं, "रणभूमि व मुत्सद्याची खोली हे सुधारणेचे दोनच आश्रय आहेत". पण याला हें कळत नाहीं कीं, युद्धाच्या नुसत्या वार्तेनें देखील शांतिसुखाचा भंग होऊन सुविचारांचा बिघाड होतो. शिलर म्हणतो, " शत्रु आज पादाक्रांत केला तरी आपला डूक सोडीत नाहीं, वेळ पाहून पुनः उलटतो; त्यापेक्षां त्याला स्नेहानें आपलासा केल्यास भय कायमचें गेलें ". **जोबर्ट**चें म्हणणें कीं, " 'हापापाचा माल गपापा गेला ' असाच मासला युद्धांत मिळविलेल्या द्रव्यादिकांचा होतो ". इतिहास हीच साक्ष देतो. अखिल जगताला त्राहि त्राहि करवून उंटोगणती खजिने भरणारे जे राजे तेहि पालथे पडले आणि ते खजिनेहि रिते पडले; पण दुनियेला क्लेश मात्र

कायमचे झाले. बरें, नित्यक्रमांत मनुष्याला इतकीं दुःखें व संकटें आहेत कीं तींच निवारतांना तो व्याकूळ होतो. असें असतां मनुष्यें युद्धरूपानें मुद्दाम आपणांवर नसतीं संकटें ओढवून घेतात, या प्रकाराला काय म्हणावें? जोबर्ट म्हणतो, पुष्कळ राष्ट्रांना संकटांवांचून चैनच पडत नाहींसें दिसतें; कारण, एरव्हीं तीं हीं युद्धरूप संकटें स्वकृतीनें निर्माण करतीं ना.

सुदैवानें अलीकडे परराष्ट्रांशीं सलूख असावा असें पुष्कळांस वाटूं लागलें आहे. पण नुसतें वाटूं लागलें आहे; कृति नाहीं. याचें कारण, अजून स्वराष्ट्राचें हित व परराष्ट्राचें हित हे भेदसूचक शब्द कायम आहेत. पण हे चुकीचे आहेत. आजकाल सर्व राष्ट्रांचे हितसंबंध इतके अन्योन्यावलंबी आहेत कीं एकाचे हिताला धोका तोच इतरांच्या अशी स्थिति आहे. पण ह्या गोष्टीचा व्हावा तितका विचार मुत्सद्दी लोक अजून करीत नाहींत. युरोपाचें भांडवल चारी खंडांत पेरलें आहे. या रूसोजपानी युद्धानें बाकीचे युरोपाचें केवढें तरी नुकसान झालें. सॅनफ्रन्सिस्कोंत अग्नि प्रळय झाला; तर त्यानें इंग्लिश विमाकंपन्यांना १,४०,००,००० पौंड नुकसानी बसली. असा एकाचा ताण दुसऱ्याला पोंचतो आहे.

परदेशांत सुखसमृद्धि असल्यांत युरोपचा के-

वढा तरी फायदा आहे. कारण, युरोपचा सर्व देशांशीं व्यापार आहे. तेथील लोकांपाशीं दोन पैसे झाल्यास युरोपचा माल खपतो. बरें, आस्ट्रेलेशियांत पाऊस चांगला झाल्यास, यूरोपाला लोकरी कपडा स्वस्तांत पडतो. हिंदुस्थानांत धान्य पिकल्यास यूरोपला पावरोटी स्वस्त मिळते. एवंच, माझें तुझें ह्या म्हणण्यांत आतां अर्थ उरला नाहीं. एकाचें हित तेंच दुसऱ्याचें हित असा निकट संबंध येऊन पोंचला आहे.

क्रिमियन युद्धाचे वेळीं इंग्रजी गलबतांनीं रशियांतला म्हणून पुष्कळ माल जाळला. पण ह्या मालाची मालकी होती इंग्रजी व्यापाऱ्यांचीच! अलाबामांत * इंग्रजांनीं पेंढार नेलें, पण फळ काय झालें? तर अमेरिकेच्या निशाणाखालीं गलबत नेल्याबद्दल इंग्लंडला ३०,००,००० पौंड अमेरिकेची नुकसानी भरून द्यावी लागली. शिवाय, अमेरिकेच्या ज्या गलबतांना अपाय झाला त्यांतील पुष्कळांचे विमे इंग्रजी मंडळ्यांकडे उतरले असल्यामुळें विम्याच्या रकमा इंग्रजांवरच पडल्या. एवंच दोहोंकडून साल गेलें.

लॉर्ड डर्बी म्हणे कीं, इंग्लडानें सर्व राष्ट्रांशीं साम ठेवण्यांत त्याचें कल्याण आहे. पण, युरो-

* अलाबामा हें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक आहे.

पचे राष्ट्रांना परस्परांस हळूच चिमटे घेण्याची संवय आहे, तेथें इग्लंडनें काय करावें? असें पारिस येथील इंग्रजांचा वकील म्हणतो. तरीहि लबक म्हणतो, अलीकडे इंग्लंडनें फ्रान्साशीं भावार्थानें स्नेहाचें बोलणें केल्यामुळें या दोन देशांतील आजपर्यंतची विरोधबुद्धि बहुतेक मावळून कायम गट्टी होण्याचीं खास चिन्हें आहेत. जर्मनीचीहि हीच हवाल आहे. कारण, जर्मन शहाणे आहेत. ते जाणतात कीं इंग्लंडवर जरी युद्धांत प्रसंगीं आपणांस सरशी मिळाली, तरी युद्धामुळें उभय पक्षांची खराबी होऊन दोन्ही राष्ट्रांचे प्रगतीची एक शंभर वर्षें खास पिच्छेहाट होईल. यास्तव उभयतांत सख्यच सुखावह. व या गोष्टीला बर्लिन, कोलोन, फ्रंकफूर्ट, हम्बर्ग, म्यूनिच व इतरहि व्यापारी जर्मन शहरांनीं आपली संमति दिली आहे.

लॉर्ड एव्हर्स्ले यानीं इंग्लंड, फ्रान्स व जर्मनी यांचे आजचे लढाऊ गलबतांच्या सामर्थ्याचें पुढील कोष्टक दिलें आहे.

| | इंग्लंड | फ्रान्स | जर्मनी |
|---|---|---|---|
| १ लढाऊ गलबतें | ७६९००० | २४९५०० | २३०००० |
| २ सशस्त्र फिरतीं गलबतें | २८०६०० | १४८१०० | ५५७०० |
| | १०५०५०० | ३९७६०० | २८५७०० |

हें सामर्थ्य पुढीलप्रमाणें वाढविण्याचे संकल्प ठरले आहेत:--

| | इग्लंड | फ्रान्स | जर्मनी |
|---|---|---|---|
| १ लढाऊ गलबतें | १११९००० | ३८४००० | ५२३००० |
| २ सशस्त्र फिरतीं गलबतें ( क्रुइझर्स ) | ८०९००० | ३९५००० | २२१००० |
| | *१९२८००० | ७७९००० | ७४४००० |

लबक म्हणतो, या संकल्पाप्रमाणें वाढ केल्यास खर्चाचा बोजा मात्र अतोनात वाढून, परस्परप्रमाण कायमच रहाणार. मग असें करण्यांत फायदा काय आणि शहाणपण तरी कोणतें? एकमेकांचे छातीवर दडपणें वाढवीत बसण्यापेक्षां सर्वांनींच स्नेहभाव जोडून सर्वांचींच दडपणें उतरण्यांत अधिक सुख व मौज नाहीं काय? कोणीं आपला हक्क किंवा हितसंबंध गमावूं नये. परंतु प्रस्तुत जीं युरोपीय राष्ट्रें परस्परांशीं पुंडाप्रमाणें किंवा लुटारू चांच्याप्रमाणें वागतात, तसें न वागतां, सर्वांनींच दोस्त व्हावें, व लढण्याचा प्रश्न उद्भवल्यास लढाई न करितां इतर राष्ट्रांना पंच नेमून लवादी निकाल करून घ्यावा, म्हणजे झालें, आणि हे छातीवरचे दडपे उतरून टाकावे. आजकाल या कामाला संधीहि बरी आहे.

पण कांहींचें म्हणणें प्रथम कंडूशमन तेव्हां

---

* हे आंकडे गलबतांचें टनेज ( भरीत ) दाखविणारे समजावे.

शांतीची बात. एरव्हीं ती कोणी ऐकणार नाहीं. हें एका अर्थी खरें आहे. पण सर्वांनींच शांति-पक्ष स्वीकारल्यावर युद्धांवांचूनहि शांति अशक्य नाहीं. शांतिपासूनचा फ़ायदा व वैरापासून तोटा याचा निवाडा अॅटलांटिक महासागराचे उभय तीरांकडे लक्ष पोंचविल्यानें होतो. एका तीराला युरोपांतील विभक्त राष्ट्रें व दुसऱ्यावर अमेरिकेंतील संयुक्त राष्ट्रें. संयुक्त राष्ट्रांची लोकसंख्या ९ कोटी, त्याचें भूमि व समुद्र मिळून सैन्य १,०७,००० व सैन्याचा खर्च ४ कोटि पौंड. युरोपीय विभक्त राष्ट्रांची लोकसंख्या ३५ कोटि, उभयविध मिळून सर्व सैन्य चाळीस लक्ष, व त्याचा खर्च २५ कोटि पौंड. म्हणजे विभक्त युरोपची लोकसंख्या संयुक्त अमेरिकाच्या केवळ चौपट असून युरोपचे लढाऊ लोक अमेरिकेच्या ४० पट आहेत. याचें कारण विभक्ति वैरभाव हेंच होय. कारण अमेरिकेंत सर्व एक विचार आहे. युरोपांत राष्ट्रराष्ट्रांत द्वेषभाव, मत्सर, अविश्वास, अहितबुद्धि, व बद्धवैरता यांचें साम्राज्य असल्यानें स्वरक्षणार्थ एवढा डोंगर प्रत्येकास उरावर घ्यावा लागतो. पण त्यानेंच एकाद दिवशीं सर्वांस रसातळास जावें लागेल हें खास. स्वदेशहिताबद्दल दक्ष असणें हा सद्गुण आहे; पण तें हित वैरभावा-

पेक्षां स्नेहभावानें साधणें हा वरिष्ठ सद्गुण आहे.
अमेरिकेंत सैन्याचा खर्च फार कमी आहे, त्यामुळें अमेरिकेला युरोपापेक्षां व्यापारांत भांडवल घालावयास अतोनात सवड राहते व याचमुळें अमेरिकेशीं व्यापारांत युरोपाच्यानें टक्कर देववत नाहीं. बाकी, अमेरिकन लोक व्यापाराचे नादानें एक मोठी चूक करीत आहेत ती ही कीं, शेतकीकडे समूळ दुर्लक्ष करून हजारों लाखों एकर जमिनींत केवळ यांत्रिक कारखाने सुरू करून, खेडींपाडीं ओस पाडून शहरें भरीत आहेत. पण ही चूक त्यांना परिणामीं भोंवेल, असें लबकचें मत आहे.

आतां युरोपची स्थिति घेऊं. युरोपांत अजून पड जमीन आहे. कोळसाहि आजच खलास होणारा नाहीं; तथापि खाणी अति खोल खोल चालल्यामुळें तो महाग होत आहे. जस्त तर संपलेंच. तांबें त्याच पंथाला आहे. लोखंडहि फार तग काढणार नाहीं. तेव्हां अशांतच डोळे उघडून, फाजील खर्च तोडून, बेतानें राहिल्यास ठीक आहे. नाहीं पक्षीं या खाणी संपल्या कीं सगळेंच उरकलें. पण, आज पहावें तों सैन्यें वाढविण्यावर प्रत्येक युरोपीय राष्ट्राचा भर आहे. लढाई कोठें नाहीं तरी शांतता आहे असें नव्हे, केवळ तहकुबी आहे. तेवढ्यामुळें रक्तपात नाहीं,

पण सैन्यांचे वाढते खर्च चालू असल्यानें पुढल्या पिढीला दोन पैसे ठेवण्याचे ऐवजीं कर्जाची ओझीं तयार होत आहेत, मग पोराबाळांचें डोकें वर कसें निघावें ? एवंच चालू प्रकार नुकसानीचाच आहे.

दुसरी गोष्ट—सैन्याचे खर्चानें व कर्जानें भारावून गेल्यानें अमेरिकेशी व्यापारांत युरोपाला टिकाव धरवत नाहीं. व शिवाय, मजूरवर्ग सर्वथा असंतुष्ट असल्यानें अराजक पंथ, समुदयस्वत्व पंथ इत्यादि अनेक पंथ देशांतल्या देशांत उद्भवून, अंतःशांति विध्वस्त होत आहे. अन्नाचे भाव सारखे चढत राहिल्यानें गरीब लोक श्रीमंतांवर बोटें मोडूं लागले आहेत. शेजारी केव्हां उठेल न जाणो, अशी अखंड धास्ती असल्यानें एक तर व्यापारीलोकांचेंहि धंद्याकडे लक्ष लागत नाहीं; दुसरें, संयुक्त संस्थानें व वसाहती ( कॉलनी ) यांत सरकारदेणें हलकें असून, शांति असल्यामुळें शेंकडो व्यापारी युरोप सोडून तिकडेच जात आहेत. यामुळें युरोप रिता पडत चालला आहे. एवंच एकहि सुचिन्ह नाहीं. लबकचें म्हणणें कीं, जोंपर्यंत युरोप हा सैन्याचा खर्च तोडणार नाहीं तोंपर्यंत युरोप हें ज्वालामुखी पर्वताचे शिखरावर वारा खातें आहे

असें समजावें. एकदम मध्यरात्रीं ' ओं फट् घे घे स्वाहा ' असें होऊन जाईल.

असल्या स्थितींत डोळेझांक करणें शहाणपण नव्हे. केल्यास, आज नाहीं लवकरच, पूर्वीं कधी झाला नाहीं असा युरोपभर कल्पांत प्रळय माजेल. युरोपचे राजांचीं सिंहासनें त्यांचे बुडाखालीं रहावीं अशी जर इच्छा असेल तर मंत्रीमंडळांनीं परस्परराष्ट्रांत स्नेहभाव व शांति वाढवून, आजकाल उद्योगधंद्याचे नरडीला नख देणारे जे अनिष्ट मार्ग देशांत उद्भवले आहेत ते बंद पाडले पाहिजेत. एरव्हीं धड चिन्ह नाहीं.

सर्वांनीं मनांत आणल्यास स्नेहभाव होणें अशक्य नाहीं; कारण, ईश्वरानें सर्व पृथ्वी एक म्हणून निर्माण केली. पण स्वार्थी मनुष्यांनीं ही विभक्ति निर्माण केली. कौपर कवि म्हणतोः—

( श्लोकार्ध )

जे ( देश ) वारिबिंदुसम भेटुनि एक व्हावे ।
ते पर्वतें * म्हणति वैर उभें असावें ॥

पण या पर्वतांच्या आडकाठीपेक्षां मनुष्यांनीं परस्परांविषयीं मनांत धरलेले अविश्वास, मत्सर, असद्भाव इत्यादि विकार हेच वैराला मुख्य कारण आहेत.

इंग्लंड, हालंड, व स्वित्झर्लंड हे देश सोडून

---

* पर्वत मध्यें आल्यानें

बाकी सर्व युरोपीय राष्ट्रांनीं परकीय मालावर संरक्षक जकाती बसविल्या आहेत. अमेरिकेंत संयुक्त संस्थानांचा आपसांत अनियंत्रित व्यापार आहे, पण परदेशांशीं संरक्षक जकाती आहेत. त्यांतहि ब्रिटिश-कानडा व इंग्लंड येथील मालावर जबर जकाती आहेत हा तरी न्याय काय? जर्मनीचा हाच मासला. जर्मन महाराष्ट्रापुरतें स्वातंत्र्य, बाहेर बंदी. बरें, यांत कांहीं उत्पन्नाचा हेतु नाहीं; कारण, स्वतंत्र व्यापार राखून चालीच्या जकातींनीं या राष्ट्राची तुंबडी भरणें शक्य आहे. पण ही केवळ दुस्मानगिरी, खंवटपणा. युरोपांतील राष्ट्रांत तर कोणीच कोणाला अनियंत्रित आयात देत नाहीं. साधेल तों परक्याच्या मालाला हाणून पाडण्याच्या युक्त्या अखंड चालू असतात.

सांप्रत स्थिति तर ही आहे. मार्किस ऑफ सॅलिसबरी १८९७ सालीं म्हणाले:—हीं सुधारलेलीं राष्ट्रें अहमहमिकेनें एकमेकांचे उरावर बसून लौकरच सर्व खंड बेचिराख होण्याचा रंग दिसतो आहे. कारण, तुम्हींच पहा, जो तो जादाजादा शस्त्रसंभार गोळा करून प्राणनाशाची कडेकोट तयारी करीत आहे. शक्तीचें केंद्रीकरण झपाट्यानें होत आहे. दरसाल अधिकाधिक जाज्वल्य व सद्यःप्राणहारक शस्त्रास्त्रें तयार होत आहेत, व आत्मरक्षणार्थ म्हणून तरी प्रत्येकास

या चढाओढींत पडणें भाग आहे. अर्थात् हा अनर्थ वाढत जाणार; व अखेर यादवी होऊन सर्वांचीच निपोताशान्ति होणार हें खास. तर हा भावी अनर्थ टाळण्याचा एकच मार्ग हा आहे कीं, सर्व राष्ट्रांनीं द्वेषभाव व अविश्वास सोडून स्नेहभावानें व विश्वासानें वागावें; व तंटा पडलाच तरी इतर राष्ट्रांचे मध्यस्थीनें उलगडा पाडून एकंदरींत सर्व राष्ट्रांत अखंड शान्ति राहून सर्वत्र अनियंत्रित व्यापार नांदेल अशी योजना करावी; तरच तरुणोपाय आहे. सर हेनरी कॅंबेल बॅनरमन हेहि १९०५ सालीं याच अर्थाचे विचार बोलले. व राष्ट्रांचें स्नेहभावानें एकीकरण करण्याचें पुढारीपण इंग्लंडनें घ्यावें, असेंहि त्यांनीं सुचविलें.

लबक म्हणतो, येथपर्यंत ही युद्धलालसा राष्ट्रांना समृद्धिदृष्ट्या व व्यापारदृष्ट्या कशी घातक व अतएव अप्रशस्त आहे, तें मीं दाखविलें. पण हेहि विचार एकीकडे ठेविले तरी युरोपीय राष्ट्रें आपणांस ख्रिस्तियन म्हणवितात, त्या अर्थी त्यांच्या धार्मिक बाण्याला कलहप्रियता ही सर्वथा लज्जाकार आहे. कारण, ख्रिस्तियन धर्माची खूण विजारटोपी नसून अहिंसा ऊर्फ भूतदया ही आहे. आणि ती जर तीं विसरतील तर त्यांनीं आपले धर्माला काळिमा आणिला असें बेधडक म्हणावें.

परंतु, दुर्दैवानें युद्धाचा ढोल बजावणारे किती तरी लोक पार्लमेंटांत व ग्रंथकारांतहि आहेत. ते अक्षयीं आगींत तेल ओतीत असतात; याला काय करावें? अशानें अखेर सर्वांचीच राख होईल. तर यांनीं डोळे उघडावे, वैरभाव टाकून द्यावे. सर्वांचे हितसंबंध एकत्र कसे गुंतले आहेत हें नीट ध्यानांत घ्यावें. एकाचा उत्कर्ष तोच सर्वांचा, व एकाचा अपकर्ष तोच इतरांचा, हें तत्त्व अनुभवानें तपासून पहावें. व खात्री झाली—आणि ती झालीच पाहिजे—म्हणजे तरी हातांत हात घालून वागावें.

यूरोपांत पूर्वकालीं ज्याचा कायदा त्याचे हातांत असे. म्हणजे, अनें कची खोडी काढल्यास कच परस्पर अचें पारिपत्य करीत असे. परंतु, हल्लीं कोणालाहि खासगी पारिपत्याची परवानगी नाहीं. प्रत्येकानें वरिष्ठसत्तेकडेच न्याय मागितला पाहिजे. व या पद्धतीस आह्मीं सुधारलेली पद्धति म्हणतों. हें जर खरें, तर हाच न्याय व्यक्तिशः राष्ट्रांकडेहि कां न लावावा? म्हणजे अ राष्ट्रानें क राष्ट्राची खोड काढिल्यास उभयतांनीं परस्पर हाणामारीवर न येतां 'सार्वराष्ट्रीय समिती'कडे न्याय मागावा. कारण, व्यक्तीला जर खासगी पारिपत्याचा हक्क नाहीं, तर राष्ट्रांस तरी व्यक्तिशः हा हक्क असणें अन्यायच म्हटला पाहिजे. म्हणून इतउत्तर सुधारलेले रा-

ष्ट्रांनीं रानटी लोकांप्रमाणें एकमेकांचे घराला आग न लावितां 'सार्वराष्ट्रीय समिती'पुढें आपली तक्रार मांडून न्याय घ्यावा हें योग्य आहे.

एतावता सर्व बाजूंनीं विचार करितां इतःपर सर्व राष्ट्रांनीं परस्पर गैरसमज उत्पन्न होऊं न देणें व स्नेहभाव वाढविणें या गोष्टी आपलें आद्यकर्तव्य म्हणून केल्या पाहिजेत. सैन्याचा खर्च कमी करणें हें तर सर्व जगतास आणि विशेषतः युरोपखंडास फारच उपकारक होणार आहे. कारण, त्यायोगानें युरोपचे लोक विपत्ति व दशाविपर्यय यांचे तडाक्यांतून बचतील. त्यानें कराचें ओझें हलकावेल, मजुरांना कमी तास कष्ट करून भागेल व मजुरी अधिक मिळेल आणि अन्नाची महागाई कमी होईल. याकरितां कोणाहि राष्ट्रानें सैन्य कमी करण्याची संधी दवडूं नये. कांहीं राष्ट्रें या गोष्टीस प्रथमच कबूल नसलीं तरी सडकून यत्न करावा. हा प्रथम इंग्लंदनेंच करावा. अपशय आलें तरी देखील करावा. असा लबकचा आग्रह आहे. कारण, यत्न केल्यास आज नाहीं उद्यां युरोपचीं राष्ट्रें ही गोष्ट ऐकतील. आणि इंग्लंडचे यत्नाला यश येऊन आजकाल प्रत्येक राष्ट्रांत उधळेपणा, मत्सर व अविश्वास दिसत आहेत, त्यांचे जागीं मितव्यय, शान्ति व स्नेहभाव हीं दिसूं लागलीं, तर युद्धानें मिळ-

विलेल्या विजयापेक्षां हा जयजयकार अधिक भूषणावह होईल; व या गोष्टीनें केवळ युरोपाचेंच कल्याण नव्हे, तर अलम दुनियेला सुख होईल. परंतु, ही गोष्ट जोंपर्यंत सिद्ध होणार नाहीं तोंपर्यंत तुम्हीं किती दक्षता ठेवा, अखेर हें सर्व घडाडून—" सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मैनमः । " अशांतला प्रकार खचीत खचीत होईल. याकरितां वेळींच परिणामावर दृष्टी देऊन सर्व राष्ट्रांनीं परस्पर विरोध सोडून स्नेहभाव धरावा. व आपण स्वतः सुखशान्तीचा लाभ घेऊन अखिल जगतासहि द्यावा. इतकीच त्यांस साविनय सूचना आहे. ती अंगीकारण्यास परमेश्वर त्यांस बुद्धि देवो.

( श्लोक )

चित्ताऽक्रान्तं धातुवद्धं शरीरं ।<br>
नष्टे चित्ते धातवो यान्ति नाशं ॥<br>
तस्माच्चित्तं सर्वदा रक्षणीयं ।<br>
स्वस्थे चित्ते बुद्धयः संभवन्ति ॥ १

—अवधूत गीता

भावार्थः—ह्या रसरक्तादि सप्तधातूंनीं बनलेल्या शरीरावर जोंपर्यंत चित्ताचा ताबा आहे तोंपर्यंत तें अबाध राहतें. परंतु, चित्तच बिघडलें कीं शरीरस्थ रसरक्तादि कहि नासतात. याकरितां सर्वदा चित्त हें यत्नपूर्वक स्थिर राखावें. कारण, चित्त स्थिर असेल तरच बुद्धि स्फुरते.

# प्रकरण १६

## चित्तस्वास्थ्य

मतिः स्फुरति हि स्वस्थे नृणां चेतसि ।

भावार्थः—मनुष्याचें चित्त स्वस्थ असेल तेव्हांच सुविचार सुचतात.

राष्ट्राराष्ट्रांची शांति तशीच माणसामाणसांची, असें पुष्कळांचें म्हणणें आहे. परंतु, हें साम्य ठीक नाहीं. राष्ट्राचे कामीं, शेजारी जर भांडखोर, अधाशी व अनीतिमान् मिळाला तर या राष्ट्रानें केवळ गम खाणें इष्ट किंवा न्याय्यहि होणार नाहीं; परंतु, व्यक्तीचें तसें नाहीं. स्वतःची मनःशांति न बिघडूं देणें हें कोणाहि व्यक्तीच्या स्वाधीनचें आहे. राष्ट्राप्रमाणेंच व्यक्तीलाहि दुर्जनांशीं संबंध आल्यास शांति राखणें अवघड तर खरेंच, पण केवळ अशक्य नाहीं. सॉलोमन म्हणतो:— " जेथें नित्य कलह चालू आहे अशा भव्य मंदिरांतील मेजवान्यांपेक्षां शांत झोंपडींतील मीठभाकर बरी ". मोरोपंत म्हणतात:—

(आर्याचरण)

क्षीर न खाय खळाची, हरि विदुराच्याहि भक्षितोचि कण्या

हपापाच्या लुटीपेक्षां न्यायाची दमडी बरी. प्रेमाची भाजी आणि द्वेषाची सोजी बरोबर नाहीं, ही शांतीची किंमत आहे.

संसारांत मनुष्याला बारीकसारीक त्रास हे येणारच. पण, कांहीं लोक अशांचें मुद्दाम एक गांठोडें आंवळून उरावर घेतात, आणि भारानें मरतों म्हणून रडूं लागतात; हें वेडेपण आहे. आली अडचण वेगळे वाटेस लावून द्यावी आणि मोकळें व्हावें. काठ्यांचे जुडीची गोष्ट ध्यानांत ठेवावी. एकदम जुडी मोडणें शक्य नाहीं; पण वेगळी वेगळी काठी तेव्हांच मोडतां येते. याचप्रमाणें बारीकसारीक दुःखांची विल्हेवाट लावून टाकावी. तीं गांठीं बांधीत बसूं नये; म्हणजे चित्तस्वास्थ्य एकंदरींत कायम रहातें.

जगताला सुखी करणें आपले हातीं नाहीं. पण स्वतःला सुखी करणें केवळ आपल्या हातचें आहे. व त्याला कांहीं विशेष कष्ट नाहींत. कसाहि प्रसंग आला तरी स्वतःची वृत्ति शान्त, तृप्त आणि प्रसन्न ठेवण्याची खुबी साधली म्हणजे सुखाला तोटा नाहीं. परंतु ही ज्याची त्यानेंच साधली पाहिजे. आणि यत्न करील त्याला ही वृत्ति साधणें अशक्य नाहीं.

रूशिफूका म्हणतो, " तुला जर स्वतःचे हृदयांत शान्ति सांपडत नसेल तर ती त्रिभुवनांतहि सांपडणार नाहीं ". शांतीला श्रीमंती लागत नाहीं. अकिंचनालाहि ती प्राप्त होते. भर्तृहरि म्हणतातः—

( श्लोक )

अकिंचनस्य दांतस्य । शांतस्य समचेतसः ॥
सदासंतुष्टमनसः । सर्वाः सुखमया दिशः ॥ १

भावार्थः—निर्द्रव्य असूनहि जितेंदिय, शांत, समबुद्धि व नित्यसंतुष्ट असेल त्याला दशदिशा सुखमयच आहेत.

परंतु, पुष्कळ लोक रात्रौ केवळ एकटे असले म्हणजे शान्त व स्वस्थ न राहतां उलट नसत्या काल्पनिक अडचणी उभ्या करितात. मनचे विकट प्रश्न पुढें घेऊन घोटाळ्यांत पडतात. कोणाचे ध्यानीं मनीं नाहीं तसलीं भूतेंखेतें मनांत आणितात. किंवा असेंच कांहीं खेंगटें मनाचे मागें लावून घेऊन चिंताग्रस्त बसतात. त्यांना धड झोंप येत नाहीं, खाल्ले अन्न अंगीं लागत नाहीं. आणि ते माशासारखे उलथे पालथे पडतात.

अशा लोकांना पाहून कींव येते. कारण, खरोखरीचा त्रास नसतांना, हे कल्पनेचेच त्रास उद्भवून घेतात. समर्थ म्हणतात, " वायां पडावें संदेहीं, मुळीं तेथें कांहीं नाहीं ". त्यांतला प्रकार हे लोक करितात. ते उकरून उकरून दुःखें काढितात. अशांना काय म्हणावें? यापेक्षां हे लोक जर परदुःखाची कींव करून तें दूर करण्यास झटतील, तर दुसऱ्यांस सुखी करून आपणहि सुखी होतील. शर्बुल म्हणतो, " आ-

त्मविस्मृतिशिवाय आत्मविश्रांति नाहीं ". परंतु, हें रहस्य न समजतां पुष्कळ लोक अनागत चिंतांनींच व्याकूळ होतात. अशानें अवश्यंभावि दुःख तर टळत नाहींच, पण, हे मात्र दुहेरी दुःखी होतात. लोनार्डोव्हिन्सी म्हणतो, " साक्षात् मृत्यूपेक्षां मृत्यूची चिंताच अधिक क्लेशावह असते. पशूंना मृत्यू येतो, पण, त्यांना भावी गोष्टींची चिंता माहीत नसल्यामुळें मनुष्याप्रमाणें ते आगाऊ हैराण होत नाहींत ". यासाठीं शहाण्यानें अनागत चिंता करीत न बसतां जें ज्यावेळीं प्राप्त असेल त्याला धरून चालावें, म्हणजे त्याला सुख होईल.

जो मनुष्य संपत्कालीं बेफाम वागतो तो अखेर विपन्मुखांत पडतो. दुर्व्यसनासारखी वाईट गुलामगिरी दुसरी नाहीं. तिचे योगानें मनुष्याचे सत्त्वाचा ध्वंस होतो. व मनुष्यें इतकीं नीच व अप्रयोजक बनतात कीं, आत्मतारणाचें त्यांचे अंगीं सामर्थ्य उरत नाहीं; इतकेंच नव्हे, तर नुसता विचारहि रहात नाहीं.

आपण सन्मार्गानें चालत असावें; मग लोक खुशाल नांवें ठेवोत, त्याची फिकीर करूं नये. कारण, आपला अंतरात्मा जर आपण करितों तें तें योग्य करीत आहों अशी साक्ष देत आहे, तर लोकैषणेला भिण्याचें कारण नाहीं. लोकांचे

नादीं लागला तो बुडाला. तुकाराम म्हणतात:-
" लोक जैसा ओक हातीं धरवेना " ।

स्वातंत्र्य ही मोठी ज्ञानाची खूण आहे. यामुळें जो खरा शहाणा आहे तो परतंत्र रहात नाहीं. पण जगतांत पहावें तों शेकडों लोक आपल्या मनोविकारांचे केवळ ताबेदार बनलेले असतात. अर्थात्, हीच त्यांचे ज्ञानहीनत्वाची साक्ष आहे. प्रथम गैर गोष्ट करून जावें व मग शरमावें, प्रथम रागावावें आणि मग पस्तावावें, यांत कोणतें शहाणपण ? याकरितां विकारवशहि होऊं नये. डॉक्टर जान्सन म्हणतो,"तुमचा कोणीहि मनुष्य कोणत्याहि हेतुस्तव अवमान करो, शहाण्यानें अपकर्त्याची उपेक्षा करावी हेंच ठीक. कारण, अपकर्ता जर मूर्ख असला तर त्यावर राग करणें फुकटच आहे. बरें, मत्सरी असला तर त्याचे तोंडीं लागलें नाहीं म्हणजे आपेआपच त्याचे तोंडावर माशा पडल्या ".

भर्तृहरि म्हणतो:—" क्षांत्यैवाक्षेपरूक्षाक्षर मुखरमुखान्दुर्मुखान् दूषयन्तः । " म्हणजे ( सज्जन ) शिवराळ लोकांना क्षमेनंच फिके पाडितात. आपण अपमानित झालों असें दाखविणें म्हणजे दुष्टांचा उत्कर्ष सुचविणें आहे. त्यापेक्षां आपण तिकडे कानाडोळा केला म्हणजे दुर्जन आपोआपच फजीत होतो. कुत्रें भुंकूं लागलें म्ह-

णजे तसेंच घट्ट उभें रहावें, कीं ग्रामसिंहाचें अवसान खचलेंच समजावें. ठरलें कीं तें पुढें सरलेंच. हाच न्याय दुर्जनाशीं. थॉमस ए. केंपिस म्हणतो, " आपण जर लोकांच्या नसत्या उचापती करण्याचें सोडिलें तर चित्तस्वास्थाला तोटा नाहीं. परंतु, जगांत पुष्कळ लोक दुसऱ्याच्या उठाठेवी करीत सुटतात, आणि मग तिडका देतात ".

कर्तव्यासंबंधें मात्र प्रत्येकानें त्याचे स्वरूपाची चिकित्सा न करितां तें अवश्यकरणीय असें समजून सर्वात्मना करावें. म्हणजे एक तर तें कार्यहि धडपणें पार पडतें व त्याचे नादांत आपणहि दुःख विसरतों. काम कसलें कां असेना, तें योग्य मार्गानें करावें म्हणजे झालें. टर्नर नामक चित्रकाराला कोणीं विचारिलें कीं, आपण इतके कुशल चित्रकार कशानें झाला ? त्यानें उत्तर केलें, " शिकस्त मेहनतीनें ". स्वकर्तव्याचरण हें जसें सुखाचें साधन आहे तसें, परोपकार हेंहि आहे. पण, परोपकरण निराळें आणि ' अव्यापारेषु व्यापार ' निराळा; हें लक्षांत ठेवावें.

ईश्वरी योजनाच अशी आहे कीं, श्रमावांचून कांहीं प्राप्त होऊं नये. मात्र या श्रमाचे अंगींच त्यानें गोडी व सुख ठेविलें आहे. आयता रस पिण्यापेक्षां ऊंस चावून खाण्यांत अधिक गोडी

लागते; हा सर्वांचा अनुभव आहे. नुसतें बक्षीस मिळविण्यापेक्षां शर्यत धांवून बक्षीस मिळविण्यांत सुख अधिक होतें. त्यांतहि जितकी चढाओढ अधिक तितकी शर्यतीला गोडी विशेष. प्रतिस्पर्धीहि तोडीस तोड असून त्यावर जय मिळाला म्हणजे त्याहूनहि तो अधिकच भूषणावह होतो. सारांश, श्रमांनीं शीण न होतां सुखाला रुची चढावी अशीच त्या परमात्माची योजना आहे.

कोणी कांहीं मानो, परंतु, संसार ही एक सतत चढाओढीची परीक्षा आहे. या परीक्षेंत जेव्हां जेव्हां अपयश येतें, तेव्हां तेव्हां मनुष्य जर शहाणा असेल तर पुढील वेळीं अधिक दक्ष राहून सुधारतो. प्रसंगीं चूकहि झाली तरी प्रत्येक चुकी अनर्थावहच होते असें नाहीं. मनुष्याच्या चुक्याच मनुष्यास शिक्षक होऊन शहाणें करितात. शास्त्रीय शोध करितांना पुष्कळदां प्रयोग फसतात, तरी त्यांपासून कांहीं ना कांहीं फायदा होतोच. देश शोधण्यासाठीं म्हणून कोलंबस निघाला, त्याला हवा तोच देश यद्यपि सांपडला नाहीं तथापि अमेरिका तरी सांपडली. किमया सिद्ध करण्यासाठीं म्हणून लोकांनीं हजारों प्रयोग केले व त्यांनीं जरी किमया सिद्ध झाली नाहीं तरी तिच्याच किमतीचें रसायनशास्त्र तयार झालें; हा कांहीं कमी फायदा नव्हे.

उद्योगधंद्यांत लाखों रुपये घालणाऱ्या श्रीमंतांचे मनाला कधींहि शान्ति नसते असें आढळतें. परंतु, अशांतीचें कारण धंदा नसून, ज्याचा त्याचा मनोधर्मच आहे. समर्थांचा शिष्य जेव्हां 'मला संसार सुटत नाहीं, काय करूं' म्हणून म्हणाला, तेव्हां त्याला विहिरीवर लोंबणाऱ्या एका वृक्षावर चढवून 'फांदीचे हात सोड' म्हणून समर्थांनीं सांगितलें, व तो सोडीना तेव्हां 'फांदी तुला सोडीत नाहीं कीं तूं फांदीला सोडीत नाहींस ?' म्हणून विचारिलें, तशांतलाच हा प्रकार आहे. धंदा चिंता उत्पन्न करीत नाहीं; अशांचीं मनेंच काळजीखोर असतात. शिवाय, ज्यापासून चिंता उभी राहील असल्या कामाला धंदाउदीम असें नांवच शोभत नाहीं; ती सोडत किंवा तवकल समजावी. धंद्यांतहि 'व्यापार करतां सोळा बारा' हा अनुभव येईलच; पण तो निराळा, आणि केवळ 'लागो भागो दिवाळी' ही स्थिति निराळी. कसलेल्या धंदेवाल्यालाहि एखादे वेळीं ठोकर लागणारच. कारण, या जगतांत स्वेच्छा, परेच्छा आणि यदृच्छा अशा तीन इच्छा असतात. यांपैकीं यदृच्छा कोणाचेच हातीं नसते. शेतकरी आपलेकडून जमिनीची यथेच्छ मेहनत-मशागत करून राहिला आणि ऐनवेळीं पावसानें दगा दिला तर बापडा काय करील ? हें खरें; तथापि,

असे प्रसंग फार थोडे. बहुधा सत्यसंकल्पाला व सदुद्योगाला परमात्मा साह्य असतो.

दुसरी गोष्ट, व्यवसायाचे अनेक ओढे मागें असूनहि चित्तवृत्ति स्थीर राखतां येणें शक्य आहे. लबक म्हणतो, हें ज्याला साधत नसेल अशानें धंद्यांत पडूंच नये. कारण, द्रव्यार्जनार्थ आत्मघात करून घेण्यांत कांहीं शहाणपण नाहीं. अशांनीं स्वस्थ ' हरि हरि ' म्हणत बसावें, हेंच ठीक. बाकी, पुष्कळ लोक असे अहेत कीं, कोंपऱ्यांत एकटे बसूनहि सर्व जगाच्या उलाढाली करीत बसतील. उलट पक्षीं, कित्येक असेहि दिलदार असतात कीं, शेंकडों उलथापालथींत असून स्वतःचे वृत्तीला कधींहि ढळ होऊं देत नाहींत. सारा मुद्दा ज्याचे त्याचे वृत्तीवर आहे; धंद्यावर नाहीं, आणि एकांतावर नाहीं.

केकळ बाह्यतः संसाराचे भानगडींतून दूर सरल्यानें किंवा वनांत झोंपडी बांधल्यानें चित्तस्वाथ्य लाभेल असें नाहीं. ज्याची वृत्ति बनली नाहीं त्याचें चित्त विक्षिप्त होण्यास मोठेंसें राजकारण किंवा व्यापारधंद्यांतील संकटच लागतें असें नाहीं; क्षुद्र गोष्टीवरूनहि अशाचें मन चंचल व क्षुब्ध होतें. व चित्त जोंपर्यंत प्रशांत नाहीं तोंपर्यंत नुसतें प्रशांतस्थळीं बसल्यानें काय होणार? आणि चित्त जर संयत आहे तर भर वा-

जारांत बसल्यानेंहि त्याला कोण विक्षेप करणार? शुकमुनि हे डोक्यावर भरलेली परात घेऊन एक थेंब न सांडतां चित्रविचित्र शृंगारलेल्या व माणसांनीं गजबजलेल्या विदेह नगरींतून फिरून आले! इंग्लंडचे माजी प्रधान ग्लॅडस्टन यांचे भोंवतीं कामाकाजाची किती गर्दी व तसदी असेल याची कल्पना कोणासहि सहज होणारी आहे. परंतु, या गृहस्थाचा चित्तसंयम असा विलक्षण होता कीं, त्यानें राजसभेंतून पाऊल बाहेर टाकिलें कीं राजकारणाचें कसे तें स्मरणहि नाहीं. तीं सर्व कारणें राजसभेचे तिजोरीचे बांकांवर ठेवून स्वारी मोकळ्या मनानें घरीं परते. घरीं त्याचें पुस्तकालय असे त्याला त्यानें 'शांतिसदन' असें नांव दिलें होतें. आणि त्या सदनांत तो बसला म्हणजे दुनिया कोठें आहे याचें त्याला स्मरणहि नसे. इतका मनोजय त्याचे अंगीं होता. ग्लॅडस्टनसारख्या विविध-राजकार्य-समाकुल मनुष्यालाहि जर चित्तस्वाथ्य संपादितां येत होतें, तर सामान्य जनांस तें अप्राप्य असण्याचें कांहीं कारण नाहीं.

कोणत्याहि गृहांत शांति असणें हें त्यांत रहाणाराचे वृत्तीवर अवलंबून आहे. व्यक्तीची शांति त्याच्या मनःस्थितीवर अवलंबून आहे. रोम येथें ख्रिस्ती-विवाहाचे समयीं नूतन विवा-

हित दंपत्यांत परस्पर शांतता नांदावी म्हणून उपाध्याय परमेश्वराची प्रार्थना करीत असतो. कारण, शांततेचा अभाव झाल्यावर दंपत्यसुख संपलेंच समजावें. हिंदु विवाहपद्धतींत शांति-सूचक किती तरी मंत्र लग्नसमयीं म्हटले जातात.

खेड्यापाड्यांतून ज्यांचा सारा दिवस रानां-वनांत एकटे दुकटे काम करण्यांत जातो, अशां-ना शान्तीची वाण कधींच नसतें; व प्रसंगी घ-रांत आल्यावर शांततेचा भंग झालाच तरी तो चालेलहि. परंतु, मोठमोठ्या शहरांत उभा दिवस ज्यांचीं माथीं व्यवहाराच्या उलाढाली आणि रुपये, आणे, पै यांची गणती करण्यांत व व्याज-बट्टा, नफा-तोटा, वगैरे आकारण्यांत सारखीं गु-तल्यामुळें भणाणून गेली असतात, अशांना घरीं आल्यावर तरी अवश्य शांतता मिळालीच पा-हिजे. ती न मिळाली आणि घरीं व दारीं शां-ततेचा सारखाच अभाव असला म्हणजे अस-ल्याचें जिणें कष्टमयच होणार; आणि मग अ-शांचें धंद्यांतहि पुढें पाऊल पडणें कठीणच. का-रण, चित्त शांत नसेल तर त्यांना धंद्यांत तरी युक्तिप्रयुक्ति कशी सुचणार व दुसरे दिवसाला उमेद किंवा ताजेपणा कसा यावा ? बिळाचे आं-त सर्प व बिळाचे बाहेर बोका, अशा पेंचांत सां-पडलेल्या उंदराचीच जशी अवस्था तीच अशांची.

मनुष्य म्हणतें कीं, पैशानें सर्व कांहीं मिळतें; पण ही चूक आहे. आरोग्य, शांतता व सौख्य या तिन्ही अमोल गोष्टी पैशानें मिळत नाहींत. मिळत नाहींत इतकेंच नव्हे, परंतु, त्यांपैकीं आरोग्य आणि शांति या दोन्ही गोष्टी तर सहज असल्या तरी पैशामुळें नाहींशा मात्र होतात. रोज 'घृतकुल्या मधुकुल्या' मिळाल्यानें आरोग्य नाहींसें होतें, व द्रव्यहानि होईल कीं काय या धास्तीनें शांति नष्ट होते. पण पैशानें मिळत नाहींत, म्हणून त्या अप्राप्य आहेत असें मात्र समजूं नये. त्या कोणालाहि प्राप्य आहेत. परंतु, त्याला अंगांत करामत लागते. भाजी-भाकरी खाऊन टामटुमींत असणारीं आनंदी गरीब कुटुंबें शेंकडों आहेत.

कांहींचें म्हणणें कीं, इहलोकीं सुख–शांति हीं मुळींच नाहींत. मार्कस अरेलिअस म्हणतो, " सुख–शांति पाहिजे तर ईश्वरासन्निध रहा ". कवि म्हणतोः––

( श्लोकचरण )

सर्वं वस्तु भयान्वितं भुवि नृणां विष्णोःपदं निर्भयं ।

हें म्हणणें खरें आहे. तथापि, निर्मळ वृत्ति असली म्हणजे ईश्वराचें सान्निध्यच आहे असें समजावें. आणि मग सुखशांतिहि दूर जाणार नाहीं.

सुखशांति संपादणें कोणालाहि अशक्य नाहीं

तथापि, श्रमसाध्य आहे. परंतु, सुखशांतीची हानि करणें मात्र सर्वांस सुलभ आहे. खाण्यापिण्यांत अत्याचार करावा, व्यायाम किंवा खुली हवा मुळींच घेऊं नये म्हणजे कोणासहि अग्निमांद्यादि रोग ठेवलेलेच. रोग आला कीं स्वतःला क्लेश आणि संगतीच्या माणसांनाहि क्लेश. फाजील तळकट खाल्ल्यानें याला खोकला उसळून हा ठो-ठो-ठो करणार; घरांतल्यानांहि झोंप नाहीं. असा एकाचा आचरटपणा दुहेरी त्रासदायक होतो. आपण उधळपट्टी करावी, सावकाराला ओरडत बसवावें. स्वतःची वृत्ति संशयी ठेवावी म्हणजे आपल्यालाहि सुख नाहीं, दुसऱ्यालाहि नाहीं. एका गृहस्थाची कांहींशी सुंदर व तरुण स्त्री होती. हा गृहस्थ रोज कचेरींत जातांना स्त्रीला बिऱ्हाडांत कोंडून ठेवून मुख्य दाराला कुलूप घाली व माडीचे खिडक्यांस नित्य आपले सहीच्या मोहोरा करी. यापेक्षां तो जर आपल्या सहचारीचें प्रेम व विश्वास संपादिता, तर दारें उघडीं टाकूनहि तो खचित याहून निश्चित झाला असता. रामचंद्राची सीता लंकापतीचे ताब्यांत दिवसरात्र होती म्हणून रावणाला कितीसें यश आलें!

जे कोणी स्वहितार्थच झटत असतात अशांचे यत्न विफल झाले असतां त्यांना फारच वाईट वाटतें. परंतु परहितार्थ जे झटतात, त्यांची गोष्ट

वेगळी आहे. त्यांना यश आलें, तर दुहेरी सुख होतें; व प्रसंगीं न आलें तरी आपस्वार्थ्याइतका खेद होत नाहीं. कारण, आपण सत्कार्यीं यत्न करीत होतो, ही गोष्टच त्याचा खेद दूर करिते. परोपकार करण्याला मोठेंसें शरीरबळ किंवा द्रव्यबळहि लागतेंच असें नाहीं. सदिच्छा मात्र पाहिजे म्हणजे क्षूद्र मनुष्य देखील महदुपकार करूं शकतो. याविषयीं इसापनीतींतील 'सिंहाला जाळयांतून सोडविणाऱ्या उंदराची' गोष्ट सर्वश्रुतच आहे.

पुष्कळांचें आयुष्य दुःखमय व कष्टमय दिसतें खरें; पण, त्याला कारण तेच आहेत; सृष्टि नव्हे. तेच आत्मदोषानें दुःख उत्पन्न करितात. दुःखें, संकटें हीं संसारांत यावयाचींच. परंतु, त्यांना पुरून आपण उरलें पाहिजे. ईश्वरानें जी जी गोष्ट आह्मांला कर्तव्य म्हणून भाग ठेविली आहे ती आमचे कल्याणाचीच आहे. दुःख जें उद्भवतें तें आमचे चुक्यांपासून उद्भवतें. जो कुढ्या स्वभावाचा मनुष्य असतो तो सर्वदा असंतुष्टच असतो. कृपण अनुकूलता असूनहि उपास काढितो; अधाशी खाणारा व मद्यपी हे लोक खाद्यपेयांसारख्या सुखकर पदार्थांच्या सेवनानेंच नाश पावतात. शक्तीबाहेर श्रम करणारा पनुष्य श्रमांपासून बळकट न होता क्षीण होतो; असलें

रमणीय जगत् असूनहि आळशी व अज्ञानी लोकांस तें कंटाळवाणें वाटतें. आप्पलपोट्या व एकलकोंड्या मनुष्याला स्नेह, विश्वास व प्रेम यांचें सुख अनुभवण्यास सांपडत नाहीं. यांत परमेश्वराकडे किंवा सृष्टीकडे काय दोष ? दुर्व्यसनी मनुष्य दिवसेंदिवस अधोगतीला जातो. त्याचें शरीर व मन दुर्बल होत जातें. एकामागून एक सुखसाधनें विलयास जातात; व भ्रममूलक जीं व्यसनापासून होणारी सुखें तींहि त्याला त्रासदायक होऊं लागतात; आणि आपले भोंवतीं सर्वत्र हितशत्रु भरले आहेत असा भास होऊन तो अक्षयीं अस्वस्थ होतो. या गोष्टीचा बोल कोणाकडे ! आपण स्वहस्तेंच आपला नाश केला असें त्याचे डोळे उघडून त्याला दिसूं लागलें म्हणजे तर त्याचें मन त्याला अधिकच खाऊं लागतें; व अखेर हळहळींतच त्याचा अंत होतो. हीं त्याचे दुष्कृतींचींच फळें होत. याचेच उलट, सन्मार्गी मनुष्याला आयुष्य अधिकाधिक सुखकर व रमणीय भासूं लागतें. त्याचें चित्त शांत शान्त होत जातें. सुविचाराचें त्याचे मनांत भांडार जमतें; व घरींदारीं स्नेह, प्रेम, कृतज्ञता यांचाच लाभ होऊन, तो अखेरपर्यंत सुखी होतो.

मनुष्यानें स्वतःला तरवारीचे धारेवर वागावें, पण दुसऱ्याशीं त्याचें वर्तन प्रेमळपणाचें

व सदयतेचेंच असावें. तें इतकें कीं, मृत्युसमय आला असतां आपले हातून कोणास दुःख झालें होतें, ही क्लेशदायक स्मृति त्याला टोंचीत राहूं नये. जबरदस्तीपेक्षां प्रेमळपणानेंच जग अधिक वश होतें. तितकेंच सबळ कारण असेल तर गोष्ट वेगळी; एरव्हीं घे म्हटल्या दुसऱ्याविषयीं अविश्वास धरूं नये व विनाकारण तो वाईट आहे असें मानून चालूं नये. कारण, तसें करण्यानें आपलेच चित्तस्वास्थ्याची हानी होते, आणि पुष्कळ वेळां आपला अंदाज चुकीचा ठरून आपणासच फजीत होण्याची पाळी येते. यापेक्षां आपण विश्वास टाकिला असतां दुसराहि इमानानें वागतो.

धर्माचरण हेंहि सुखशांतीचे मोठेंच साधन आहे. धर्म जरी भिन्न भिन्न आहेत, तरी प्रत्येकांत ग्राह्यांश पुष्कळ आहेत. लबक म्हणतो, **महमदी धर्म** साधा असून मद्यपाननिषेधक आहे; **हिंदु धर्म** निवृत्तिपर आहे. **यहुदी धर्म** कडक एकेश्वरी आहे; **बौद्ध धर्म** शांत, दयाप्रधान, व परोपकारानिरत आहे. एवंच, सर्व धर्म आपापलेपरी चांगलेच आहेत. तुम्ही कोणच्याहि धर्माचे असा, फिकीर नाहीं. आपले धर्माप्रमाणें आचरण ठेवीत चला, म्हणजे त्यानेंच तुम्हांला सुखशांति प्राप्त होईल.

आपण कोण आहों, आलों कुठून, जाणार कुठें, वगैरे गोष्टी जरी आपणा सर्वांस नीट कळत नसल्या, तरी या जगांत आपलें उचित कर्तव्य काय हें प्रत्येकास स्पष्ट कळतें; आणि तेवढें करून त्याप्रमाणें चाललें म्हणजे आयुष्य सुखावह होण्याला आडचण नाहीं.

कित्येक विद्वान् लोक परमेश्वराचे अस्तित्वाविषयीं तर्कवितर्क काढीत बसून मोठीं रणें माजवितात. परमेश्वर सत्यस्वरूप आहे. त्याला तर्कानें प्रतिष्ठित करूं पहाणें हेंच मूर्खत्व आहे; व तर्कजालानें तो कधीं आकळलाहि जाणार नाहीं. त्याला आकळण्याची युक्ति एकच आहे. ती युक्ति म्हणजे भक्ति. भक्तीचा मात्र तो दास आहे. भक्ताचे दारांत तो राबत असतो, असा साधुसंतांचा अनुभव आहे. याकरितां त्याला सद्भावानें आपलासा करून त्यावर सर्व भार टाकून निश्चित रहावें.

क्लेश प्राप्त झाला असतां त्याचें उन्मूलन करण्याचे नादीं पडण्यापेक्षां आपलें चित्त अन्य गोष्टीकडे लावून त्याची विस्मृति पाडणें हें अधिक श्रेयस्कर आहे. किंवा तुकाराम सांगतात, त्याप्रमाणें वागून सुखी व्हावें.

( अभंग )

कांहीं पडतां जडभारी । दासें आठवावा हरी ॥
मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥

हरिनामाचे चिंतनें । बारा वाटे पळती विघ्नें ॥
तुका म्हणे हरी । कांहीं उरों नेदी उरीं ॥ १

सुखशांत्यर्थ मनुष्य कितीहि इतर तजविजी किंवा हिकमती करो, ईश्वरभक्तीवांचून खरी सुखशांति त्याला प्राप्त होणें नाहीं, हा सर्व धर्मांचा सिद्धांत आहे. तो मनांत आणून परमात्म्याचे ठिकाणीं भावबळानें जे एकरूप होऊन रहातील त्यांना मग अंतःशांति, बहिःशांति शाश्वत शांति, अशी सर्वत्र शांतीच शांति प्राप्त होईल. शांति प्राप्त झाली कीं सुख तिचेपाशीं ठेविलेंच आहे. भगवंतानींहि सांगितलें आहे कीं—

( श्लोक )

तमेव शरणं गच्छ । सर्वभावेन भारत ॥
तत्प्रसादात्परांशांतिं । स्थानं प्राप्स्यासि शाश्वतं ॥ १

भावार्थः—हे अर्जुना, सर्व भूतांना स्वमायेनें रहाटावरील गाडग्याप्रमाणें फिरविणारा जो हृदयस्थ परमेश्वर आहे त्यालाच तूं सर्वात्मना शरण जाऊन प्रसन्न करून घे. म्हणजे त्याचे प्रसादानें तुला सर्वोच्च शांति प्राप्त होऊन आढळपद मिळेल. व तूं सर्व बंधांपासून मुक्त होशील. *

---

* मुळांत या ठिकाणीं लबक साहेबानीं असें म्हटलें आहे कीं, मन मेहनतीनें कमाविलें असतां फार तर कामादि विकार व अपवित्र विचार यांपासून मुक्त होईल. तथापि, त्याच्यानें पार्थिव बंध-विनिर्मुक्त होतां यावयाचें

( टीप पुढें चालू )

( टीप मागील पृष्ठावरून पुढें चालू )

नाहीं. साहेबांचें हें म्हणणें जडवादाचें ग्रस्थ असलेल्या इंग्लडांतील विद्वानालाच शोभणारें आहे. आमचे उपनिषदांचा सिद्धांत याहून वेगळा आहे. " ज्ञात्वा देवं सर्वपाशापहानिः ।" म्हणजे, देवाचें किंवा आत्मरूपाचें ज्ञान झाल्यानें यावद्बंधांपासून सुटका होते, असा तेथें अभिप्राय आहे. आणि तोच खरा आहे. म्हणून आह्मी या ठिकाणीं लबक साहेबांचा अनुवाद करीत न बसतां आपले शास्त्राचाच अभिप्राय दिला आहे.

यतोऽभ्युदयनिश्रेयससिद्धिः स धर्मः ।

**—वैशेषिक दर्शन**

**भावार्थः**—ज्याच्या आचरणानें ऐहिक सांसारिक सर्व सुखांची प्राप्ति होते व ज्यानें पारमार्थिक मोक्षसुखहि मिळतें, तो धर्म.

धर्मं चर । धर्मान्न प्रमादितव्यम् ।

**—तैत्तिरीयारण्यक**

**भावार्थः**—वावांर. धर्माचरण करा. धर्माचरणाची हयगय केव्हांहि करूं [illegible].

धर्मो रक्षति रक्षितः ।

**भावार्थः**—धर्माचें आपण आधीं रक्षण करावें तेव्हां तो आपलें रक्षण करितो.

( श्लोक )

धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभि भवत्युत ।
अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ॥ १
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय । जायते वर्णसंकरः ।
संकरो नरकायैव । ... ... ... ॥ २

**—श्रीमद्भगवद्गीता**

**भावार्थः**—धर्म नाहींसा झाला म्हणजे सर्वच कुटुंबावर अधर्माचा पगडा बसतो. आणि अधर्माचा पगडा बसला म्हणजे कुलांतील स्त्रिया बिघडतात. स्त्रिया बिघडल्या कीं वर्णसंकर माजतो. आणि वर्णसंकरानें अखेर नरकप्राप्ति होते.

# प्रकरण १७

## धर्म

धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ।
लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पन्ति ।
धर्मेण पापमपनुदति ।
धर्मे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदंति ॥

—**नारायणोपनिषद्**

**भावार्थः**—धर्म हा या अखिल विश्वाचा आधार आहे. लोकांत जो धर्मशील राजा असतो अशा भोंवतीं प्रजाजन प्रेमानें जमतात. धर्मयोगानेंच पापापहार होतो. सर्व कांहीं धर्माचे आश्रयावर उभें आहे आणि म्हणूनच धर्माला सर्व वस्तूंत परमश्रेष्ठ असें म्हणतात.

जलपर्यटण करीत असतां अकस्मात् गलबत फुटून मध्येंच एका अपरिचित रानटी प्रदेशांत जाऊन पडणारा प्रवासी व या अफाट विश्वरूप अज्ञात प्रांतांत जन्मद्वारा एकदम येऊन थडकणारा मनुष्य प्राणी, या दोघांची अवस्था सारखीच. त्या उतारूला जसें आपण कोठें आलों व आतां कोठें जावें, मार्ग कोणता व तो कसा क्रमावा, हें न कळल्यानें तो गोंधळांत पडून व्याकूळ होऊन जातो, त्याचप्रमाणें मनुष्यालाहि आपण आलों कोठें व पुढें जावयाचें कोठें व करावयाचें काय, हें न समजल्यामुळें भोंवऱ्यांत सां-

पडल्यासारखें व्हावें, हें स्वाभाविकच आहे. परंतु, तो उतारू जर जेथें शहाणे लोकांची सत्ता व व्यवस्था आहे अशा स्थळीं लागला असेल तर त्याला ठिकठिकाणीं मार्ग सांगणारे उदार लोक आढळतात. निदान मार्गदर्शक स्तंभ दिसतात, व त्यांचे साह्यानें तो आपण आलों कोठें, जावयाचें कोठें, या गोष्टींचा उलगडा पाडून घेऊन सुखी होतो. त्याच प्रकारें मनुष्यप्राणी हा ज्या देशांत सुशिक्षित लोक आहेत व शास्त्रादि व्यवस्था आहेत, अशा ठिकाणीं जन्मास आला असतां त्याला वरील साधनांचे योगानें आपण आलों कोठें, आपणास करावयाचें काय व जावयाचें कोठं ह्या गोष्टी नीट समजून येऊन तो संशयावर्तांत पडत नाहीं. आणि उद्दिष्ट स्थल व तत्प्रापक मार्ग या दोहोंचें सम्यक् ज्ञान असलें म्हणजे मग मार्ग जर कांहींसा बिकट असला आणि प्रवासहि दूरचा असला तरी मनुष्याला त्याची विशेष क्षति वाटत नाहीं; पण जावें कुठें व कसें हेंच कळलें नसलें म्हणजे मात्र त्याचे बुरे हाल होतात; याच रीतीनें मनुष्याला इहलोकीं प्राप्य काय व त्याचें साधन कोणतें हें स्पष्ट समजलें असतां त्याचें बारा आणे काम झालें असें समजावें. वाटसरू आपल्या पायांनीं चालावयास कबूल असतो, पण त्याला सम्यक् मार्गदर्शकच

व्हावा असतो. कारण, तदभावीं त्याचे अंगीं गतिसामर्थ्य असूनहि तें विफल होतें, व म्हणूनच तो मार्गदर्शक मिळाल्यास त्याचा फार आभारी होतो. याचप्रमाणें ज्या देशांतील मनुष्यांना असले प्रामाणिक मार्गदर्शक उपलब्ध असतील ते खरेच दैवाचे; आणि त्यांनीं त्या मार्गदर्शकांचे मनःपूर्पक आभार मानिले पाहिजेत; न मानिल्यास ते कृतघ्न होत.

इतर देशांचें आह्मी बोलत नाहीं; पण निदान आर्यभूमींत किंवा हिंदुसमाजांत जन्मास येणारा मनुष्य तरी या बाबतींत निखालस विशेष भाग्यवान् आहे. कारण, परम कारुणिक ऋषि व शास्त्रकार यांनीं त्याचा रस्ता इतका साफ चोखाळून ठेविला आहे कीं त्यानें बेधडक चालूं लागावें. विचारपूस करण्याचें देखील त्याला कारण नाहीं. त्याचे मार्गावरच मोठाले खांब पुरून त्यावर अंधळ्यानें वाचावीं इतकीं ठळठळीत अक्षरें कोरून ठेविलीं आहेत. ह्या खांबांचीं नांवें:— १. धर्म, २. अर्थ, ३. काम, ४. मोक्ष हीं होत. व तीं यथाक्रमच लिहिलीं आहेत. त्यांत व्यत्यास मुळींच नाहीं. यांचे धोरणानें मनुष्य चालला म्हणजे आयताच त्याचें जें " परमधाम " आहे तेथें जाऊन तो पोंचावा अशी योजनाच केलेली आहे. इतकी बिनचूक रस्त्याची आंखणी किंवा इतकी

निभ्रांत व्यवस्था अन्य देशांत किंवा अन्य लोकांत केलेली आढळत नाहीं. यासाठीं या आर्यभूमींत व विशेषतः हिंदु समाजांत जन्मास येणें हें मोठ्याच पुण्याईचें फल आहे, असें आह्मांस तरी वाटतें.

आतां या व्यवस्थेचें महत्त्व किती व कसें व हिला काय म्हणतात, तें आपण पाहूं. ह्या व्यवस्थेला " चतुर्विध–पुरुषार्थ–व्यवस्था " असें म्हणतात. **पुरुषार्थ म्हणजे** जन्मास आलेल्या पुरुषानें किंवा मनुष्यानें ( स्त्री वा पुरुष ) प्राप्त करून घेण्याच्या वस्तु. ह्या सर्व ज्ञात्यांच्या मतैक्यानें चारच ठरल्या आहेत. पण या एकएक इतक्या व्यापक आहेत कीं त्या चहूंनीं सर्व ब्रह्मांड कवळलें आहे. या चहूंपैकीं धर्माचा ज्येष्ठमान आहे. आणि तो यथार्थच आहे. त्याची व्याप्ति किती आहे हें " धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा " या उपनिषद्वाक्यावरूनच लक्षांत येईल. अर्थाचें महत्त्व व व्यापकता संसारी जीवांना विज्ञातच आहे. तिसरा पुरुषार्थ काम. हाहि पशुपक्ष्यांपर्यंत कसा व्यापून आहे व सृष्टीच्या परंपरेला आधारभूत कसा आहे हें अल्पविचारानें समजणारें आहे. या तिन्ही पुरुषार्थांना मिळून ' त्रिवर्ग ' असें एकवट नांव दिलें आहे. आणि चौथा अर्थ जो ' मोक्ष ' त्याला तदपे-

क्षेनें ' अपवर्ग ' अशी संज्ञा आहे. या मोक्षालाच ' परम गति ' असें म्हणतात. अर्थात् हा गांठला म्हणजे गति किंवा प्रवासच खुंटतो, व मनुष्य शाश्वत विश्रांतीचे स्थळीं पोंचतो. मग प्रवासाचें लफडें त्याच्या मागचें सुटतें व म्हणूनच याला ' मुक्ति ' असेंहि म्हणतात.

'हत्तीचे पायांत साऱ्यांचे पाय' अशी म्हण आहे; त्याचप्रमाणें चतुष्पाद * धर्माचे पोटांत बाकीचे पुरुषार्थ. धर्माचें अग्रणीत्व वर सांगितलेंच आहे व तें यथार्थहि आहे. " धर्मादर्थश्च कामश्च " म्हणजे अर्थ व काम हे धर्मापासूनच प्राप्त होतात व तसे जर ते होत नसतील तर ते इष्ट नव्हत, असा आमचे शास्त्राचा स्पष्ट अभिप्राय आहे. जो अर्थ धर्मतः मिळविला नसेल तो अनर्थमूल समजावा. कामाची तीच व्यवस्था. श्रीकृष्ण गीतेंत म्हणतात कीं:—

( श्लोकार्ध )

धर्माऽविरुद्धो भूतेषु । कामोऽस्मि भरतर्षभ ॥

**भावार्थः**—हे अर्जुना, धर्माला प्रतिकूल नसणारा जो भूतांचे ठिकाणीं कामविकार दिसेल तेवढा मात्र मी. ( तदितर विकार केवळ पशुवृत्ति होय. )

यथाधर्म म्हणजे विहितकालीं स्वस्त्रीचेच ठिकाणीं पुरविला जाणारा जो काम त्याची योग्यता

---

* चतुष्पात्सकलो धर्मः । —मनुस्मृति

ब्रह्मचर्याचे तोडीची गणली आहे. व म्हणूनच त्याची खुर्ची मोक्षाचे शेजारीं आमचे धर्मकारांनीं मांडिली आहे, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. उरला पुरुषार्थ 'मोक्ष'. हा त्रिवर्गापासून भिन्नवर्णी आहे, तथापि त्याची प्राप्ति धर्मानेंच होणारी आहे. एतावता चतुर्विध पुरुषार्थांत धर्मच ज्येष्ठ व श्रेष्ठहि आहे. इतर अर्थ केवळ त्याचे उपजीवी आहेत.

धर्म दोन प्रकारचा. प्रवृत्तिपर व निवृत्तिपर. आणि अभ्युदय म्हणजे ऐहिक उन्नति व निःश्रेयस म्हणजे पारलौकिक कल्याण, हें त्याचें फल होय. अर्थात् उभय लोकीं सुखदाता एक धर्मच आहे. अर्थ-कामांचा काबू परलोकावर चालत नाहीं. म्हणून मनुष्यमात्रानें प्रथम धर्मसंग्रह करावा अशी शास्त्राज्ञा आहे.

मनूनें धर्माची व्याख्या—

( श्लोक )

वेदः स्मृतिः सदाचारः । स्वस्यच प्रियमात्मनः ॥
एतच्चतुर्विधं प्राहुः । साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥ १

भावार्थः—ईश्वराच्या निःश्वासभूत श्रुति, तदनुसारी मन्वादि स्मृति, शिष्टांचा आचार, व विकल्प असतां आपणास प्रिय असलेला पक्ष, या चार प्रकारचें धर्माचें लक्षण आहे; म्हणजे चार गोष्टींमिळून धर्म होतो.

याप्रमाणें केली आहे. वेद ही प्रत्यक्ष परमे-

श्वराची वाणी, स्मृति ह्या वेदाला अविरोधि अशी पराशरादि ऋषींची वाणी, या उभयांस धरून देशकालानुसार ज्ञात्यांनीं घातलेले परिपाठ, व वैकल्पिक पक्ष असतां आपणांस हितकर असेल तो पक्ष, या चार गोष्टींचा धर्मांत समावेश आहे. तथापि या सर्वांत श्रुति म्हणजे ईशवाणी हिलाच प्राधान्य आहे. इतर तीन गोष्टी तदनुसारी असल्यास ग्राह्य आहेत. अर्थात् धर्म म्हणजे ईश्वरी आज्ञा असा ढोबळ अर्थ धरण्यास हरकत नाहीं. "ईश्वर कशी आज्ञा देतो? त्याला नामरूपच नाहीं, मग तोंड कुठलें?" इत्यादि कुतर्कांना उत्तर देण्याचें हें स्थल नाहीं. शिवाय, भिन्नधर्मीय असले तथापि भूतलावरील ¾ लोक ईश्वराचें अस्तित्व व सगुणत्व कबूल करून, श्रीकृष्ण, झोरास्तर, मनु, बुद्ध, ख्रिस्त, महंमद, इत्यादि रूपांनीं परमेश्वर साक्षात् आविर्भूत होऊन त्यानें मनुष्यप्राण्याच्या इहपरत्र सुखासाठीं कांहीं विशिष्ट नियम घालून दिले आहेत व तोच आपला धर्म असें धरून चालत आहेत. त्याअर्थीं त्या वादांत पडण्याचें तादृश कारण नाहीं. शिवाय धर्म हा ईश्वरप्रणीतच पाहिजे, मनुष्याचा तेथे अधिकारच नाहीं. कारण, मनुष्य हा क्षणजीवी, किञ्चिज्ज्ञ, आपस्वार्थी, व विकारवश असा प्राणी असल्यानें धर्मासारखीं अखिल लोकहितकर व त्रिकालाबाधित तत्त्वें स्थापन

करणें त्याच्या आवांक्याबाहेरचें आहे. आणि म्हणूनच परमात्म्यानें भिन्नभिन्न देशांत भिन्नभिन्न कालीं अपेक्षेनुरूप अवतार घेऊन मनुष्यांत धर्मस्थापना केली आहे; हें मनुष्यजातीचें मोठेंच भाग्य होय. नाहीं तरी धर्म हा ईश्वरोक्तच असणें न्याय्य आहे. कारण, मनुष्याच्या बऱ्यावाईट कर्मांचें फल देणें जर ईश्वराकडे आहे, तर मनुष्याच्या कृतींचें बरेंवाईटपणहि ईश्वराचेच कायद्याप्रमाणें ठरणें जरूर आहे. नाहीं तर ' कायदा करावा मोंगलानें आणि शिक्षा द्यावी इंग्रजानें ' असें वेडें गाणें होईल. राजा हा जर शास्ता आहे तर राजाच कायदेकर्ता पाहिजे, हें कोणीहि समंजस मनुष्य कबूल करील. आणि म्हणूनच परमकारुणिक परमात्मानें मनुष्यांचे तर्कवितर्कांची परवा न करितां वेळोवेळीं स्वांगें धर्मसंस्थापन केलें आहे. हिंदुस्थानांतील लोक इंग्लंडस्थांइतके सुशिक्षित नाहींत, म्हणून इंग्लंडाप्रमाणें येथें ' कॉमन लॉ (सामान्य न्यायतत्त्वें) 'वर न विसंबतां ' कोडिफाइड लॉ ' म्हणजे ' विशिष्ट कलमबंदी कायदा ' करणें जर इंग्रजासारख्या मनुष्यप्राण्याला अवश्य वाटलें, तर ईशतुलनेनें शतमूर्ख अशा एकंदर मानवजातीला स्वतःच व्यवस्थित नियम घालून देणें ईश्वरासहि जरूर वाटावें यांत नवल नाहीं.

एतावता, ' धर्म ' म्हणजे ईश्वराज्ञा हा अर्थ

सिद्ध झाला. व तोच पथ्यकर आहे. तथापि हा अर्थ कांहींसा कृत्रिम किंवा सांकेतिक आहे. ' धर्म ' शब्दाचा साहजिक किंवा यौगिक अर्थ थोडा वेगळा आहे. पण, तोहि मनुष्यानें ध्यानांत वागविणें अत्यंत हितावह आहे. धर्म हा शब्द ' धृ ' म्हणजे ' धारण करणें ' या धातूपासून निघाला आहे. अर्थात् धर्म ही एक धारणा किंवा पकड आहे. म्हणजे प्रत्येकाचे मनानें ग्रहण करण्याची एक वस्तु आहे. जुलमाचे रामरामाची ही गोष्ट नाहीं, आणि म्हणूनच अविंधांप्रमाणें समशेरीचे जोरानें किंवा जुलुमानें इतरांस बाटवून आपल्यांत ओढणें हें सनातन धर्मांत निंद्य मानिलें आहे.

धर्म हा जरी या प्रकारें जबरदस्तीचा विषय नसला तरी त्याची हेळसांड क्षम्य नाहीं. कारण, ' कायद्याचें अज्ञान ही सबब नाहीं (Ignorance of law is no excuse )' असें जर मनुष्यकृत कायद्यांतहि एक बंधन आहे, तर ईश्वरकृत कायद्यांतहि तें असलेंच पाहिजे. आणि म्हणूनच प्रत्येक शुभेच्छु मनुजानें प्रेमानें व खुषीनें धर्मसंग्रह करणें इष्ट आहे. तसें तो न करील तर कष्ट पावेलच पावेल. कारण, कायदा कोणाचाहि मुलाजा करीत नाहीं.

एका ज्ञात्याचें असें म्हणणें आहे कीं, मनुष्या-

ला बरा-वाईट कांहीं तरी * धर्म पाहिजे; निव्वळ धर्मलंड मनुष्य समाजाला भयंकर होय. हें म्हणणें खरें आहे. कारण, धर्म ही मर्यादा आहे. आणि मर्यादा वेडीवांकडी असली तरी अमर्यादेपेक्षां बरी. आगगाडीची सडक नागमोडी असली तरी ती समर्याद असते, व यामुळें आगगाडीपासून वितीवरहि मनुष्य निर्भय उभा राहतो; कारण ती रूळांची मर्यादा सोडून न जाण्याची खात्री असते. परंतु, पायगाडी किंवा मोटार-गाडी दूर पहातांच मनुष्याची मार्गांत त्रेधा होते; कारण या बया कशा जातील त्याचा कांहीं नियमच नाहीं. याचप्रमाणें धर्मलंडापेक्षां कुधर्मी मनुष्य देखील पुरवतात; कारण, त्यांचे वर्तनाला कांहीं तरी ठरावीक मर्यादा असते.

वरील विचारांवरून, समाजाच्या सुरक्षिततेलाहि धर्माची अवश्यकता किती आहे, हें कोणाहि सुज्ञ मनुष्याच्या लक्षांत येईल. यासाठींच आमचे शास्त्रांत, पुराणांत सर्वत्र धर्म, धर्म, धर्म म्हणून टाहो फोडिला आहे. आजकाल कांहीं लोक म्हणतात कीं, 'नीति असली म्हणजे झालें. धर्मावांचून काय अडलें आहे'? परंतु हें त्यांचें म्हणणें विवेकविधुर आहे. कारण,

* Even a bad reilgion is better than no religion.

खिस्तीशास्त्रांतील आदिमाता ईव्ह ही जशी अडामचेंच बरगडीपासून निघून त्याची सहचारिणी झाली, तशीच नीतिहि धर्माची सहचारिणी असून धर्मोद्भवच आहे. अर्थात्, स्त्री जशी पतिप्राणा असते तशीच नीतिहि धर्मोपजीविनीच असणार. पतिवांचून स्त्री जशी विकल आहे, तशीच धर्मावांचून नीतिहि विकल आहे. आपल्यांत म्हण आहे: 'दादा अंगें वहिनी सोयरी'. पण, जिथें दादालाच कोणी विचारीना तेथें वहिनीचा बोज कसा रहावा? आणि कोणी ठेवितो म्हणतील, तर ते चावट समजावे.

याप्रमाणें धर्मविरहित नीतीनें समाज चालेल म्हणणारांचें निराकरण झालें. आतां दुसरा एक बारीकसा घमेंड्या वर्ग आहे. त्याची उमेद अशी दिसते कीं, धर्महि नको आणि नीतीहि नको. केवळ राजशासनानें—एक दंडशास्त्र प्रज्वलित उभें असलें म्हणजे—प्रजातंत्र सुरळीत चालेल. पण, हेंहि म्हणणें भ्रममूलकच समजावें. आणि याचें कारणहि उघडच आहे. कारण सार्वभौमहि राजा झाला तरी मनुष्यच, आणि त्याचे राजपुरुषहि मनुष्यच. अर्थात् ते नियतदेशकालवर्ती व मर्यादित ज्ञानवान् पडले. चोरी उघडकीस येईल तेव्हां ते शासन करणार. परंतु, जगांत हजारों कृत्यें इतक्या गुप्तपणानें होतात कीं, कोणालाहि त्यांचा पत्ता ला-

गत नाहीं. शिवाय, राजपुरुष ज्याला गुन्हेगार ठरवून शासन करितात तो निरपराधी असून खरा रामोशी निराळाच असतो, असेंहि केव्हां केव्हां मागाहून उघडकीस येतें. यावरून राजशासन किती अपुरें आहे हें कोणालाहि कळेल. पण धर्म किंवा ईशशासन यावर हा अपुरेपणाचा दोष कोणालाहि लादतां येणारा नाहीं. कारण, ईश्वर हा सर्वज्ञ, सर्वसाक्षी व सर्वव्यापी असल्यामुळें, त्याचा डोळा चुकवून कोणी कोठेंहि व केव्हांहि एकादें गैरकाम करीन म्हणेल तर तें शक्यच नाहीं. मनुष्याचे डोळ्यांला मनुष्य पट्टे बांधील; पण त्या सर्वचक्षूपुढें तो काय करणार? अर्थात् "देव मला पहातो आहे" ही भावना ज्याचे हृदयाला एकदां दृढ डसली त्याचे वर्तनावर पहारेकरी नको आणि गुप्त हेरहि नको. ईश्वर हा सर्वगामी असल्यानें त्याच्या अस्तित्वाचें स्मरण, कर्त्याला अखंड सावध ठेवून सहजच कुधर्मापासून परावृत्त करीत असतें. आणि म्हणूनच आमच्या मन्वादि स्मृति केवळ पीनलकोडें नसून "धर्मसंहिता" म्हणविल्या जातात. राजशासनांत दुसरेंहि एक कमीपण आहे. त्याचें रूप वेळोवेळीं बदलतें त्याचा कर्ता मनुष्य हा जसा क्षणिक बुद्धीचा, तसें तेंहि हमेष बदलणारें असतें. पूर्वींचे कायद्यांत साठ वर्षांची मुदत होती. ह-

ल्लींच्या कायद्यांत बाराच वर्षांची आहे. असलें खूळ ईश्वरी कायद्यांत नाहीं. तो सनातन आहे; शाश्वत आहे; स्थिर आहे. जेथें घटकेंत एक आणि घटकेंत एक असा प्रकार, तेथं जीवांस सुख कसें व्हावें ? हल्लींचा कर्जाचा कायदा तीन वर्षे झालीं कीं ऋण बुडालें असं सांगतो. अनें राजरोस कचे रुपये घेऊन खाल्ले असतात, पण अ हा कशीं-तशीं तीन वर्षें चोरून-मारून काढितो, आणि चौथ्या वर्षीं कला बेधडक सांगतो कीं तुझें मी कांहीं लागत नाहीं! ही राजनीति कशी सुखावह व्हावी ? परंतु ईश्वराचा कायदा मानणारे जे लोक आहेत, ते चिठ्ठीचपाटी कांहीं नसतांहि आपले बाप—आज्यांचीं ऋणें डोईवाटे भरून 'आपण कृतार्थ झालों' असें आनंदानें समजतील. यावरून राजशासन व ईशशासन यांत महदंतर आहे, हें स्पष्ट झालें. इतकेंच नव्हे, तर धर्मशासन नाहींसें झाल्यास सर्व गप्पाघोळ होऊन जनता दुःखावर्तांत पडेल; आणि हें जाणूनच धर्मरक्षणाविषयीं जगत्पिता फार काळजी घेत असतो. पृथ्वीवर धरणीकंप, अग्निप्रलय, अवर्षण, घोरव्याधी, वगैरे महान् अनर्थ गुजरले तरी परमेश्वर तादृश फिकीर करीत नाहीं; परंतु, धर्माची ग्लानि होऊन अधर्माचें अभ्युत्थान दिसूं लागलें म्हणजे खासा-

स्वारी अंगीं तसदी घेऊन लोकांत येऊन धर्मसंस्थापना करीत जातील अशी खुद्दानीं सररहा कायमची जाहिरातच छापून टाकिली आहे. * यावरून साक्षात् परमात्मा धर्माचें महत्त्व किती मानितात व तें कसें यथार्थ आहे, हें लक्षांत येईल.

धर्माचा साहजिक व सांकेतिक असे दोन अर्थ वर सांगितले आहेत. साहजिक किंवा यौगिक अर्थ धारणा व सांकेतिक अर्थ आज्ञा, चोदना किंवा प्रेरणा असा आहे. या दोहोंचा मिलाफ करून पहातां धर्माला दोन अंगें अवश्य असतात. एक अंतरंग आणि एक बहिरंग. धारणा म्हणजे श्रद्धा किंवा विश्वास. सर्वज्ञ, सर्वशक्ति, सर्वगामी असा ईश्वर म्हणून आपल्या प्रत्येक स्थूलसूक्ष्म कर्माचा सनातन साक्षी, नियंता व फलदाता आहे व त्याचे आज्ञेप्रमाणें वागण्यांतच आपलें कल्याण आहे, इत्याकारक जो दृढ व अव्यभिचारी प्रत्यय किंवा विश्वास हें धर्माचें अंतरंग; व त्या विश्वासबळानें त्या नियंत्याचें

---

* ( श्लोक )

यदा यदाहि धर्मस्य । ग्लानिर्भवति भारत ॥
अभ्युत्थानमधर्मस्य । तदात्मानं सृजाम्यहं ॥ १
परित्राणाय साधूनां । विनाशायच दुष्कृताम् ॥
धर्मसंस्थापनार्थाय । संभवामि युगे युगे ॥ २

—श्रीमद्भगवद्गीता

आज्ञानुवर्तन करणें म्हणजे धर्माप्रमाणें आचरण करणें, हें धर्माचें बहिरंग. एतावता, श्रद्धा आणि आचार हीं दोन अंगें मिळून धर्म सांग होतो. यांतील एक अंग लटकें असल्यास पक्षघात झाला म्हणून समजावें. यासाठीं हीं उभयांगें अविकल ठेवण्याविषयीं प्रत्येक व्यक्तीचा यत्न पाहिजे, तरच इष्टसिद्धि होईल.

धर्माचें प्रभुत्व ईश्वराकडे असण्यांत दोन फायदे मागें दर्शविले. तिसराहि एक मोठाच फायदा या गोष्टीपासून आहे. तो फायदा म्हणजे समाजाचें किंबहुना मानवजातीचें एकीकरण. आजकाल हिंदुस्थानाचे पांची इलाखे एकवट झालेसे आपण कां म्हणूं लागलों ? तर ते एकाच नियंत्याचे सत्तेंत आले म्हणून. याचप्रमाणें धर्मशास्ता ईश्वर हा एकच असून सकल जगत्पिता असल्यामुळें सर्वच मनुष्यें त्याचीं लेंकरें आहेत ही गोष्ट कबूल करणें कोणा मानधनासहि शरमेची वाटत नाहीं. अर्थात् एकपितृत्व आलें तेथें बंधुत्व सहजच आलें. हिंदुधर्मांत जातिभेद आहे तो बरा कीं वाईट हा प्रश्न वेगळा; पण, एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे कीं, एकजातीयता असल्यावर मोठा लक्ष्मीपतीहि शतदरिद्र्याला पंक्तीस घेण्यांत अवमान मानीत नाहीं. युरोपांत जातिभेद नाहींत, पण व्यक्तिभेद कांहीं बाबतींत

येथल्यापेक्षांहि अधिक तीव्र आहेत. असो. मुद्दा हाच कीं, सर्व मानवजातीलाहि मागें-पुढें सुखानें एक होतां येणं शक्य असेल तर तें ईश्वराचें जगत्पितृत्व व अखिल मनुजांचें बंधुत्व सांगणाऱ्या धर्मामुळेंच आहे. आणि म्हणून धर्माची पायरी सामान्य नीति किंवा राजशासन या उभयतांचेहि वरची आहे.

येथवर धर्माची उत्पत्ति, धर्माचें महत्त्व, व धर्माचें मोघम स्वरूप यांचा विचार झाला. आतां धर्माचे विशिष्ट स्वरूपाचा विचार पाहूं. धर्माचें श्रद्धा म्हणून जें अंतरंग पूर्वीं सांगितलें तें अर्थातच गुप्त व स्वसंवेद्य आहे. तें ज्याचें त्यानेंच संभाळावें. मात्र एवढें सांगणें भाग आहे कीं, या अंतरंगावांचून आचाररूपी बहिरंग निवळ दंभ किंवा थोतांड होय. दुसरें जें बहिरंग म्हणजे आचार, तो मात्र लोकदृष्ट आहे; अतएव त्याचा सविस्तर विचार करणें शक्य आहे. आणि म्हणूनच धर्म हा विशेषतः "आचारप्रभव" मानिला आहे. आतां आजकाल भिन्न भिन्न देशांत भिन्नभिन्न लोकांत जे कांहीं असंख्य आचार धर्माचे नांवानें चालू आहेत, ते कालगतीनें इतके विसदृश झाले आहेत कीं, त्यांचें एकीकरण किंवा समर्थन करणें कोणाहि माणसाच्या शक्तीबाहेरचें आहे. कारण, विशिष्ट व्यक्तींचे अहंकार, दुसऱ्या कांहींचे स्वैरा-

चार, कांहींचें अज्ञान, इत्यादि अनेक कारणसंकरानें हे आचार मूळमर्यादेपासून इतके भटकले आहेत कीं, त्यांना पूर्वरूपास आणणें म्हणजे बंगालचे उपसागराजवळचें गंगेचें शतमुखी पात्र आपल्या पिण्याचे झारींत सांठवण्याचा यत्न करण्यासारखेंच असाध्य आहे. याकरितां या असाध्य साधनाचे यातायातींत न पडतां, ज्या गोष्टी कोणत्याहि धर्मांतील, कोणत्याहि पंथांतील, कोणाहि समंजस मनुष्यास सहजवृत्ति मान्य झाल्याच पाहिजेत, अशा आमचे धर्मांत सांगितल्या आहेत, त्यांचाच धर्माचे आचारांगांत आपण विचार करूं.

भगवान् मनूनीं फार चतुराईनें या अमोल गोष्टी एका श्लोकार्धांतच संगृहीत केल्या आहेत. मनु म्हणतातः—

( श्लोक )

अहिंसा सत्यमस्तेयं । शौचमिंद्रियनिग्रहः ॥
एतं सामासिकं धर्मं । चातुर्वर्ण्येऽब्रवीन्मनुः ॥ १

भावार्थः—अहिंसा किंवा दया, सत्य किंवा खरेपणा अस्तेय म्हणजे अचौर्य, शौच म्हणजे अंतःशुद्धि, बहिःशुद्धि, व इंद्रियदमन एवढ्या गोष्टी चारहि वर्णांना धर्म म्हणून सारख्याच लागू आहेत.

मनूनीं आर्यावर्तासाठींच आपली संहिता लिहिली असल्यामुळें स्वाभाविकच त्यानीं हिंदु धर्मांतील चातुर्वण्याचाच उल्लेख केला. परंतु, त्यानीं दिलेल्या गोष्टींकडे पाहिलें म्हणजे त्या हिंदुधर्मा-

तील पोटभेदांनाच सरसकट लागू पडणाऱ्या नसून पृथ्वीवरील यावत् भिन्नभिन्न धर्मांनाहि सारख्याच लागू पडणाऱ्या आहेत असें ठरतें. अशीच कांहीं चतुराईनें त्यांची निवड केली आहे. यास्तव हेंच सर्ववादिसंमत व निरपवाद असें मनूक्त धर्मलक्षण प्रमाण घेऊन त्याचे पालनानें जनतेला सुख कसें होईल हें आपण पाहूं.

मानवधर्मांतील पहिली आज्ञा **अहिंसा** ही होय. अहिंसा म्हणजे प्राणघातापासून निवृत्ति असा स्थूल अर्थ आहे. तथापि ज्ञानेश्वरादिकांनीं अहिंसेचे कायिक, वाचिक, मानसिक असे तीन भेद करून, पुनरपि कायिक अहिंसेचे पादेंद्रियसाध्य, हस्तेंद्रियसाध्य व चक्षुरिंद्रियसाध्य असे तीन पोटभेद केले आहेत या सर्व भेदांचें सोपपत्तिक विवरण ज्ञानेश्वरी अध्याय १३ श्लोक ७ यांत पहावें. त्या सर्वांचा संकलित अर्थ घेतां कोणाहि प्राण्याला आपली काया, वाणी किंवा मन यांपैकीं एकाहि द्वारानें पीडा न देणं म्हणजे अहिंसा, असा होतो. कायेनें होणारी हिंसा त्रिविध दिली आहे; त्यांत पायाखालीं कीडमुंगी न तुडवितां चालणें ही पादेंद्रियसाध्या, पशुपक्ष्यांना हातवारे करून न भेवडावणें ही हस्तेंद्रियसाध्या. आतां चक्षुरिंद्रियसाध्या म्हणजे कोणाहि जीवास क्रोधिष्ट मुद्रेनें दटावणें किंवा कोणी

परस्त्र्यादि मनुष्य एकांतांत असतां तिकडे डोळे घालून त्या मनुष्याच्या स्वच्छंदाला उपरोध करणें. ( ज्याला Outraging the modesty व intruding on the privacy of a woman असें आजच्या कायद्यांत म्हणतात ). यापुढें वाचिक हिंसा म्हणजे कोणालाहि दुरुत्तर करणें, किंवा अपमानास्पद अथवा मर्मकृंतक शब्द बोलणें. आणि मानसिक अहिंसा म्हणजे दयालुता किंवा दया, असें ज्ञानेश्वरानीं म्हटलें आहे.

या प्रकारच्या या पांचहि अहिंसांचें या भूतलावरील प्रत्येक मनुष्य जर यथाशास्त्र अवलंबन करील तर आह्मास वाटतें पृथ्वीवरील निम्मे दुःखराशि नाहींसाच होईल. पण खेदाची गोष्ट ही कीं, शेंकडों माणसें इतकीं निर्दय, परवेदनानभिज्ञ व अहंमन्य आढळतात कीं, तीं वरील अहिंसांचे उलट आचरण करीत असून जगतांतील दुःखराशि वाढवीत असतात. कीडमुंगीचा तो पाड काय, पण थोडासा अधिकार येतांच सजातीय मनुष्यप्राण्यांना पायाखालीं तीं तुडवूं लागतात ! साधल्यास आश्रितावर धांवून जाणें, तोंडांत मारणें, ह्यांतहि आळस नाहीं. डोळ्याचे खोडसाळपणाला तर मर्यादाच नाहीं. येथें अधिकार म्हणजे 'सरकारी खुर्ची' असा संकुचित अर्थ समजूं नये. कौटुंबिक, सार्वजनिक, खासगी, सरकारी

यांपैकीं कोणत्याहि संबंधांतील वरिष्ठपण हा त्याचा अर्थ आहे. वाचिक हिंसेचीहि जगांत टंचाई नाहीं. वर्तमानपत्रकारांसारखे सुशिक्षित लोक देखील शिवीगाळीवर येणार, मग नवरा मेल्यामुळें निरुपायास्तव माहेरीं भावाकडे आलेल्या अनन्यगतिक नणंदेचे एकादी ऐश्वर्यमत्त भावजय दर शब्दाला लचके तोडीत असली तर नवल कशाला वाटावें? हरहर! गीतेंत आदेशिल्याप्रमाणें नुसतें अनुद्वेगकर वाक्य जर मनुष्यें बोलत जातील तर किती तरी दुःख हलकावेल. तुकोबा म्हणतात;

(अभंग)

देवापायीं झालें ब्रह्मांड सोईरें ।
कोंवळ्या उत्तरें काय वेंचे ॥

या अभागी हिंदुस्थानावर अनेक रूपांनीं दुःखाचा पाऊस कोसळला आहे, तरीहि मनुष्यें स्वकृतीनें आणखी त्यांत भरच टाकीत आहेत. तेव्हां देवाकडे तरी काय बोल द्यावा? हींच जर मनुष्यें परस्परांशीं सानुकंप वर्तन करतील तर वामनानीं म्हटल्याप्रमाणें—

(श्लोक)

होई वन्हि जळापरी, जलधि हा कीं ओहळाचे परी ।
मेरू स्वल्पशिळेपरी, मृगपती तोहि कुरंगापरी ॥
कीं तो सर्प फुलापरी विषजळें पीयूषवृष्टीपरी ।
होतें सर्वहि यापरी, वसतसे सच्छील ज्याचे घरीं ॥ १

अशी सुस्थिति होईल. पण सच्छीलाचीच माणसांत फार वाण दिसते.

पांचवा प्रकार मानसिक अहिंसा किंवा दया. हिचें महत्त्व काय वर्णावें! "नास्ति धर्मो दयापरः।" " दया धरमका मूल है " हीं वचनें सुप्रसिद्धच आहेत. "सत्यापरता नाहीं धर्म" हेंहि वचन खरेंच आहे. आणि सत्य हा धर्माचा केवळ प्राणच आहे हें खरें; तथापि, धर्मकारांनीं दयेला सत्याचेंहि वरचा मान दिला आहे. पित्याचें नातें वरिष्ठ खरें; तथापि श्रुतींत आधीं " मातृदेवो भव " आणि मग "पितृदेवो भव" असा क्रम सांगून, मातेला अग्रमान दिला आहे, आणि तो ठीकच आहे. लेंकराचे वाढीस बापाचे रक्षणापेक्षांहि आईच्या वात्सल्याचें अधिक अगत्य आहे; तसाच प्रकार येथें समजावा. सत्य वरिष्ट खरें; परंतु, तें पुष्कळदां कर्कश किंवा निर्दय असतें. सत्य हा सूर्यच आहे. परंतु चोवीस तास सूर्यप्रकाशच राहील तर प्राणीमात्र आहाळून जाईल. त्याला शरीरनिर्वाणयित्री चंद्रिका थोडी तरी मिळालीच पाहिजे. याचप्रमाणें सत्याला दयेची जोड पाहिजे, तरच जीवांचा निभाव लागेल, आणि म्हणूनच परमात्मा आपणास " सत्य " म्हणवितो आणि दयाघनहि म्हणवितो; किंबहुना दीनदयाल म्हणवून घेण्यांत त्याला अधिक मौज वाटते.

असो; या प्रकारें "अहिंसा" ही पहिली धर्माज्ञा हिचें पालन प्रत्येक मानवानें केल्यास सुखाची समृद्धि कशी होईल हें दाखविलें.

दुसरी आज्ञा "सत्य". आमचे श्रुतींत सत्याचें फारच मोठं स्तोत्र केलें आहे. तैत्तिरीय श्रुति म्हणतेः

सत्येन वायुरावाति । सत्येनादित्यो रोचते दिवि । सत्यं वाचः प्रतिष्ठा । सत्ये सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्सत्यं परमं वदंति ॥

भावार्थः—सत्यानेंच वारा वाहतो. सत्यानेंच आकाशांत सूर्य प्रकाशतो. सत्य हाच वाग्व्यवहाराला आधार आहे. किंबहुना सत्याचेच आश्रयावर सर्वकांहीं स्थिर आहे. आणि म्हणूनच, सत्याला सर्वश्रेष्ठ असें म्हणतात.

या स्तोत्रांत तिळमात्रहि अतिशयोक्ति नाहीं. अमुक ऋतूंत अमुक दिशेनें वारा यावयाचाच असें नियमानें अनुभवास येतें. लष्करांतली तोफ शहरांत ऐकू येते हें वायूचे शब्दवाहनविषयक सत्यच नव्हे काय? सूर्याचे अस्तोदयकाल किंवा आजपासून शंभरवर्षांपुढील सूर्यग्रहणें ज्योतिषी देऊं शकतो, हें सूर्याचे ठिकाणचे सत्याचे आधारानें नव्हे, तर कशानें? वायु-सूर्याचाच दृष्टांत मनुष्यवर्ज्य इतर चराचर विश्वाला लागतो, असें प्रत्येक विचारी मनुष्यास आढळेल. चंद्राची क्षयवृद्धि, समुद्राची भरती-ओहोटी, ऋतूंचे पालट, इत्यादि गोष्टी नियमित काळीं होतात, त्या अर्थी त्या

सत्यप्रेरित कां म्हणूं नये ? चुलीवर तपेली ठेवू-न द्यावी, भात शिजून राहतो; खडकवासल्याचें पाणी कालव्यानें बारा कोसावर जातें; हीं अग्नीचे अंगची पाचकता व जलाचे अंगची निम्नप्रवणता-रूपी सत्याचींच उदाहरणें नव्हत, तर काय ? चरकानें सांगितलेला काढा आजहि गुण देतो, याचें कारण धने-सुंठीनें आपापलें सत्य सोडिलें नाहीं हेंच होय. जो कुणबी चिमणीला चोंचभर दाणा घालीत नाहीं तो मणावारी बियाणें काळे रानांत फेकून येतो, ह्या त्याचे औदार्याला उत्तेजक काय असावें ? आपल्या ठिकाणी विश्वासानें ठेविलेल्या एक दाण्या ऐवजीं मापटेंभर दाणे त्या कुणब्याला परत देण्याचें आमचे धरित्रीमातेचें सत्यव्रतच नव्हे काय ? कोणी कसाहि पाखंडी असला तरी या सर्व प्रश्नांस अस्तिपक्षींच उत्तर देणें त्याला भाग आहे.

आतां मनुष्यांतील सत्य पहा. त्याला फार श्रम नकोत. न्यायाचे कोर्टांत त्याचें प्रत्यहीं प्रदर्शन आहेच. प्रतिपक्षी वकील म्हणतो, ' होय, वादीचें म्हणणें खरें आहे; परंतु माझी मुदतीचे मुद्यावर हरकत आहे'. राम राम! व्यवहारांतहि हाच प्रकार. बाप, भाऊ, गुरु, साधु म्हणून बाया-बापड्यांनीं विश्वासानें काळोख्या रात्रीं एकादी वस्तु आणून ठेवावी आणि पुढें मागावयास यावें तो ' भोजनं मम जीर्यतां ' हा उद्गार कानीं येतो.

हें उत्तर ऐकून त्या दीनबाईचा काय बरें तळतळाट होत असेल ? पण तिकडे लक्ष्य कोण देतो ! स्वार्थापुढें सत्य कशाचें ? मनुष्यमात्राचे ठिकाणीं अढळ सत्य असतें, तर किल्लयाकुलुपांचे, चिरेबंदी भिंती घालण्याचे, लोखंडी तिजोऱ्या घेण्याचे, संत्री-पहारे ठेवण्याचे, असे हजारों खर्च वांचून तो पैसा सत्कार्यीं लावावयास सांपडला असतां; व इतके बंदोबस्त करूनहि द्रव्यवानाला स्वस्थ झोंप येत नाहीं, तसें झालें नसतें. पण, सुधारणा होत आहे तों तों सत्यावर कुऱ्हाड बसते आहे ! एकाच कुळानें स्वदस्तुरचे दोन रोखे दोन सावकारांना दिले आहेत, परंतु पहिल्याचा नोंदला नाहीं आणि दुसऱ्याचा नोंदला आहे; एवढ्यासाठीं पहिल्यानें 'हरि हरि' म्हणत बसावें हे सत्याचे मासले आजकाल सुरू झाले आहेत. याचें कारण धर्माविषयीं अनास्था हेंच होय.

आजकाल ब्राह्मणादि श्रेष्ठ म्हणविणाऱ्या जातिहि न्यायासनासमोर निःशंक असत्य भाषण करितात. हें पाहिलें आणि मनुस्मृतीचा काल पाहिला म्हणजे सांप्रतचे अवनतीबद्दल फार फार वाईट वाटतें. न्यायासनासमोर आलेल्या चतुर्वर्णांना शपथ देण्याचे प्रकार मनुस्मृतींत ( अ० ८ श्लो० ८८ ) दिले आहेत:—

( श्लोक )

ब्रूहीति ब्राह्मणं ब्रूयात् । सत्यं ब्रूहीति पार्थिवम् ॥
गोबीजकांचनैर्वैश्यं । शूद्रं सर्वैस्तु पातकैः ॥ १

**भावार्थः**—साक्षीदार जर ब्राह्मण असेल तर त्याला केवळ 'बोल' ह्या शब्दानेंच प्रश्न करावा. तो क्षत्रिय असेल तर 'सत्य बोल' असें म्हणावें. तो वैश्य असल्यास 'तूं असत्य बोलल्यास गाय, बीज व सुवर्ण यांचा अपहार केल्याचें पाप तुला लागेल' अशी धमकी देऊन विचारावें, आणि तो शूद्र असल्यास 'खोटें बोलल्यास सर्व पापें तुझे माथीं बसतील' असें त्यास बजावावें.

यावरून पहातां, ब्राह्मणाला नुसतें 'बोल' म्हणणेंच सत्य सांगण्यास पुरे होतें. म्हणजे ब्राह्मण जें बोलेल तें सत्यच बोलेल, त्याला तूं " सत्य बोल " म्हणून निराळें सुचविण्याचेंहि कारण नव्हतें. आणि आजचे ब्राह्मण " मी देवाला स्मरून खरें बोलेन, खोटें बोलणार नाहीं " इत्यादि दिव्यें करूनहि धडाधड खोट्या साक्षी देतात. ही जर श्रेष्ठ वर्णाची सत्यप्रियता, तर इतरांस काय बोलावें ? आणि इतपत ज्या समाजांत सत्याची ओळख बुजाली त्या समाजाला विपत्ति आल्यास देवाकडे काय बोल ?

तिसरी आज्ञा "अस्तेय" म्हणजे चोरी न करणें, परद्रव्य, परदारा इत्यादिकांचे अपहरण न करणें. खरें पहातां यांचा अंतर्भाव सत्यांतच होऊं शकेल. आपणांत जेव्हां कोणाहि मुलामुलीचा वि-

वाह होतो, त्या वेळीं जातींतील चार शिष्ट बोलावून "साक्षी विडे" देण्याची चाल आहे. यांतील रहस्य असें आहे कीं, "ही मुलगी याच मुलाची अनन्यसाधारण अशी मिळकत आजपासून झाली". या करारावर प्रतिनिधिद्वारा सर्व जातीच्या सहीसाक्षी या विधीनें घेतल्या जातात. अर्थात्, अशा मुलीशीं जर कोणी असव्द्यवहार करील तर तो सत्यापलापक किंवा खोट्या प्रतिज्ञेबद्दल दोषी होईल आणि सर्व जर सत्य पाळतील तर त्या मुलीला अमार्गगामी होतांच येणार नाहीं; म्हणजे सत्यपालनांत अस्तेय आलें.

तथापि, व्यवहारदृष्ट्या तें पृथक् करून सांगितलें आहे. स्वकष्टानें द्रव्य मिळवून त्यावर निर्वाह करणें हा धर्म होय. दुसऱ्याच्या श्रमाचें त्याचे असंमतीनें घेणें म्हणजे मोठाच विश्वासघात आहे. आणि विश्वास-घाताला शास्त्रांत यावच्चंद्रदिवाकरौ नरक सांगितला आहे. आपला कोणीं विश्वासघात केला म्हणजे कसें काळीज तळतळतें? असेंच परक्याचेंहि होतें, हें जाणून न्यायार्जितानेंच उदरभरण करावें अशी धर्माज्ञा आहे. व ही सर्व पाळतील तर सध्यां कांहीं हिंदु कुटुंबांत एकानें मरमर मरावें आणि बाकीच्यांनीं त्याच्या जीवावर निःशंक चैन करावी हा जो अशास्त्रसं-

मत व समाजोत्कर्षाला घातक प्रकार पडला आहे तोहि बंद होईल. असो.

चौथी आज्ञा "शौच" म्हणजे स्वच्छता, शुद्धता, पवित्रता. हिचे प्रकार दोनः—अंतःशौच किंवा मनः-शुद्धि आणि बहिःशौच किंवा बाह्यशुद्धि. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे सहा मनाचे मळच समजावे; आणि या साहींपासून मन अलिप्त असणें, त्याचप्रमाणें अनृतापासून व कुविचारापासून मन अलग ठेवणें हें अंतःशौच होय. आणि वस्त्र, पात्र, अन्न, जल व आपल्या संसर्गाच्या यावत् वस्तु निर्मल राखणें हें बहिःशौच होय. इंग्रजींत एक म्हण आहे कीं, " स्वच्छता हा ईश्वरी गुण आहे " तें खरेंच आहे. बाह्यवस्तूंत अंतर्वृत्ति बदलण्याचें सामर्थ्य आहे. फुलबागांतून चालतांना मन जसें प्रफुल्ल होतें व गटारदुर्गंधींतून जातांना मन जणू कोंडतें किंवा संकोच पावतें, हा सर्वांचाच अनुभव आहे. तंबाखू खाणारा झाला तरी घाणीचा कोंपरा पाहूनच पिचकारी मारतो; स्वच्छ जागीं त्याच्यानें थुंकवत नाहीं. सुंदर व स्वच्छ वस्तूची सहसा पायमल्ली करवत नाहीं. याचा अर्थ वस्तुगत बाह्यस्वच्छतेचा अंतःकरणावर थोडा तरी परिणाम होतोच होतो; व म्हणूनच शास्त्रकारांनीं बाह्य व आंतर असें उभयविध शौच सांगितलें. स्वच्छते-

मुळें आरोग्य व दीर्घायुता प्राप्त होते हें सर्वसंमतच आहे. शिवाय, पवित्र जागीं विचारहि बहुधा पवित्रच येतात, आणि पवित्रता आणि पुण्य हीं एकच होत. कारण, जें पुनीत किंवा पवित्र करितें तें पुण्य व जें अधःपातन किंवा ऱ्हास करितें तेंच पातक होय. आणि यास्तवच, पुण्यानें आयुष्य वाढतें व पापानें घटतें हें जुन्या माणसांचें म्हणणें कांहीं तरी नव्हे, हें सर्वांनीं लक्षांत ठेवावें. स्वच्छस्थळीं मनहि प्रसन्न रहातें, हा सर्वांचा अनुभव आहे; आणि मनःप्रसाद आहे तेथें सुख आहेच. किंबहुना, मनःप्रसाद म्हणजेच सुख.

अंतःशौचाची योग्यता अर्थातच बहिःशौचाहून अधिक आहे. तें नसेल तर बाह्य झळफळ म्हणजे ठकबाजीच समजावी. अंतःशुद्धिकर गोष्टींत ज्ञान हें अग्रगण्य आहे. म्हणूनच " नहि ज्ञानेन सदृशं पवित्र–( पावन करणारें ) मिह विद्यते ।" असा **भगवंताचा** शेरा आहे. या कामीं सत्याची पायरीहि शेजारींच आहे. **भगवान् मनु** म्हणतातः—

( श्लोक )

अद्भिर्गात्राणि शुद्ध्यंति । मनः सत्येन शुध्यति ॥
विद्यातपोभ्यां भूतात्मा । बुद्धिर्ज्ञानेन शुध्यति ॥ १

**भावार्थः**—जलानें अंगें शुद्ध होतात; सत्यानें मन शुद्ध होतें; विद्या व तप यांचे योगानें जीवात्मा शुद्धि पावतो व ज्ञानानें बुद्धि निर्मल होते.

याशिवाय अंतःशुद्धि व बहिःशुद्धि करणाऱ्या वस्तु मनूनीं दुसऱ्या एका श्लोकांत सांगितल्या आहेत त्याहि ध्यानांत ठेवण्याजोग्या आहेत.

( श्लोक )

ज्ञानं तपोऽग्निराहारो । मृन्मनो वार्युपाञ्जनम् ॥
वायुः कर्मार्क कालौच । शुद्धेः कर्तॄणि देहिनाम् ॥ १

भावार्थः—ज्ञान, तप, अग्नि, हविष्यान्न, मृत्तिका, मन, उदक, सडासंमार्जन, वायु, यज्ञकर्म, सूर्यदर्शन व काल हीं सर्व मनुष्याचे शुद्धीचीं साधनें आहेत. यांहीपलीकडे भगवद्भक्ति हें मोठेंच शोधक आहे.

भगवान् गीतेंत म्हणतातः—

( श्लोक )

अपि चेत्सुदुराचारो । भजते मामनन्यभाक् ॥
साधुरेव स मंतव्यः । सम्यग्व्यवहितोहि सः ॥ १
क्षिप्रं भवति धर्मात्मा । शश्वच्छांतिं निगच्छति ॥
... ... .. ... ॥ २

म्हणजे, भगवद्भक्तीनें अधम पापीहि शुद्ध होऊन शाश्वत शांतिसुखाला मिळतो.

श्लोकक्रमांत शेवटली धर्माज्ञा म्हणजे इंद्रियनिग्रह. कोणी सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन करील तर त्यास असें आढळून येईल कीं, मानवी व्यवहारांतील हजारों हजार अनर्थ इंद्रियांच्या अनिग्रहामुळेंच उद्भवतात. कारण, इंद्रियें हीं मोठीं दांडगीं आहेत. तीं किंचित् सैल सोडतांच मनाला खेंचून नेऊन विषयांचे खड्ड्यांत पाडितात. या-

साठीं शहाण्यानें तीं स्वाधीन ठेवावीं म्हणजे त्याला विपत्ति येत नाहीं. शंकराचार्य विवेक-चूडामणींत म्हणतातः—

( श्लोक )

शब्दादिभिः पंचभिरेव पंच ।
पंचत्वमापुः स्वगुणेन बद्धाः ॥
कुरंग–मातंग–पतंग–मीन– ।
भृंगा नरः पंचभिरंचितः किं ॥ १

भावार्थः—श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा आणि घ्राण यांपैकीं एकएक इंद्रियाचें अनावरपणामुळें शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या त्यांच्या विषयांकडे आकृष्ट होऊन हरिण (शब्दानें), हत्ती ( स्पर्शानें ), पतंग ( रूपलोभानें), मीन ( जिव्हालौल्यानें), व भृंग (घ्राणलौल्यानें) नाश पावले आहेत;आणि हे मनुष्या, तुझीं तर हीं पांचहि इंद्रियें अनावर आहेत, तेव्हां तुझी दशा काय होईल, याचें त्रैराशिक तूंच मांडून पहा.

सारांश, सुख-शांति पाहिजे तर इंद्रियनिग्रह अत्यावश्य आहे, हें जाणूनच स्मृतिकारांनीं त्याचा धर्माज्ञेंत संग्रह केला आहे.

मनूक्तींत थोडीशी भर घालून याज्ञवल्क्यानीं धर्म सांगितला आहे—

( श्लोक )

सत्यमस्तेयमक्रोधो । व्हीः शौचं धीर्धृतिर्दमः ॥
संयतेंद्रियता विद्या । धर्मः सर्व उदाहृतः ॥ १

यांत व्ही ( मर्यादा ), धी ( सद्बुद्धि ), धैर्य,

दम व विद्या ह्या गोष्टी अधिक आहेत, तरीहि त्या कोणत्याहि देशांतील कोणत्याहि धर्माला अग्राह्यशा नाहींत. तिसऱ्या एकानें,

( श्लोक )

अहिंसा सत्यमस्तेयम कामक्रोधलोभता ॥
भूतप्रियहितेहाच । धर्मोयं सार्ववर्णिकः ॥ १

यांत 'प्राणिमात्राचे कल्याणाची इच्छा' एवढी गोष्ट मनूपेक्षां अधिक घालून, हा सर्वहि वर्णांना सारखाच लागू पडणारा धर्म आहे, असें म्हटलें आहे.

लोकप्रिय भर्तृहरींनींहि मनूंची अनुवृत्ति थोड्या फरकानें केली आहे. तिचा वामनी तर्जुमा असा आहे:—

( श्लोक )

वाणी खरी, दान वरें, अहिंसा ।
नसे परद्रव्य–सती–पिपासा ॥
दया, अतृष्णा, नतिभाव जो कां ।
सन्मार्ग हा धोपट सर्व लोकां ॥ १

या धोपट मार्गानें जर प्रत्येक मनुष्य चालेल, तर जगांत सुखाला आजच्याइतका खास तुटवा पडणार नाहीं. आणि धर्मश्रद्धा प्रबळ झाली म्हणजे तिच्या अंगभूत असणाऱ्या या गोष्टींचा प्रचार आपोआपच वाढतो, त्याला निराळे श्रम नकोत; म्हणून प्रत्येक ज्ञात्यानें सद्धर्मप्रचारार्थ झटावें.

परीत्य भूतानि परीत्य लोकान् परीत्य सर्वाः प्रदिशो दिशश्च
उपस्थाय प्रथमजामृतस्यात्मनात्मानमभिसंविवेश ॥

—यजुर्वेद

**भावार्थः**—जें ब्रह्म आकाशादि महाभूतांस, तसेंच सूर्यादि लोकांस व सर्व दिशा-उपदिशांस व्यापून राहिलें असून जें सत्यस्वरूप आहे, व जें सर्वांआधींचें आहे, त्याची जो जीव अंतःकरणपूर्वक उपासना करितो, त्याला त्याचें ज्ञान होतें व ब्रह्मप्राप्ति होऊन मोक्षसुखाचा अनुभव मिळतो.

महद्यक्षं भुवनस्य मध्ये तपसि क्रांतं सलिलस्य पृष्ठे ।
तस्मिञ्छ्रयन्ते य उ के च देवा वृक्षस्य स्कन्धः परीत इव शाखाः ॥

—अथर्व वेद

**भावार्थः**—जें सर्वांहून मोठें, सर्वांस पूज्य, सर्व भुवनांत भरून राहिलेलें, ज्ञानांत पूर्ण व सर्व कार्यरूप जगताचे पाठीवर राहणारें ( पुरून उरणारें ) तें ब्रह्म होय. वृक्षाच्या बुंध्याच्या आधारानें जशा शाखा सर्वतः पसरतात, त्याप्रमाणें सर्वहि या ब्रह्माचे आधारानें रहातात.

( श्लोक )

यल्लाभान्नापरोलाभो । यत्सुखान्नापरं सुखं ॥
यज्ज्ञानान्नापरं ज्ञानं । तद्ब्रह्मेत्यवधारय ॥ १

**भावार्थः**—ज्याच्या लाभाहून अधिक श्रेष्ठ असा दुसरा लाभ नाहीं, ज्याच्या सुखाहून अधिक उंची दुसरें सुख नाहीं, व ज्याचे ज्ञानाहून श्रेष्ठतर असें ज्ञान नाहीं, तेंच ब्रह्म असें समज.

# प्रकरण १८

## ब्रह्मविद्या

निर्दोषं हि समं ब्रह्म । —**श्रीमद्भगवद्गीता**

**भावार्थः**—ब्रह्म हें दोषरहित व वैषम्यरहित आहे.

यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमास्ति भूमैव सुखं भूमात्वेव विजिज्ञासितव्य इति ।

—**छांदोग्य उपनिषद्**

भावार्थः—**सनत्कुमार नारदास** म्हणतातः बाबारे, खरें सुख म्हणशील तर जें भूमा म्हणजे अफाट असें ब्रह्म तेंच आहे. अल्प जो जीव त्याचे ठिकाणीं सुख नाहीं. ब्रह्मच सुख आहे. म्हणून ब्रह्माचें ज्ञान करून घ्यावें.

पाण्याचे अंगीं आपली मूळ उंची शोधण्याची प्रवृत्ति दिसते, त्याचप्रमाणें मनुष्याला कोणत्याहि गोष्टीचे मूळ धुंडण्याचा नाद दिसतो. नाद म्हणण्यापेक्षां त्याला ही अंतःप्रेरणाच आहे, असें म्हणणें बरें. कारण त्याला अनिच्छयाप्रवृत्त व्हावें लागतें. बाहेर हवा खात असतां अंगावरून सुगंधी वारा गेला, तर मनुष्य विवश झाल्याप्रमाणें पटकन् मान मुरडून तो सुगंध कोणत्या स्थळाहून व कोणत्या वृक्षापासून किंवा वस्तूपासून आला असावा, हें पाहूं लागतो. व त्याचा उगम समजला नाहीं तर त्याचें पाऊलच पुढें पडत नाहीं, निदान तो खट्टू तरी होतो.

महाश्वेतला पुंडरीक या प्रेरणेनेंच दाखविला. महाबळेश्वरीं कृष्णानदीचे देवळांत गोमुखांत वाहणारे पांच-सात झरे दिसले कीं तेवढ्यानें तृप्ति न होतां देवालयाचे भिंतीमागें घुसून डोंगराच्या खबदडींतून जेथून जेथून ते झरे उपटतात ते पहावे तेव्हां मनुष्याचा जीव खालीं पडेल. कथेकऱ्याचें कीर्तन किंवा एकाद्या कलावतीचें गायन, हे तर केवळ श्राव्य विषय आहेत. वास्तविक हे कानीं पडल्यानें काम व्हावें. परंतु नुसत्या श्रवणानें मनुष्याला सुख होत नाहीं. ज्या हरदासाच्या किंवा गायिकेच्या मुखांतून तो ध्वनि निघत असेल तें मुख दृष्टीस पडून, डोळ्याशीं डोळा जेव्हां भिडेल, तेव्हां त्याची तळमळ जिरेल; नाहींतर नुसत्या स्वश्रवणानें त्याचें पोट भरत नाही. त्याच्या उगमाशीं जाऊन ठेपावें तेव्हां त्याला चैन पडतें. असा कांहीं चमत्कार आहे.

या त्याच्या नैसर्गिक अंतःप्रेरणेनें मनुष्याचें फारच मोठें काम केलें आहे. शेंकडों, हजारों, गोष्टी, ज्या त्याला प्रारंभीं गूढ किंवा अज्ञात होत्या, त्यांचा त्यानें उलगडा केला आहे. गंगा, सिंधु, नील सारख्या महानद्यांचे उगम त्यानें शोधून काढिले. युरेनस, नेप्च्यूनसारखे नवे ग्रहांचा पत्ता लाविला. गुरुत्वाकर्षणासारखे नियम उघडकीस आणिले. इतकेंच करून तो थांबला नाहीं; तर या

अनंत चमत्कृतिपूर्ण विशाळ विश्वाचें आदिकारण, तेंहि त्यानें शोधून काढिलें आहे. व यावरून असें खास दिसतें कीं, ही मूलदर्शनोत्कंठा सृष्टिकर्त्यानें संकेतपूर्वकच त्याचे हृदयांत आरोपित केली आहे. भागवतकार म्हणतातः—

( श्लोक )

सृष्ट्वा पुराणि विविधान्यजयात्मशक्त्या ।
वृक्षान् सरिसृप-पशून्-खग-दंश-मत्स्यान् ॥
तैस्तैरतुष्टहृदयः पुरुषं विधाय ।
ब्रह्मावलोकधिषणं मुदमाप देवः ॥ १

**भावार्थः**—देवानें आपल्या स्वयंसिद्ध निर्माणशक्तीनें प्रथम नानाप्रकारचे देह, वृक्ष, सर्प, पशु, पक्षी, मक्षिका, व मत्स्य इत्यादि विविध सृष्टि केली. परंतु त्याचें समाधान कांहीं होईना. तेव्हां अखेर त्यानें मूलकारण जें ब्रह्म, तें प्रत्यक्ष करण्याविषयीं ज्याला बुद्धि आहे, अशा प्रकारचा हा मनुष्यप्राणी निर्माण केला, आणि मग देवाला आनंद झाला.

म्हण आहे, ‘ लुटावा तर हत्ती लुटावा; किरकोळींत काय आहे ?’ त्याचप्रमाणें क्षुद्र गोष्टींचीं कारणें शोधीत बसण्यापेक्षां किंवा ज्ञान संपादित बसण्यापेक्षां सर्व कारणांचें जें कारण व अखिल ज्ञानांचें जें ज्ञान तें उपलब्ध झाल्यास सर्व कांहीं आलें. गजगौरी व्रताचे वेळीं गांधारीचे बल-वैभवशाली एकशेंएक पुत्रांनीं केलेला पराक्रम पाहून कुंती जेव्हां आपल्या मुलांना म्हणाली कीं, तुम्ही

सारे पांच, तुम्ही कितीशी माती आणाल, तेव्हां भीमदादा म्हणाले, 'मी एकटाच बस, पांच तरी कशाला ?' त्याप्रमाणें "एकेन खलु विज्ञातेन सर्वमिदं विज्ञातं स्यात्" म्हणजे, हें एक जाणल्यानें सर्व कांहीं जाणल्यासारखें आहे, अशी जर गुरुकिल्ली हातीं आली, तर कटकटच मिटली, हें उघड आहे. आणि इतिहास पाहातां, ही किल्ली या चतुःखंड पृथ्वीपैकीं भरतखंडालाच मिळाली. आज भारतीय आर्य ज्यांचे गोत्रज म्हणवितात, असे जे वसिष्ठादि ऋषिवर्य त्यांचेच हातीं ही लागली. आणि आमचें काम ती संभाळून ठेवणें व आपलें कल्याण करून घेणें हेंच आहे. तेवढेंहि जर आह्मी नकरूं तर आह्मी सर्वथा अपात्र ठरूं. आमचे पूर्वजांना देखील ही वस्तु श्रमावांचून एकाएकीं मिळाली नाहीं; त्यांना फार फार श्रम करावे लागले, असें उपनिषदादि ग्रंथांवरून स्पष्ट होतें. प्रथम प्रथम तेहि अनेक ठिकाणीं चांचपडतच होते. हें अनंत व अफाट विश्व हें काय असावें, हें गूढ त्यांना पदोपदीं आडवीत होतें; व तें उकलण्याविषयीं त्यांचे अश्रांत यत्न सुरू होते, अशाबद्दल उपनिषदांत पुष्कळ ठिकाणीं पुरावा आहे. श्वेताश्वतरांत म्हटलें आहे:—

किं कारणं ब्रह्म कुतः स्म जाता जीवाम केन क्व च संप्रतिष्ठाः।
अधिष्ठिताः केन सुखेतरेषु वर्तामहे ब्रह्मविदो व्यवस्थाम्।

भावार्थः—हे ब्रह्मवेत्ते हो, ह्या सर्व विश्वाचें कारण काय, आह्मी झालों कशापासून, जिवंतदशेमध्यें आहों कशाच्या योगें, आमचा आधार काय, आणि सुखदुःख संबंधी जी व्यवस्था आहे ती कोणाच्या आज्ञेनें आह्मांस प्राप्त होते?

या प्रश्नांस भिन्न उत्तरें तेथेंच दिलीं आहेत, तीं:—

कालः स्वभावो नियतिर्यदृच्छा भूतानि योनिः पुरुष इति चिन्त्या । संयोग एषां नत्वात्मभावादात्माप्यनीशः सुखदुःखहेतोः ।

भावार्थः—कोणी म्हणतात, काल हेंच कारण; कोणी म्हणतात, जें चाललें आहे तें आपल्या स्वभावानेंच चाललें आहे; कोणी म्हणतात कीं भावितव्यता म्हणून कांहीं एक आवश्यक नियमच आहे, तेणेंकरून विश्व चाललें आहे; कोणाच्या मतें सर्व वस्तु आकस्मिक, तेव्हां आकस्मिता हेंच कारण; कोणाच्या मतें पृथ्वी, आप, तेज इत्यादि भूतें हीं कारणें आहेत; कोणी म्हणतात पुरुष म्हणजे जीवात्मा कारण आहे, तर ज्यांविषयीं चिंतन करणें आहे, त्यांतून जीवात्मा एकीकडे करून दुसऱ्यांपैकीं एक एक स्वतंत्रपणें कारण होऊं शकत नाहीं. या सर्वांनीं एकत्र मिळून विश्वनिर्माण केलें असेंहि व्हावयाचें नाहीं; कां कीं, ज्या विश्वामध्यें जीवात्मा आहे त्याची उत्पत्ति ह्यांतून एका किंवा सर्व कारणांच्या योगें होणें शक्य नाही. ह्या विश्वांत कर्तृत्वशक्ति, ज्ञानशक्ति ह्या

असल्या तर त्या जीवात्म्याचे ठायीं आहेत, इतर कारणांमध्यें नाहींत. वरें, जीवात्माच सर्वांचें कारण असें म्हणावें, तर तो दुर्बल आहे, कां कीं त्यास कधीं सुख प्राप्त होतें, कधीं दुःख; यास्तव तो स्वतंत्र नव्हे. तर मग विश्वाचें कारण काय ?

ह्याच उपनिषदामध्यें अध्याय ६ मध्यें म्हटलें आहे:—

स्वभावमेके कवयो वदन्ति । कालं तथान्ये परिमुह्यमानाः ।

**भावार्थः**—मूढ होत्साते कांहीं पंडित स्वभाव हेंच कारण असें म्हणतात, दुसरे, काल हें कारण म्हणतात.

अखेर या घोटाळ्याचा उलगडा त्या पृच्छकांना पडला तो असाः-

ते ध्यान-योगानुगता अपश्यन्देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम्
यःकारणानि निखिलानि तानि कालात्मयुक्तान्यधिष्ठित्येकः

**भावार्थः**—ऋषि ध्यान करीत बसले असतां देवरूप जो आत्मा त्याचीं सर्व जीं बाहेरून दिसणारीं कार्यें त्यांच्या आंत लपून राहिलेली अशी शक्ति त्यांच्या दृष्टीस पडली आणि काल व जीवात्मा यांसहित जीं कारणें आपापला व्यापार करीत आहेत, त्यांवरील अधिष्ठाता म्हणजे त्यांस व्यवस्थेंत ठेवणारा तो आहे असें त्यांनीं पाहिलें.

याप्रमाणें ध्यानबलानें ऋषींनीं विश्वाचें आदिकारण शोधून काढिलें, अशी उपनिषदांचीच साक्ष आहे. ऋषिजनांची ही साक्ष आपणां-

पैकीं पुष्कळांस आजकाल कां पटत नाहीं याचे-संबंधें डॉक्टर **भांडारकरसाहेब** म्हणतातः—

" आपलें मन इतर गोष्टींमध्यें निमग्न झालें असतां त्याचें मूळसामर्थ्य नाहींसें होऊन त्या गोष्टींचे योगें भलतेच संस्कार त्याजवर उमटतात. क्षुद्र विषयांमध्यें लंपट झाल्याकारणानें अंतःकरण विषयाकार होऊन जातें. त्याच्या मूळस्वरूपावर कामक्रोधादि विकारांचा दाट लेप येऊन बसतो. यास्तव अनंत जो परमेश्वर त्याचें प्रतिबिंब मलिन झालेल्या अंतःकरणरूप आदर्शांत उमटत नाहीं; ईश्वराचें ज्ञान होण्याचें जें स्वाभाविक सामर्थ्य तें लुप्त होऊन जातें. मग मनुष्य नानाप्रकारचे कुतर्क करावयास लागतो. हें सर्व आपोआप चालले आहे, हें आकस्मिक आहे, याचा शासिता कोणी नाहीं, इत्यादि कल्पना करितो. परंतु, विषय व कामक्रोधादि दुर्वृत्ति यांचा लेप धुवून टाकून जर मनुष्य ह्या समग्र विश्वाकडे पाहील, तर अवश्यमेव परमेश्वराचें उन्नत स्वरूप त्याच्या अंतःकरणापुढें उभें राहील ". *

वरील म्हणणें सर्वथा खरें आहे. मनुष्य जर शुद्धीनें वागेल, तर त्याला ब्रह्मसाक्षात्कार खचित खचित होईल. कारण, भागवतकारांचे म्हण-

---

* डॉक्टर **भां**डारकर यांचें " प्रपन्न–प्रलपित " पानें १–४.

ण्याप्रमाणें "ब्रह्मावलोका"साठींच जर त्याला मुद्दाम देवानें निर्माण केला आहे, तर तीच गोष्ट त्याला अगम्य किंवा अप्राप्य कशी राहील? एकादे कोट्याधीशानें 'नारायणनागबळी' वगैरे नवस सायास करून आपल्या संपत्तीला वारस पाहिजे म्हणून औरस पुत्र देवापासून मागून घेतला, तर तो ती संपत्ती त्या पुत्राला देणार नाहीं, असें कसें होईल? पण एक मात्र संभव आहे. म्हण आहे कीं, 'नवसानें मागितलें आणि मुळावर आलें' तशी जर गती झाली तर काय करावें? पोटचा पोर खरा, मुद्दाम मागून घेतला खरा, पण तो जर नादान, कुलक्षणी किंवा वेडा निघाला, तर त्याचे हवालीं असली संपत्ती करून बापानें तरी काय करावें? बरें, इकडे मायापाश त्याला ओढीत असतो. अशावेळीं मग तो एक युक्ति करितो. कोणी तरी सुज्ञ, लायक, भारदस्त, सज्जन व विश्वासू असे पांच-चार इष्टमित्रांपैकीं सद्गृहस्थ शोधून त्यांचे हवालीं ती संपत्ती विश्वासभू ( ट्रस्टी ) म्हणून तो करितो. व त्यांस सांगून ठेवितो कीं, तुम्ही हिची इमानानें वहिवाट करून, हिची व माझे मुलाची जतन करावी. व सुदैवानें मुलगा मागें-पुढें शुद्धीवर येऊन नीट वागूं लागला, म्हणजे ही त्याचे संपूर्ण हवालीं करावी. हीच तोड जगत्पिता पर-

मात्मानेंहि त्याच्या मूर्ख व दुर्गुणी पोरांचे कामीं केली आहे. त्यानें ही पोरांना देण्याची आपली ' दिव्य किंवा दैवी संपत्ति ' सुज्ञ व विश्वासू असे त्याचे आप्त जे तुकाराम-रामदासांसारखे साधुसंत, यांचे दिमतीस देऊन ठेविली आहे. ते तिची आस्थेनें वहिवाट करून तिची अक्षय वाढ करीत असतात. आणि या दुर्वृत्त पोरांपैकीं जेव्हां कोणी योगायोगानें आपलें दुर्वर्तन सोडून शुद्धीवर येऊन त्यांचे पसंतीस येईसें वागूं लागतो, तेव्हां ते निर्लोभपणें आपण होऊन ती संपत्ति त्याचे स्वाधीन करितात.

या म्हणण्याला भक्तांच्या इतिहासांत बळकट पुरावा आहे. तुळशीदासासारखे, वाल्या कोळ्यासारखे शेंकडों दुर्वृत्त पोर योगायोगानें ताळ्यावर येतांच सत्पुरुषांनीं ही संपत्ति त्यांचे हातीं आपणच दिली, अशी साक्ष आहे. याकरितां कोणाहि मनुष्याला हें पितृरिक्थ आपणास मिळेल कीं नाहीं, असा संशय यावयाचें कारण उरलें नाहीं. फक्त त्यानें आपलें वर्तन सुधारून चित्तशुद्धि केली पाहिजे, म्हणजे ही संपत्ति त्याची करगामी झालीच असें त्यानें समजावें. गढूळ पाणी निवळण्याचा अवकाश असतो, मग त्यांत प्रतिबिंबित होण्याला सूर्याकडून कधींच आळस किंवा विलंब झाल्याचें ऐकिवांत नाहीं. त्याचप्र-

माणें आजपर्यंत ज्यांचीं ज्यांचीं हृदयें निष्कल्मष झालीं, त्यांचे त्यांचे हृदयांत ह्या आदिकारणाचा साक्षात्कार तत्काल झालाच झाला. ही इतिहासाची साक्ष ध्यानांत वागवून मनुष्यानें शुद्धचित्त होण्याचा यत्न ठेवावा.

कित्येकांचा देवावर असा रुसवा आहे कीं, देऊन द्यावयाचें, मग त्याला इतके डावपेंच आणि एवढे आढेवेढे कशाला? इतर वैषयिक सुखें नाहीं का उघड उघड आमचे स्वाधीन केलीं? तसेंच हें आत्मसुखहि करावयाचें होतें. या आक्षेपाला एक उत्तर वर दिलेंच आहे. मुलाला वस्तु देणें तरी वस्तूची व मुलाची योग्यता यांचें समीकरण पाहूनच द्यावी लागते. अज्ञानपणीं फार तर खाऊची जिन्नस मनुष्य मुलाचे हातीं देतो. पण हिऱ्याची शेलकी अंगठी किंवा तिजोरीची किल्ली देत नाहीं. त्याचप्रमाणें वैषयिक सुखें क्षुल्लक तीं हवालीं करणें निराळें; आत्मसुख सर्वोच्च तें करणें तर योग्यता पाहूनच केलें पाहिजे, हें उघड आहे.

दुसरें उत्तर असें आहे कीं, श्रुतिशास्त्रें धुंडून सृष्टि निर्माण करण्यांत परमात्म्याचा हेतु काय असावा हें पहातां 'एकाकी न रमते।' 'लोकवत्तु लीलाकैवल्यं।' म्हणजे त्याला एकट्याला करमेना, म्हणून त्यानें ही सृष्टि केली. सृष्टि हा केवळ एक लौकिकी खेळाप्रमाणें

खेळ आहे, मौज आहे, असा उल्लेख सांपडतो. लोकप्रिय संगीतकार राजश्री किर्लोसकरानींहि म्हटलें आहे: " निजरूपीं जगदाकृति भासा। कारण होउनी करित विलासा ॥ " अर्थात् जगद्रूप भास निर्माण करून तो विलास करीत आहे. आणि मौज, खेळ, विलास म्हटला म्हणजे त्यांत कांहीं तरी डाव, कांहीं तरी पेंच, कोडें, गूढ, अट, किंवा अडचण पाहिजेच. नाहींतर तो खेळच नव्हे. मग त्यांत मौजच नाहीं. आट्यापाट्यांचा खेळ पहा ना? त्यांत जर प्रत्येक पाटीवर गडी अडवणार नाहीं, किंवा गडी व मुर्दुग्या कोंडी करून लोण नेणारास कोंडणार नाहींत, त्याला यथेच्छ पाटींतून जाऊं देतील, तर मग खेळ तो काय राहिला? मौज ती कोठें आहे? मुळींच नाहीं. पोरपणीं पत्ते खेळण्याला एकादे वेळीं भिडू नसले तर, कांहीं तरी करमणूक व्हावीं म्हणून अगदीं लहान मुलें दोन डाव विभागून दोन्ही बाजूंची उतारी आपणच करितात. पण अशावेळीं त्या खेळांतील मौज नाहींशी होते. कारण, उभय बाजूंची पानें खेळणाऱ्याला माहीत पडल्यामुळें त्यांत गूढ असें कांहींच उरत नाहीं. खेळ म्हटला म्हणजे त्यांत हारजीत पाहिजे, फसगत पाहिजे, कांहीं तरी शर्त पाहिजे; तरच त्याला गोडी चढते.

लग्नांत वधुवरें सुपारी लपवितात, ती जर कांहीं वेळ सोधावी न लागतां पट्दिशीं सांपडली, तर प्रेक्षकांचा व खेळणाराचा देखील विरस होतो. याचप्रमाणें जगतांत जर गूढ म्हणून कांहींच ठेविलें नसेल, तर तो खेळच नव्हे. त्यांत कांहीं रसच उरणार नाहीं. यास्तव परमात्म्यानें जगतांत अनेक गोष्टी गूढ किंवा अज्ञात ठेविल्या आहेत; अनेक गोष्टी कष्टसाध्य ठेविल्या आहेत; त्यांत त्याचें निर्दयपण नसून खरोखर लीलाप्रियत्व दिसून येतें.

निर्ढवलेला सराईत पोहणारा असतो, तो एकादेवेळीं नवशिक्या पोराला अचानक पाण्यांत ढकलून देतो व पोर गटंगळ्या खाऊं लागलें म्हणजे भोंवतालची मंडळी हसूं लागतात. परंतु, ढकलणाराचा उद्देश केवळ मौजेचा व शिक्षणाचा असतो; निर्दयतेचा नसतो. त्यामुळें तो पोर अगतिक झालासें दिसतांच तो पट्दिशीं उडी घेऊन त्याला वर झेलून धरितो व आपले हातावर संभाळून पोहावें कसें तें त्याला शिकवितो. आणि असें तो न करील तर तो पोराचा वैरी व प्राणहंताच म्हटला जाईल. पण असा अनुभव कधींहि येत नाहीं. तो पोर अल्प कालांतच ती विद्या शिकतो. व ती त्यास अवगत झाली, म्हणजे जें जल त्याला आरंभीं भयस्थानसें भासत होतें, तेंच क्रीडास्थानसें वाटून, परमप्रिय होतें.

मग त्याला कोणी निवारण केलें तरी देखील तो डोळा चुकवून त्यांत उडी घेतो, असा अनुभव आहे. हाच प्रकार या सृष्टिरूपी खेळाचें गूढ ज्यांना उलगडलें, त्यांचे कृतींत दिसून येतो.

तुका म्हणे गर्भवासी । सुखें घालावें आह्मासी ॥

ज्यांना ह्या संसारसमुद्रांत तरण्याची युक्ति सांपडली नाहीं, ते त्याचे नामस्मरणाबरोबर भयभीत होऊन पळ काढितात. परंतु तुकाराम-रामदासांसारखे जे त्यांत पोहण्यांत तरबेज झाले, ते तर उलट अर्जी करितात कीं, आह्मांला जन्मास घाला. आह्मांला या संसारसमुद्रांत लोटून द्या, म्हणजे मौजेनें दोन हात तरी टाकावयास सांपडतील. सारांश, संसार हा अज्ञांना दुःखमय आहे, ज्ञात्यांना तो सर्व सुखमयच आहे.

एतावता, खेळ म्हटला म्हणजे त्यांत कांहीं तरी गूढ हें पाहिजेच, आणि म्हणून हा विश्वरूपी प्रचंड खेळ उभारणाऱ्या अजब खेळाडूनें या जगतांत पदोपदीं अनेक गूढें ठेविलीं असून सर्वांत आपले स्वतःविषयींचें ज्ञान तें परमगूढ ठेविलें आहे. हा खेळ्या कोण आहे, याचा पत्ता लागणें मोठेंच कठीण करून ठेविलें आहे. श्रुति म्हणते:—

न संदृशे तिष्ठति रूपमस्य । न चक्षुषा पश्यति कश्चनैनं ।

याचें रूप दृग्गोचर होत नाहीं. कोणीहि त्याला

चर्मचक्षूंनीं पाहूं शकत नाहीं. असें जरी आहे तरी, या आदिकारणाचा थांग कोणास कधींच लागला नाहीं, असें मात्र समजूं नये. शेकडों समर्थांनीं आजपर्यंत त्याचा थांग लाविला आहे व त्यासाठीं रस्तेहि आंखून ठेविले आहेत. आतां हे रस्ते आखलेलेहि असले तरी अवघड असणारच. सिम्ल्याचे टेंकडीला इंग्रजानें धोपट सडक जरी केली आहे, तरी चढाव चढून जाणें भागच आहे. त्याला इंग्रज काय करील? सिम्ला जर सपाटीवर उतरला, तर सिम्ल्याचें हवाशीरपणच नाहींसें होईल. पण तें होणें इष्टहि नाहीं व शक्यहि नाहीं. याचप्रमाणें, हें आदिकारण शोधण्याचे विचक्षणांनीं अनेक मार्ग आंखून ठेविले आहेत तरी, ते चालून जाण्याला थोडा तरी श्रम करणें भाग आहे. परंतु, असले श्रम म्हणजेच मौज आहे. यामुळें त्याबद्दल शीण वाटण्याचें कारण नाहीं. पुष्पदंत या मार्गाविषयीं म्हणतातः—

( श्लोक )

त्रयी सांख्यं वेदः पशुपतिमतं वैष्णवमिति ।<br>
प्रभिन्ने प्रस्थाने परमिदमदः पथ्यमितिच ।<br>
रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिलनानापथजुषां ।<br>
नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णवइव ॥ १

**भावार्थः**—हे भगवन्, मनुष्यमात्रांत रुचिवैचित्र्य असल्यामुळें तुजकडे येण्याचे भिन्नभिन्न मार्ग त्यांनीं यथारुचि काढिले आहेत. कोणी वैदिकमार्ग धरितात; कोणी

सांख्य, कोणी आगम, कोणी पाशुपत, कोणी भागवत, असे कांहीं सरळ, कांहीं नागमोडी, मिळून अनेक पंथ आहेत. परंतु, कांहीं झालें तरी मला एक कळतें कीं, ज्याप्रमाणें कोणत्याहि नदींत पाणी पडलें तरी अखेर समुद्रासच येऊन मिळालें पाहिजे, त्याप्रमाणें कोणी कोणत्या घाटानें किंवा सडकेनें येवो, शेवटीं तुझ्याशींच येऊन धडकणार; दुसरी गतीच नाहीं.

अर्थात्, या अखिल ब्रह्मांडाचें आदिकारण केवळ ' एकमेवाद्वितीयम् ' असेंच आहे. आणि तें शोधून काढणें हेंच मनुष्यजन्माचें सार्थक आहे. यांतच सर्व सुख आहे. यांतच अनेक कौतुक आहे. येथेंच सर्व विद्वत्ता, बुद्धिमत्ता, व तत्त्वज्ञान यांची परिसीमा आहे. मणीभाई द्विवेदी यानीं आपल्या " शंकरानुकरण " नाम ग्रंथांत म्हटलें आहे कीं,* " अनेकांत असणारें जें एक, तें शोधून काढण्यासाठीं जो यत्न, त्यालाच प्राचीनकालापासून तत्त्वज्ञान अशी संज्ञा दिली आहे ". रामदासहि म्हणतात:—

अनेकीं परी एक देवासी पाहें।

गीतेंत याच ज्ञानाला सात्त्विक ज्ञान असें म्हटलें आहे. भगवान् म्हणतात:—

---

* " All philosophy has from of old been defined as the search after the one in many. "
Preface to " Imitations of Shankar "
By Prof. M. N. Dvivedi.

( श्लोक )

सर्व भूतेषु येनैकं । भावमव्ययमीक्षते ॥
अविभक्तं विभक्तेषु । तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ १

भावार्थः—ब्रह्मादि स्थावरांत भूतांत जे निरनिराळे भाव आहेत, त्या सर्वांत एकच अव्यय व अविभक्त असा भाव भरून राहिला आहे, असें ज्या ज्ञानानें कळतें तें सात्त्विक ज्ञान होय, असें जाण.

हें सात्त्विकज्ञान झालें म्हणजे जगताचें आदिकारण सांपडणें दूर नाहीं व सुखशांतीलाहि तोटा नाहीं. भगवंतानींच सांगितलें आहे कीं, "ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छाति" म्हणजे, हे ज्ञान झालें असतां सर्वोत्तम शान्ति लौकरच मिळते. बरें, हें ज्ञान अमुक जातीला किंवा अमुक वर्णाला व्हावें, वैदिक धर्माचे लोकांना व्हावें, अवैदिकांना होऊ नये, असा कांहीं भेदभाव किंवा निर्बंध नाहीं. ते सर्वांस खुलें आहे. निरहंकारवृत्तीनें जो कोणी परमात्मास सद्भावानें शरण जाऊन आपले चित्तांत शोध करीत राहील, त्याला हें तारकज्ञान अवश्य मिळेल. परंतु, पहावें तों, जीवांचे अहंकार या ज्ञानाचे आड येतात. या पुस्तकाचे १५ वे प्रकरणांत युरोपियन राष्ट्रांची जी सांप्रत स्थिति वर्णन केली आहे व जिला पाहून लबकसारखे विचारी लोकांना सकल जगताचा संहारकाल जवळ येऊन ठेपला अशी दहशत पडली आहे, ती स्थिति तरी या दुर्दम्य

अहंकाराचेंच विलसित होय. इंग्लंडानें २०,००० टन वजनाचें ड्रेडनाट जातीचें लढाऊ गलबत बांधिलें, कीं अमेरिका त्याहून सरसें व जर्मनी आणखीच प्रचंड असें आपलें गलबत बांधूं लागणार. मग त्यापायीं कालाचा, द्रव्याचा, मानवी शक्तीचा कितीहि अपव्यय झाला तरी हरकत नाहीं. हा प्रकार या अहंकाराचेच प्रेरणेचा आहे. खरोखरच, एवढी प्रचंड शक्ति व द्रव्यसामुग्री हीं अहंमन्य राष्ट्रें परस्परांचा विध्वंस करण्याचे कामीं खर्च करण्यास प्रवृत्त झालीं आहेत, त्या जागीं हींच जर शांततेचे व स्नेहाचे मार्ग स्वीकारून आपआपले ताब्यांतील मनुष्यांच्या आत्मोन्नत्यर्थ या अचाट शक्तीचा व संपत्तीचा विनियोग करितील, तर हें जगत् आजपेक्षां किती तरी पटीनें सुखी होईल. परंतु, हें व्हावें कसें ? हा अहंकार सर्पासारखा अखंड धुसधुसतो आहे, तो थंड पडावा कसा ? अहंकार आला कीं आपस्वाथिता त्याचे बगलेंत आलीच, व तिचे पायीं सर्व अनर्थपरंपरा ओढवलीच. याकरितां सर्वानर्थमूल हा जो अहंकार–राष्ट्रांचा तसाच व्यक्तीचाहि–हा नाहींसा झाला पाहिजे किंवा जिरला पाहिजे. हा अहंकार खोड मोडून जिरेल असा कित्येकांचा समज आहे; पण, तो चुकीचा आहे. कारण, पराजित शत्रु अहंकार न टाकितां के-

( श्लोक )

सर्व भूतेषु येनैकं । भावमव्ययमीक्षते ॥
अविभक्तं विभक्तेषु । तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ १

भावार्थः—ब्रह्मादि स्थावरांत भूतांत जे निरनिराळे भाव आहेत, त्या सर्वांत एकच अव्यय व अविभक्त असा भाव भरून राहिला आहे, असें ज्या ज्ञानानें कळतें तें सात्त्विक ज्ञान होय, असें जाण.

हें सात्त्विकज्ञान झालें म्हणजे जगताचें आदिकारण सांपडणें दूर नाहीं व सुखशांतीलाहि तोटा नाहीं. भगवंतानींच सांगितलें आहे कीं, "ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छाति" म्हणजे, हे ज्ञान झालें असतां सर्वोत्तम शान्ति लौकरच मिळते. बरें, हें ज्ञान अमुक जातीला किंवा अमुक वर्णाला व्हावें, वैदिक धर्माचे लोकांना व्हावें, अवैदिकांना होऊ नये, असा कांहीं भेदभाव किंवा निर्बंध नाहीं. ते सर्वांस खुलें आहे. निरहंकारवृत्तीनें जो कोणी परमात्मास सद्भावानें शरण जाऊन आपले चित्तांत शोध करीत राहील, त्याला हें तारकज्ञान अवश्य मिळेल. परंतु, पहावें तों, जीवांचे अहंकार या ज्ञानाचे आड येतात. या पुस्तकाच १५ वे प्रकरणांत युरोपियन राष्ट्रांची जी सांप्रत स्थिति वर्णन केली आहे व जिला पाहून लब्बकसारखे विचारी लोकांना सकल जगताचा संहारकाल जवळ येऊन ठेपला अशी दहशत पडली आहे, ती स्थिति तरी या दुर्दम्य

अहंकाराचेंच विलसित होय. इंग्लंडानें २०,००० टन वजनाचें ड्रेडनाट जातीचें लढाऊ गलबत बांधिलें, कीं अमेरिका त्याहून सरसें व जर्मनी आणखीच प्रचंड असें आपलें गलबत बांधूं लागणार. मग त्यापायीं कालाचा, द्रव्याचा, मानवी शक्तीचा कितीहि अपव्यय झाला तरी हरकत नाहीं. हा प्रकार या अहंकाराचेच प्रेरणेचा आहे. खरोखरच, एवढी प्रचंड शक्ति व द्रव्यसामुग्री हीं अहंमन्य राष्ट्रें परस्परांचा विध्वंस करण्याचे कामीं खर्च करण्यास प्रवृत्त झालीं आहेत, त्या जागीं हींच जर शांततेचे व स्नेहाचे मार्ग स्वीकारून आपआपले ताब्यांतील मनुष्यांच्या आत्मोन्नत्यर्थ या अचाट शक्तीचा व संपत्तीचा विनियोग करितील, तर हें जगत् आजपेक्षां किती तरी पटीनें सुखी होईल. परंतु, हें व्हावें कसें ? हा अहंकार सर्पासारखा अखंड धुसधुसतो आहे, तो थंड पडावा कसा ? अहंकार आला कीं आपस्वार्थिता त्याचे बगलेंत आलीच, व तिचे पायीं सर्व अनर्थपरंपरा ओढवलीच. याकरितां सर्वानर्थमूल हा जो अहंकार–राष्ट्रांचा तसाच व्यक्तीचाहि–हा नाहींसा झाला पाहिजे किंवा जिरला पाहिजे. हा अहंकार खोड मोडून जिरेल असा कित्येकांचा समज आहे; पण, तो चुकीचा आहे. कारण, पराजित शत्रु अहंकार न टाकितां के-

वळ बाह्यात्कारी नम्रून वागतो, परंतु, अंतर्यामीं धुमसतच असतो. जपाननें रशीयास पराभूत केलें म्हणून तशानें रशीया निरहंकार झाला असें कोणी म्हणूं शकेल काय ? त्याचे पोटांत वैराग्नि छन्नरूपानें शिलकच आहे, व अहंकारहि कायमच आहे. अर्थात् या मार्गानें अहंकारनाश होत नाहीं. तेव्हा अहंकारनाशाचा खात्रीचा असा एकच उपाय आहे. आणि तो उपाय म्हणजे विवेक. समर्थ म्हणतातः—" विवेकें अहंभाव हा पालटावा । " मनुष्यानें आपला अहंकार विवेक करून करून हळूहळू नाहींसा करून टाकावा. हा एक अहंकार नष्ट झाला म्हणजे त्याचेबरोबर आपस्वार्थ, क्रोध, लोभ, मत्सर, दर्प, दुराग्रह इत्यादि शांतताविघातक सर्व दोष आपोआप नाहींसे होऊन बुद्धि सत्त्वपूर्ण किंवा सात्त्विक होते. आणि सत्त्वपूर्ण बुद्धि झाली म्हणजे शुद्ध सात्त्विक ज्ञानाचा उदय होतो. त्याचा उदय झाला म्हणजे सहजच सर्वेंद्रियांचे ठिकाणीं ज्ञानाचा प्रकाश फांकतो आणि सत्त्वप्रकर्षामुळें असा सर्वत्र उजेड पडला म्हणजे मनुष्याला खरी दृष्टि येते. ती दृष्टि आली म्हणजे गीतेंत म्हटल्याप्रमाणें

( श्लोक )

समं सर्वेषु भूतेषु । तिष्ठंतं परमेश्वरम् ॥
विनश्यत्स्वविनश्यंतं । यः पश्यति स पश्यति ॥ १

सर्व भूतांचे ठिकाणीं समत्वानें राहणारा व सर्व भूतें नष्ट झालीं तरी स्वतः नष्ट न होणारा जो आदिकारण परमेश्वर त्याचा साक्षात्कार त्याचे हृदयाचे ठिकाणीं होतो. आणि याप्रमाणें सर्वहि निरनिराळीं भूतें एकाच अधिष्ठानाचे ठिकाणीं एकत्वानें आहेत, असा ज्याला प्रत्यय येतो त्याला परिपूर्ण ब्रह्मसंपत्ति प्राप्त होते. ती प्राप्त होऊन सर्वत्र एकत्व दिसूं लागलें, सर्व विविध जगत् केवळ एकाच कारणाचा विकास किंवा विलास आहे अशी दृढबुद्धि बाणली, म्हणजे मग त्या पुरुषाला शोक * मोह बाधत नाहींसे होतात. व तो सुखशांतीचे समृद्धींत रहातो.

सारांश, मनुष्याला शाश्वत सुख किंवा शाश्वत शांति पाहिजे असेल तर अहंकाराचे भरीं पडून संपत्ति वाढविल्यानें ती प्राप्त होणार नाहीं. तर त्यानें आपली बुद्धि सत्त्वगुणसंपन्न करून या विश्वाचें जें आदिकारण त्याची उपलब्धि करून घ्यावी म्हणजे त्याला शाश्वत सुखशांति प्राप्त होतील. पार्थिव विजेचा प्रवाह ज्याप्रमाणें जेथून निघाला तेथपर्यंत येऊन मिळाल्याशिवाय त्याची गति थांबत नाहीं; किंवा वावटळीनें भुईवरून वातावरणांत उडालेला खडा ज्याप्रमाणें धरणीवर पोहोचेपर्यंत त्याला शांति लाभत नाहीं; अथवा

---

* तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ।

पशु किंवा पक्षी सूर्योदयीं भक्ष्यशोधनार्थ रानें-वनें धुंडीत असतां मार्गांत वृक्षाखालीं किंवा नदीतीरीं जरी तूर्तातूर्त विश्रांति पावले तरी पुरापूर सुखशांति सायंकाळी ते आपले स्वगोष्ठास किंवा स्वनीडास परत आल्याशिवाय होत नाहीं; त्याचप्रमाणें ज्या आदिकारणांतून हे कार्यरूप सर्व प्राणी बाहेर पडले त्या आदिकारणाशीं ध्यान व आत्मशोधनरूपी साधनांनीं संगत झाल्याशिवाय त्यांना कायमची शांति व कायमचें सुख प्राप्त होणार नाहीं. म्हणून मनुष्यमात्रानें या आदिकारणाचा शोध करून त्याशीं एकरूप होण्याचा सर्वात्मना यत्न करीत रहावें हेंच त्याचें सर्वोच्च कर्तव्य आहे: हेंच त्याच्या जन्माचें साफल्य आहे.

उपनिषदांत म्हटल्याप्रमाणें:—

एको वशी सर्वभूतांतरात्मा एकं रूपं बहुधा यः करोति । तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीरास्तेषां **सुखं** शाश्वतं नेतरेषाम् ।

—**कठोपनिषद्**

**भावार्थः**—एकच, सर्वांवर सत्ता चालविणारा, सर्व भूतांचा अंतरात्मा, व एकाच वस्तूस नानाप्रकारचीं रूपें देणारा, असा जो त्याजला, जे बुद्धिशाली पुरुष आपल्या आत्म्याचे ठायीं तो जसा आहे तशा स्वरूपानें पहातात, त्यांना शाश्वत **सुखा**ची प्राप्ति होते. इतरांस नाहीं.

नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान् । तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीरास्तेषां **शांतिः** शाश्वती नेतरेषाम् ।

—**कठोपनिषद्**

भावार्थः—नश्वर जे हे पदार्थ त्यांच्यामध्यें अनश्वर चेतन जे आहेत त्यांस चेतना देणारा, आपण एकच असतां बहुतांच्या इच्छा तृप्त करणारा, असा जो त्यास जे बुद्धिशाली पुरुष आपल्या आत्म्याच्या ठायीं ह्या गुणांनीं विशिष्ट अशा स्वरूपानें पहातात, त्यांनाच शाश्वत **शांति** प्राप्त होते. इतरांस नाहीं.*

---

* डॉक्टर **भां**डारकर ह्यांचें "प्रपन्न-प्रलपित" पान ६४.

## सूचना.

प्रस्तावनेंत चित्तस्वास्थ्य शब्द चित्तस्वास्थ असा, व धडपड शब्द धरपड असा चुकून पडला आहे. तसेंच शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् हें वचन तेथें अशुद्ध पडलें आहे.

पान २७८ येथें–"पण शब्दाचें"–या परिच्छेदापूर्वी २८९ पानांतील "कादंबऱ्यांत वाचावें तों" येथपासून "भग्नशाला" येथपर्यंत वाचावें.

पान २८५ येथें–शुकरंभासंवाद–यापुढें २८९ पानांतील "तें संसारी जीवापुरतें तरी खोटें नव्हे"–येथपासून २९० पानांतील "दुसरा दोस्तच नाहीं" येथपर्यंत वाचावें.

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | १४ | शाला | झाला. |
| ७ | ७ | जर असता | पूर्वी |
| ३७ | ३ | दपजायते | दुपजायते |
| ,, | २३ | व्यर्थकरा | व्यर्थकारी |
| ४८ | १८ | भागाला | भोगाला |
| ५० | १६ | दंग | तंग |
| ११० | १४ | रज्याचे | रेज्याचे |
| ११९ | | विनिता | विजिता |
| १२२ | | अनाद्यनंती काल | अनाद्यनंत काल |
| १३७ | १ | मिदंन्ति | मिह |
| १९५ | ३ | धर्मराजानें | कुंतीनें |
| २१० | २० | परोपकारबुद्धि | पराप० |
| २२० | २३ | उपकाराची | अपकाराची |
| २३२ | १२ | वाक्कण्टकौ | वाक्कण्टकै |
| २३९ | २२ | मनुष्यत्वः | मनुष्यः |
| २४५ | टीप | AvObury | AvEbury |
| २६४ | २३ | आंसवें | आसवें |
| २७९ | २० | द्राक्षें | द्राक्षांचा |
| २८३ | २० | ग्रीतीचीं | प्रीतीचीं |
| ३८८ | ९ | पाथोर | पाथोद |
| ४१६ | १५ | लांप्रत | सांप्रत |
| ४२२ | ३ | वान्ति | यान्ति |
| ,, | ५ | च्चित्ते | चित्ते |
| ४२८ | २ | ठरलें | डरलें |
| ४४५ | १६ | जर | जरी |
| ४५३ | ४ | थाडा | थोडा |
| ४५८ | ७-८ | यागिक | यौगिक |